॥ ॐ श्रीपरमात्मने नम: ॥

# अथ तृतीयोऽध्याय:

## —पूर्व पीठिका—

श्रीमद्भगवद्गीतेचा उपदेश मनुष्यमात्राच्या अनुभवावर आधारित आहे. गीतेचा दिव्य उपदेश (२।११ पासून) आरंभ करताना सर्वात प्रथम भगवंतांनी हे स्पष्ट केले आहे की, शरीरी आणि शरीर एकमेकाहून भिन्न आहेत. शरीर अनित्य, असत्, एकदेशीय आणि नाशिवंत आहे तर शरीरी नित्य, सत्, सर्वव्यापी आणि अविनाशी आहे. म्हणून नाशिवंत वस्तूचा नाश होत असताना पाहून दु:खी न होणे आणि अविनाशी वस्तूच्या अविनाशतेकडे पाहून ती तशीच कायम राहण्याची इच्छा न करणे याला विवेक म्हणतात. कर्मयोग, ज्ञानयोग भक्तियोग—तिन्ही योगमार्गात विवेकाची फार मोठी आवश्यकता आहे. ''मी शरीराहून संपूर्णपणे वेगळा आहे'' असा विवेक झाल्यास मुक्तीची अभिलाषा जागृत होते. मुक्तीची गोष्ट तर सोडूनच द्या स्वर्गादींची कामनासुद्धा आपल्याला शरीरापासून वेगळे जाणल्यानेच होते. म्हणूनच भगवंतांनी आपला उपदेश आरंभ करतेवेळीच सर्वात प्रथम विवेकाचे वर्णन केले आहे.

गीतेचे उपर्युक्त विवेक- प्रकरण दुसऱ्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकापासून प्रारंभ होऊन तीसाव्या श्लोकात समाप्त होते. विवेकाच्या या प्रकरणात भगवंतांनी आत्मा, अनात्मा, प्रकृती, पुरुष, ब्रह्म, अविद्या, ईश्वर, जीव, जगत्, माया इत्यादी कोणत्याही दार्शनिक शब्दाचा उपयोग केला नाही तर सर्वजण सहजपणे समजू शकतील अशा रीतीनेच भगवंतांनी त्याचे विवेचन केले आहे. याचे तात्पर्य हे आहे की, केवळ मनुष्यच परमात्मप्राप्तीचा अधिकारी आहे. कारण मनुष्यशरीर परमात्मप्राप्तीसाठीच मिळालेले आहे. म्हणून उपर्युक्त विवेकाला महत्त्व देऊन सर्व माणसे परमात्मप्राप्ती करू शकतात.

या प्रकरणात भगवंतांनी ''बुद्धी'' शब्दाचा प्रयोगही केला नाही. वास्तविक नित्य आणि अनित्य, सत् आणि असत्, अविनाशी आणि विनाशी, शरीरी आणि शरीराला वेगवेगळे समजण्यासाठी ''विवेकाचीच'' आवश्यकता आहे बुद्धीची नव्हे. विवेक बुद्धीच्या पलीकडचा आहे. जसे प्रकृती आणि पुरुष अनादी आहेत (१३।१९), तसेच त्यांचा वेगळेपणा प्रगट करणारा विवेकही अनादी आहे. ह्याच विवेक बुद्धीत प्रगट होत असतो. हा भगवंतांनी प्रदान केलेला विवेक सर्व प्राणिमात्रांना नित्य प्राप्त आहे. पशु-पक्षीही खाद्य-अखाद्य पदार्थांच्या भिन्नतेला जाणतात. वृक्षवेलींच्या ठिकाणीसुद्धा शीत-उष्ण, अनुकूलता-प्रतिकूलता इत्यादींच्या भिन्नतेचे ज्ञान असते. मनुष्यप्राणी बुद्धिप्रधान असल्यामुळे त्याच्या ठिकाणी हा विवेक विशेषरूपाने असतो. पशु-पक्षांच्या ठिकाणी तर केवळ उदरनिर्वाहासाठी उपयोगात येणाऱ्या जड पदार्थाविषयी विवेक असतो परंतु मनुष्य आपल्या विवेकाने जन्म-मरणाच्या बंधनातून कायमचे मुक्त होऊन शाश्वत शांती प्राप्त करू शकतो. हीच मनुष्याच्या विवेकाची विशेषता आहे.

विवेक जागृत झाल्यास अर्थात् शरीर आणि शरीरीच्या भिन्नतेचा अनुभव आल्यास आपले म्हणविले जाणाऱ्या शरीर-इंद्रिये-मन-बुद्धीसहित संसाराचा सर्वथैव संबंध विच्छेद होतो जो मुळातच असतो आणि बुद्धी शुद्ध आणि सम होते, अर्थात् बुद्धीच्या ठिकाणी असलेला विषमभाव नष्ट होतो.

कर्मयोगात बुद्धीच्या एक निश्चयाला प्राधान्य आहे ''**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह**'' (२।४१)* मनुष्य जेव्हा आपले कल्याण अथवा परमात्मप्राप्तीविषयी एक निश्चय करतो तेव्हा त्याला अनुकूलता आणि प्रतिकूलता बाधा

* सांख्ययोगामध्ये विवेकाची, भक्तियोगामध्ये श्रद्धा विश्वासाची, तसेच कर्मयोगामध्ये निश्चयात्मिका बुद्धीची प्रधानता असते. कर्मयोगामध्ये विवेक आणि श्रद्धा विश्वास नसतो असे नाही परंतु प्रामुख्याने एक निश्चयात्मक बुद्धी असते. तसेच सांख्ययोगामध्ये आणि भक्तियोगामध्येही एक निश्चयात्मक बुद्धी असते.

आणीत नाही आणि अशाप्रकारे काहीही न करता त्याची बुद्धी सहज सम होऊ लागते. जोपर्यंत बुद्धीच्या ठिकाणी संसाराचे महत्त्व, आकर्षण, ओढ असते तोपर्यंतच बुद्धीला सम करण्यासाठी सांगितले जाते. एक निश्चयात्मिका बुद्धी झाल्यास संसाराचे महत्त्व आकर्षण, ओढ सहज समाप्त होऊ लागते. अशी निश्चयात्मिका बुद्धी होण्यात भोग आणि संग्रहाच्या आसक्तीला महान बाधक म्हटले गेले आहे (२।४४)

याप्रमाणे कर्मयोगात निश्चयात्मिका बुद्धीची अत्यंत आवश्यकता असल्याचे सांगून भगवंत अर्जुनाला समभावपूर्वक कर्तव्यकर्म करण्याविषयी विशेषत्वाने सांगतात. जसे "**कर्मण्येवाधिकारस्ते**" (२।४७) "**योगस्थः कुरु कर्माणि**" (२।४८), "तुझा कर्म करण्यातच अधिकार आहे," "समतेत स्थित होऊन कर्म कर". त्याचबरोबर हेही म्हणतात की, "**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगात्**" (२।४९) बुद्धियोगा (समता) पेक्षा सकाम कर्म अत्यंत तुच्छ आहेत. पुढे म्हणतात "**बुद्धौ शरणमन्विच्छ**" (२।४९), "**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते। तस्माद्योगाय युजस्व योगः कर्मसु कौशलम्।**" (२।५०), "तू समबुद्धीचा आश्रय घे", "समतापूर्वक कर्म करणारा पुरुष पाप आणि पुण्य दोन्हींचा या देहात जिवंत असतानाच त्याग करतो. म्हणून तू समतेच्या प्राप्तीविषयीच प्रयत्न कर. कारण समता हीच कर्मामध्ये चतुरता आहे.

अर्जुनाच्या मनात युद्ध न करण्याविषयीचा आग्रह पूर्वीपासूनच होता. पहिल्या अध्यायाच्या एकतीसाव्या श्लोकात अर्जुन म्हणतात. "युद्धात आपल्या कुलाचा नाश करून मला आपले हित दिसत नाही." "**न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे।**". नंतर पंचेचाळीसाव्या श्लोकात म्हणतात. "अहो दुःखाची गोष्ट अशी आहे की, आम्ही बुद्धिमान् असूनसुद्धा भयंकर पाप करण्यासाठी तयार झालो आहोत". "**अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्।**". पुढे दुसऱ्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात अर्जुन म्हणतात "मी भिक्षेचे अन्न खाणे श्रेष्ठ समजतो. परंतु युद्ध करणे नव्हे", "**श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके**" आणि नवव्या श्लोकात तर भगवंताच्या आज्ञे ( **उत्तिष्ठ परंतप** २।३) विरुद्ध आपला निर्णय सांगतात की "मी युद्ध करणार नाही"—"**न योत्स्ये**" (२।९)

आपल्या आग्रहाला चिकटून असलेला श्रोता वक्त्याचे म्हणणे नीट समजून घेऊ शकत नाही—हा नियम आहे. हेच कारण आहे की, आपला युद्ध न करण्याचा आग्रह ठेवल्याने अर्जुन देखील उपर्युक्त प्रकरणात भगवंताच्या वचनांचा आशय नीट समजून घेऊ शकले नाहीत. म्हणून अर्जुनाला भगवंताचे वचन द्व्यर्थी वाटू लागले. या कारणाने भगवंताचा अभिप्राय काय आहे? ते माझ्या कल्याणाचे कोणते साधन श्रेष्ठ समजतात याचा खुलासा करविण्यासाठी अर्जुन पुढील दोन श्लोकांत भगवंतांना प्रश्न करतात.

अर्जुन उवाच

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव॥ १॥**
**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्॥ २॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **जनार्दन** | = हे जनार्दन! | **मता** | = मानत आहात, | **किम्** | = का |
| **चेत्** | = जर | **तत्** | = तरमग | **नियोजयसी** | = प्रवृत्त करीत आहात? |
| **ते** | = आपण | **केशव** | = हे केशव! | | |
| **कर्मणः** | = कर्मापेक्षा | **माम्** | = मला | **व्यामिश्रेण, इव** | = (आपण आपल्या) द्व्यर्थी |
| **बुद्धिः** | = बुद्धीला (ज्ञानाला) | **घोरे** | = घोर | | |
| **ज्यायसी** | = श्रेष्ठ | **कर्मणि** | = कर्मांत | **वाक्येन** | = वचनांने |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **मे** | = माझ्या | **निश्चित्य** | = निश्चय करून | **येन** | = ज्यामुळे |
| **बुद्धिम्** | = बुद्धीला | **तत्** | = अशी | **अहम्** | = माझे |
| **मोहयसि, इव** | = भ्रमित करीत आहात. (म्हणून आपण) | **एकम्** | = एक गोष्ट | **श्रेयः** | = कल्याण |
| | | **वद** | = सांगा की, | **आप्नुयाम्** | = होईल. |

*व्याख्या*— **जनार्दन**—या पदातून अर्जुन जणुकाही हा भाव प्रगट करतात की, हे कृष्ण! आपण सर्वांची याचना पूर्ण करणारे आहात तर मग माझी याचना तर अवश्य पूर्ण करालच.

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते.......नियोजयसि केशव—** मनुष्याच्या अंत:करणात अशी एक उणीव असते की, तो प्रश्न करून उत्तराच्या रूपात वक्त्याकडूनही आपल्याच विषयाचे अथवा सिद्धांताचे समर्थन करवू इच्छितो. याला उणीव यासाठी म्हटले आहे की, वक्त्याच्या निर्देशाचे, मग तो निर्देश मनोनुकूल असो अथवा सर्वथैव प्रतिकूल असो, पालन करण्याचा निश्चयच शूरवीरता आहे बाकी सर्व दुर्बलता अथवा भित्रेपणाच म्हणता येईल. या दुर्बलतेमुळेच मनुष्याला प्रतिकूल परिस्थितीचा सामना करणे अवघड जाते. जेव्हा तो प्रतिकूल परिस्थिती सहन करू शकत नाही तेव्हा तो चांगुलपणाचा वेष धारण करतो अर्थात् तेव्हा चागुंलपणाच्या रूपात वाईटपणाच येत असतो. जी वाईट गोट चांगल्या गोष्टीचा वेष पांघरूण येते तिचा त्याग करणे अत्यंत अवघड जाते. या ठिकाणी अर्जुनातही हिंसेच्या त्यागाच्या स्वरूपात चांगुलपणाच्या वेषात कर्तव्यत्यागरूपी वाईटपणा आला आहे म्हणून ते कर्तव्यकर्मापेक्षा ज्ञानाला श्रेष्ठ समजत आहेत. याच कारणाने ते या ठिकाणी प्रश्न करीत आहेत की, जर आपण कर्मापेक्षा ज्ञानाला श्रेष्ठ समजता तर मग मला अशा युद्धरूप घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात?

भगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या एकोणचाळीसाव्या श्लोकात ''**बुद्धिर्योगे**'' पदातून समत्वबुद्धीबद्दल (समता) म्हटले होते. परंतु अर्जुनाने त्याला ज्ञान समजले. म्हणून ते भगवंताला म्हणत आहेत की, हे जनार्दन! आपण पूर्वी म्हटले होते की, ''मी सांख्यामध्ये (ज्ञाना) जी बुद्धी म्हटली आहे तिलाच तू योगाच्या विषयात ऐक. या बुद्धीने युक्त झालेला तू कर्मबंधनातून मुक्त होशील.'' परंतु जोपर्यंत ज्ञान होणार नाही तोपर्यंत कर्मबंधनातून मुक्त होता येत नाही. आपण हेही सांगितले की, बुद्धियोग अर्थात् ज्ञानापेक्षा कर्म अत्यंत निकृष्ट आहे (२।४९). जर आपल्या मान्यतेमध्ये कर्मापेक्षा ज्ञान श्रेष्ठ आहे, उत्तम आहे तर मग मला तुम्ही शास्त्रविहित यज्ञ, दान, तप इत्यादी शुभ कर्मांमध्येसुद्धा प्रवृत्त करता कामा नये, केवळ ज्ञानामध्येच प्रवृत्त होण्याविषयी आपण सांगावयास पाहिजे होते. परंतु आपण त्याच्या विरुद्ध मला युद्धासारख्या अत्यंत क्रूर कर्मामध्ये ज्यात दिवसभर केवळ मनुष्याची हत्याच करावी लागते त्यात का प्रवृत्त करीत आहात?

पूर्वी अर्जुनाच्या मनात युद्धाविषयी आवेश उत्पन्न झाला होता आणि त्याच आवेशात येऊन त्यांनी भगवंताला म्हटले होते की, ''हे अच्युत! माझा रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागी उभा करा ज्यामुळे मला पाहता येईल की, माझ्याशी दोन हात करण्याला कोण कोण आले आहेत!'' परंतु जेव्हा भगवंतांनी दोन्ही सैन्याच्या मध्यभागी भीष्माचार्य आणि द्रोणाचार्य यांच्यासमोर तसेच इतर राजेलोकांसमोर रथ उभा केला व म्हटले की, ''तू या कुरुवंशीयांना पहा'' तेव्हा अर्जुनाचा कौटुंबिक मोह जागृत झाला.

मोह जागृत झाल्याने त्यांची वृत्ती युद्धापासून, कर्मापासून उपरत होऊन ज्ञानाकडे वळली कारण ज्ञानात युद्धासारखे घोर कर्म करावे लागत नाहीत. म्हणून अर्जुन म्हणतात की, आपण मला घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात.?

येथे ''**बुद्धिः**'' पदाचा अर्थ ''ज्ञान'' घेतला गेला आहे. जर येथे ''**बुद्धिः**'' या पदाचा अर्थ समत्वबुद्धी (समता) घेतला गेला तर द्व्यर्थी वचन सिद्ध होणार नाही. कारण की, दुसऱ्या अध्यायाच्या अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात भगवंतांनी अर्जुनाला योगात (समता) स्थित होऊन कर्म करण्याची आज्ञा दिली आहे. द्व्यर्थी वचन तेव्हाच सिद्ध होईल जेव्हा अर्जुनाच्या समजण्यामध्ये दोन प्रकारची माहिती असेल आणि तेव्हाच असा प्रश्न उपस्थित होतो की, जर आपल्या मान्यतेत कर्मापेक्षा ज्ञान श्रेष्ठ आहे, तर मग मला घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात? दुसरी गोष्ट अशी की, भगवंतांनी यापुढे अर्जुनाच्या प्रश्नाच्या उत्तरात दोन निष्ठा सांगितल्या आहेत. ज्ञानयोग्यांची निष्ठा ज्ञानयोगामुळे आणि कर्मयोग्यांची निष्ठा कर्मयोगामुळे. यावरुन देखील अर्जुनाच्या प्रश्नामधील ''**बुद्धिः**'' पदाचा अर्थ ''ज्ञान'' असा घेणेच युक्तिसंगत वाटतो.

कोणताही साधक श्रद्धापूर्वक प्रश्न विचारूनच आपल्या प्रश्नाचे योग्य उत्तर प्राप्त करू शकतो. विनाकारण आक्षेप-पूर्वक शंका निर्माण केल्या तर योग्य उत्तर मिळणे अशक्य होते. अर्जुनाची भगवंतावर पूर्ण श्रद्धा आहे म्हणून भगवंताच्या सांगण्यानुसार अर्जुन आपल्या कल्याणासाठी युद्धासारख्या

घोर कर्मातही प्रवृत्त होऊ शकतात—असा भाव उपर्युक्त प्रश्नातून प्रगट होतो.

**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे**—या पदातला अर्जुनाचा भाव असा आहे की, आपण कधी कर्म करा म्हणता "**कुरु कर्माणि**" (२।४८) आणि कधी 'ज्ञानाचा आश्रय घ्या' म्हणता "**बुद्धौ शरणमन्विच्छ**" (२।४९) आपल्या अशा या द्व्यर्थी वचनाने माझ्या बुद्धीला भ्रम होत आहे अर्थात् मी कर्म केले पाहिजे की ज्ञानाचा आश्रय घेतला पाहिजे. यापैकी काय केले पाहिजे हे मला स्पष्टपणे समजेनासे झाले आहे.

या ठिकाणी दोन वेळा "**इव**" पदाच्या प्रयोगाने भगवंतावर असलेली अर्जुनाची श्रद्धा सिद्ध होत आहे. श्रद्धेमुळेच अर्जुन भगवंताचे वचन योग्य मानत आहेत आणि हेही समजत आहेत की, भगवंत मला भ्रमात टाकीत नाहीत. परंतु भगवंताच्या वचनांना योग्य रीतीने न समजल्यामुळे अर्जुनाला ती वचने द्व्यर्थी वाटत आहेत आणि त्या वचनाने भगवंत माझ्या बुद्धीला भ्रमित करीत आहेत असे त्यांना वाटत आहे. जर भगवंतांनीच अर्जुनाच्या बुद्धीस मोहित केले तर अर्जुनाच्या बुद्धीतील मोह काढील कोण?

**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम्**—माझे कल्याण कर्माने होईल का ज्ञानाने होईल—यापैकी आपण एक गोष्ट निश्चित करून सांगा ज्यायोगे माझे कल्याण होईल. मी पूर्वीही आपणाला म्हटले होते की, ज्यायोगे माझे निश्चित कल्याण होईल ती गोष्ट मला सांगा—"**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे** (२।७) आणि आताही तीच गोष्ट आपल्या पुढे मांडीत आहे.

**परिशिष्ट भाव**—जोपर्यंत संसाराची सत्ता मानीत आहात, तोपर्यंतच कर्म घोर अथवा सौम्य दिसते. कारण संसाराची सत्ता मानल्याने कर्माकडे दृष्टी राहते, आपल्या कर्तव्याकडे नव्हे. आपल्या कर्तव्याकडे दृष्टी राहिली तर कर्म घोर अथवा सौम्य दिसत नाही.

***संबंध**—आता पुढील तीन श्लोकांतून (तिसऱ्या, चौथ्या आणि पांचव्या) भगवान् अर्जुनाच्या "**व्यामिश्रेणेव वाक्येन**" (द्व्यर्थीवचन) या पदाचे उत्तर देत आहेत.*

*श्रीभगवानुवाच*

# लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ।
# ज्ञानयोगेन साङ्ख्यानां कर्मयोगेन योगिनाम्॥ ३ ॥

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अनघ** | = हे निष्पाप अर्जुन! | **निष्ठा** | = निष्ठा | **साङ्ख्यानाम्** | = ज्ञानियांची (निष्ठा) |
| **अस्मिन्** | = या | **मया** | = माझ्याद्वारा | **ज्ञानयोगेन** | = ज्ञानयोगाने (आणि) |
| **लोके** | = मनुष्यलोकात | **पुरा** | = पूर्वी | **योगिनाम्** | = योगियांची (निष्ठा) |
| **द्विविधा** | = दोन प्रकाराने होणारी | **प्रोक्ता** | = सांगितली गेली आहे. (त्यापैकी) | **कर्मयोगेन** | = कर्मयोगाने (होते) |

*व्याख्या*— [अर्जुन युद्ध करू इच्छित नव्हते म्हणून त्यांनी समतावाचक "बुद्धि" शब्दाचा अर्थ "ज्ञान" समजला. परंतु भगवंतांनी पूर्वी "बुद्धि" आणि "बुद्धियोग" शब्दाने समतेचे वर्णन केले होते (२।३९, ४९ इत्यादी) म्हणून येथेही भगवान् ज्ञानयोग आणि कर्मयोग—या दोन्हीच्या योगाने प्राप्त होणाऱ्या समतेचे वर्णन करीत आहेत.]

**अनघ**—अर्जुनाकरवी आपल्या कल्याणाविषयी विचारले जाणे हीच त्यांची निष्पापता आहे, कारण आपल्या कल्याणाची इच्छा तीव्र झाल्यास साधकाची पापे नष्ट होतात.

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मया**—या ठिकाणी लोके पदाचा अर्थ मनुष्यशरीर समजावा, कारण ज्ञानयोग आणि कर्मयोग—दोन्ही प्रकारची साधने करण्याचा अधिकार अथवा साधक होण्याचा अधिकार मनुष्यशरीरालाच आहे.

**निष्ठा**—अर्थात् समभावाची स्थिती एकच आहे. जी दोन प्रकाराने प्राप्त केली जाऊ शकते. ज्ञानयोगाने आणि कर्मयोगाने. या दोन्ही योगांचा वेगवेगळा विभाग करण्यासाठी भगवंतांनी दुसऱ्या अध्यायाच्या एकोण-चाळीसाव्या श्लोकात म्हटले आहे की, ह्या समत्वबुद्धीला मी सांख्ययोगाच्या विषयानुषंगाने (अकराव्या श्लोकापासून तीसाव्या श्लोकापर्यंत) सांगितले आहे. आता ह्याच समत्वबुद्धीला कर्मयोगाच्या अनुषंगाने (एकोणचाळीसाव्या-पासून त्रेपन्नाव्या श्लोकापर्यंत) ऐक. "**एषा तेऽभिहिता साङ्ख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु**".

**पुरा**—पदाचा अर्थ "अनादिकाल" ही होतो आणि

काही क्षणापूर्वी असाही होतो. येथे ह्या पदाचा अर्थ 'ह्यापूर्वी' असा आहे म्हणजेच मागील अध्याय, ज्यावर अर्जुनाची शंका आहे. मागील अध्यायात जरी दोन्ही निष्ठा वेगवेगळ्या सांगितल्या गेल्या आहेत तरी पण कोणत्याही निष्ठेत कर्माच्या त्यागाविषयी सांगितले गेले नाही.

### मार्मिक गोष्ट

या ठिकाणी भगवंतांनी दोन निष्ठा सांगितल्या आहेत. सांख्यनिष्ठा (ज्ञानयोग) आणि योगनिष्ठा (कर्मयोग). जसे या लोकात दोन प्रकारच्या निष्ठा आहेत "**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा**" तसेच या लोकात दोन प्रकारचे पुरुष आहेत. "**द्वाविमौ पुरुषौ लोके**" (१५।१६) त्यापैकी एक "क्षर" आहे आणि एक "अक्षर". क्षर (नाशवान संसार) आणि अक्षर (अविनाशी स्वरूप), क्षराच्या सिद्धी असिद्धीमध्ये,प्राप्ती-अप्राप्तीमध्ये सम राहणे "कर्मयोग" आहे आणि क्षरापासून विन्मुख होऊन अक्षरामध्ये स्थित होणे "ज्ञानयोग" आहे. परंतु क्षर आणि अक्षर या दोघापेक्षाही उत्तम पुरुष तर वेगळाच आहे ज्याला परमात्मा या नावाने संबोधले जाते—"**उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः**" (१५।१७). तर परमात्मा क्षरापेक्षा अतीत आहे आणि अक्षरापेक्षा उत्तम आहे म्हणून शास्त्रात आणि वेदात तो पुरुषोत्तम नावाने प्रसिद्ध आहे (१५।१८). अशा परमात्म्याला संपूर्णपणे शरण जाणे ही भगवन्निष्ठा आहे (भक्तियोग). म्हणून क्षराच्या प्रधानतेने कर्मयोग, अक्षराच्या प्रधानतेने ज्ञानयोग आणि परमात्म्याच्या प्रधानतेने भक्तियोग आचरणात येतो.*

सांख्यनिष्ठा आणि योगनिष्ठा ह्या दोन्ही साधकांच्या स्वतःच्या निष्ठा आहेत. परंतु भगवन्निष्ठा साधकांची स्वतःची निष्ठा नव्हे. कारण की सांख्यनिष्ठेत आणि योगनिष्ठेत साधकाला "मी आहे" आणि "संसार आहे" याचा अनुभव असतो म्हणून ज्ञानयोगी संसाराशी संबध-विच्छेद करून आपल्या स्वरूपात स्थित होतो आणि कर्मयोगी संसाराचे पदार्थ (शरीरादी) संसाराच्याच सेवेत उपयोगात आणून संसाराशी सबंध-विच्छेद करतो. परंतु भगवन्निष्ठा यामध्ये साधकाला प्रथम भगवान् आहेत—असा अनुभव येत नाही परंतु असा विश्वास असतो की, स्वरूप आणि संसार या दोन्हीपेक्षाही विलक्षण असे कोणते तरी एक तत्त्व (भगवान्) आहे. म्हणून तो श्रद्धा विश्वासपूर्वक भगवंताला मानून आपले आपणास भगवंताला समर्पित होतो. म्हणून सांख्यनिष्ठा आणि योगनिष्ठेमध्ये तर "जाणणे" (विवेक) मुख्य आहे आणि भगवन्निष्ठेमध्ये "मानणे" (श्रद्धा, विश्वास) मुख्य आहे.

जाणणे आणि मानणे या दोन्हीत काहीही फरक नाही. जसे "जाणणे" संदेहरहित (दृढ) असते तसेच "मानणे" सुद्धा संदेहरहित असते. मानलेल्या गोष्टीत विचार करण्याची आवश्यकता नसते. जसे "अमुक माझी आई आहे" हे केवळ मानलेले आहे पण ह्या मानलेल्या गोष्टीविषयीसुद्धा आपणाला कधीही शंका येत नाही, कधी जिज्ञासाही होत नाही, कधी विचारही करावा लागत नाही. म्हणून गीतेमध्ये भक्तियोगाच्या प्रकरणात ज्या ठिकाणी जाणण्याची गोष्ट आली आहे तिला मानण्याच्या अर्थातच घेत जावे. त्याचप्रमाणे ज्ञानयोग आणि कर्मयोग प्रकरणात ज्या ठिकाणी मानण्याची गोष्ट आली आहे तिला जाणण्याच्या अर्थातच घेत जावे.

सांख्यनिष्ठा आणि योगनिष्ठा तर साधन-साध्य आहे आणि साधकावर अवलंबून आहे परंतु भगवन्निष्ठा साधन-साध्य नाही. भगवन्निष्ठेत साधक भगवंतावर आणि त्यांच्या कृपेवर निर्भर राहतो.

भगवन्निष्ठेचे वर्णन गीतेत ठिकठिकाणी आले आहे. जसे याच अध्यायात प्रथम दोन निष्ठांचे वर्णन करून मग तीसाव्या श्लोकात "**मयि सर्वाणि कर्माणि सन्न्यस्य**" पदाने भक्तीचे वर्णन केले गेले आहे. पाचव्या अध्यायातही दोन निष्ठांचे वर्णन करून दहाव्या श्लोकात "**ब्रह्मण्याधाय कर्माणि**" आणि शेवटी "**भोक्तारं यज्ञतपसाम्**" इत्यादी पदाने भक्तीचे वर्णन केले गेले आहे. इत्यादी.

**ज्ञानयोगेन साङ्ख्यानाम्**—प्रकृतीपासून उत्पन्न झालेले गुणच, गुणांत वर्तत आहेत, संपूर्ण क्रिया गुणांत, इंद्रियांतच होत आहेत (३।२८) आणि माझा त्यांच्याशी काहीही संबंध नाही— असे समजून संपूर्ण क्रियामध्ये कर्तेपणाच्या अभिमानाचा सर्वथैव त्याग करणे "ज्ञानयोग" आहे.

गीतोपदेशाच्या सुरवातीलाच भगवंतांनी सांख्ययोगाचे वर्णन करून (ज्ञानयोग) नाशवान् शरीर आणि अविनाशी शरीरीचे विवेचन केले आहे ज्याला (गीता २।१६ मध्ये) असत् आणि सत् पदाने संबोधले आहे.

**कर्मयोगेन योगिनाम्**—वर्ण, आश्रम, स्वभाव आणि परिस्थितीनुसार जे शास्त्रविहित कर्म समोर येईल ते कर्म

* वास्तविक पाहता भगवंताचा संबंध कर्मयोग आणि ज्ञानयोग या दोन्हीही योगामध्ये असतो. कारण या दोन्हींचे विधायक भगवंतच आहेत. कर्मयोग आणि ज्ञानयोग यांच्यापासून कल्याण होण्याचे विधान तर भगवंतानेच केले आहे. म्हणून कर्मयोगी आणि ज्ञानयोगी हे दोन्हीही भगवंताच्या मताचेच (सिद्धांताचेच) पालन करतात, त्यांच्यामध्ये केवळ भगवंताची परायणता नसते.

(त्या कर्मात किंवा त्याच्या फलात) कामना, ममता आणि आसक्तीचा संपूर्णपणे त्याग करून, करणे किंवा कर्माच्या सिद्धी असिद्धीविषयी सम राहणे ''कर्मयोग'' आहे.

भगवंतांनी कर्मयोगाचे वर्णन दुसऱ्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या आणि अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात प्रामुख्याने केले आहे त्यातही सत्तेचाळीसाव्या श्लोकात कर्मयोगाचा सिद्धांत सांगितला आहे आणि अठ्ठेचाळीसाव्या श्लोकात कर्मयोगाला अनुष्ठानामध्ये आणण्याचा विधी सांगितला आहे.

**परिशिष्ट भाव**—कर्मयोग आणि ज्ञानयोग—या दोन्हीही निष्ठा लोकात असल्यामुळे 'लौकिक' आहेत—'**लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा**' कर्मयोगात 'क्षर' ची (संसारा) ची प्रधानता आहे आणि ज्ञानयोगात 'अक्षर' (जीवात्मा) ची प्रधानता आहे. क्षर आणि अक्षर दोन्हीही लोकातच आहेत—'**द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च**' (गीता १५। १६). म्हणून कर्मयोग आणि ज्ञानयोग—दोन्हीही लौकिक निष्ठा आहेत.

जीव आणि जगताला प्राधान्य देण्यानेच या दोन निष्ठा झाल्या आहेत. जर जीव आणि जगत यांना प्राधान्य न देता केवळ परमात्म्यालाच प्राधान्य दिले तर दोन निष्ठा होणार नाहीत, तर केवळ अलौकिक भगवन्निष्ठा (भक्ती) होईल.

लौकिक निष्ठा (कर्मयोग-ज्ञानयोग) यात साधकाचा आपला उद्योग मुख्य असतो. तो साधनेत आपला पुरुषार्थ मानतो. परंतु जेव्हा साधक भगवंताचा आश्रय घेऊन साधन करतो, स्वत:चा उद्योग मुख्य मानीत नाही, तेव्हा त्याची नित्य अलौकिक होते. कारण भगवंताचा संबंध झाल्याने सर्व अलौकिक होते. जोपर्यंत भगवंताचा संबंध होत नाही, तोपर्यंत सर्व लौकिकच असते.

कोणाला वाईट समजू नये, कोणाचे वाईट इच्छू नये आणि कोणाचे वाईट करू नये म्हणजे 'कर्मयोग' आरंभ होतो. माझे काही नाही, मला काहीही नको आणि मला आपल्यासाठी काहीही करावयचे नाही—हे सत्य स्वीकार केले तर 'ज्ञानयोग' आरंभ होतो.

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते।**
**न च सन्न्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति॥ ४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पुरुषः** | = मनुष्य | **अश्नुते** | = अनुभव करीत | | केवळ त्यागाने |
| **कर्मणाम्** | = कर्माचा | **न** | = नाही | **सिद्धिम् एव** | = सिद्धीलाही |
| **अनारम्भात्** | = आरंभ केल्याशिवाय | **च** | = आणि | **समधिगच्छति** | = प्राप्त होत |
| **नैश्कर्म्यम्** | = निष्कर्मतेचाही | **सन्न्यसनात्** | = (कर्मांच्या) | **न** | = नाही. |

*व्याख्या*—**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते**—कर्मयोगात कर्म करणे अत्यंत आवश्यक आहे कारण निष्कामभावपूर्वक कर्म करण्यानेच कर्मयोगाची सिद्धी होते* ही सिद्धी मनुष्याला कर्म केल्याशिवाय मिळू शकत नाही.

मनुष्याच्या अंत:करणात कर्म करण्याविषयीचा जो वेग विद्यमान असतो तो शांत करण्यासाठी कामनेचा त्याग करून कर्तव्यकर्म करणे आवश्यक आहे. कामना ठेवून कर्म करण्याने हा वेग शांत होत नाही उलट वाढतो.

**नैष्कर्म्यम् अश्नुते**—या पदांचा आशय असा आहे की, कर्मयोगाचे आचरण करणारा मनुष्य कर्मांना करीत असतानाच निष्कर्मतेला प्राप्त होतो. ज्या स्थितीत मनुष्याचे कर्म अकर्म होतात अर्थात् बंधनकारक राहत नाहीत त्या स्थितीला ''निष्कर्मता'' असे म्हणतात.

कामनारहित होऊन केल्या गेलेल्या कर्मात फल देण्याच्या शक्तीचा असा अभाव होतो जसे भाजलेल्या किंवा उकळलेल्या बीजात अंकुरणक्षमता संपूर्णपणे नष्ट होते. म्हणून निष्काम कर्म करणाऱ्या मनुष्याच्या कर्मात पुन: जन्म-मरणाच्या चक्रामध्ये भ्रमण करविण्याची शक्ती राहत नाही.

जेव्हा संपूर्ण कर्म दुसऱ्याच्या सेवेसाठीच केले जातील, आपल्यासाठी नव्हे, तेव्हाच कामनेचा त्याग होऊ शकतो. कारण संपूर्ण कर्मांचा संबंध संसाराशी आहे आणि आपला (स्वरूपाचा) संबंध परमात्म्याशी आहे. आपल्याशी कर्माचा संबंध नाहीच. म्हणून जोपर्यंत आपल्यासाठी कर्म केले जातील तोपर्यंत कामनेचा त्याग होणार नाही आणि जोपर्यंत कामनेचा त्याग होणार नाही तोपर्यंत निष्कर्मता प्राप्त होणार नाही.

**न च सन्न्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति**—या श्लोकाच्या पूर्वार्धात भगवंतांनी कर्मयोगाच्या दृष्टीने म्हटले

* जो पुरुष योगारूढ होऊ इच्छितो, आपल्या ठिकाणी समता आणू इच्छितो, त्याच्यासाठी निष्कामभावनेने (कर्मयोगाच्या दृष्टीने) कर्म करणे आवश्यक आहे. ''आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते'' (६। ३) जर त्याने कर्म केलेच नाही तर त्याला कसे समजणार की, आपण सिद्धी-असिद्धीमध्ये सम राहिलो होतो अथवा विचलित झालो होतो?

आहे की, कर्माचा आरंभ केल्याशिवाय कर्मयोग्याला नैष्कर्मतेची प्राप्ती होत नाही. आता श्लोकाच्या उत्तरार्धात सांख्ययोगाच्या दृष्टीने म्हणतात की, केवळ कर्मांचा स्वरूपाने त्याग केल्याने सांख्ययोग्याला सिद्धी अर्थात् नैष्कर्मतेची प्राप्ती होत नाही. सिद्धीच्या प्राप्तीसाठी त्याला कर्तेपणाचा (अहंता) त्याग करणे आवश्यक आहे. म्हणून सांख्ययोग्यासाठी कर्मांचा स्वरूपाने त्याग करणे मुख्य नाही तर अहंतेचा त्याग करणेच मुख्य आहे.

सांख्ययोगात कर्म केलेही जाऊ शकतात आणि काही सीमेपर्यंत कर्मांचा त्यागही केला जाऊ शकतो. परंतु कर्मयोगात सिद्धीप्राप्तीसाठी कर्म करणे आवश्यक असते. (गीता ६ । ३)

## मार्मिक गोष्ट

श्रीमद्भगवद्गीता मनुष्याला व्यवहारात परमार्थ सिद्ध कसा करावा ही कला शिकविते. तिचा आशय कर्तव्यकर्म करविण्यात आहे त्याग करविण्यात नव्हे. म्हणून भगवान् कर्मयोग आणि ज्ञानयोग दोन्हीही साधनांत कर्म करण्या-विषयी सांगतात.

ही एक स्वाभाविक गोष्ट आहे की, जेव्हा साधक आपले कल्याण इच्छितो तेव्हा तो सांसारिक कर्माविषयी उद्विग्न होतो आणि त्यापासून अलिप्त होऊ इच्छितो. याच कारणाने अर्जुनही कर्माविषयी उद्विग्न होऊन भगवंताला प्रश्न करतात की, जर कर्मयोग आणि ज्ञानयोग—या दोन्हीही साधनांचे तात्पर्य समतेशी आहे तर मग आपण कर्म करण्या-विषयी का सांगत आहात? मला युद्धासारख्या घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात? परंतु भगवंतांनी दोन्हीही प्रकारच्या साधनातून अर्जुनाला कर्म करण्याची आज्ञा दिली आहे. जसे—कर्मयोगात-"**योगस्थः कुरु कर्माणि**" (२ । ४८) आणि सांख्ययोगात "**तस्माद्युध्यस्व भारत**" (२ । १८) यावरुन सिद्ध होते की, भगवंताचा अभिप्राय कर्मांचा स्वरूपाने त्याग करविण्याविषयी नाही तर कर्म करविण्यात आहे. मात्र कर्मामध्ये जो विषारी अंश—कामना, ममता आणि आसक्ती आहे त्याचा त्याग करूनच कर्म करण्याची आज्ञा देतात.

कर्मांचा स्वरूपतः त्याग करण्यापेक्षा साधकाने त्याच्याशी आपला संबंध-विच्छेद करून घ्यावा. कर्मयोगी निःस्वार्थ भावाने कर्म करीत असताना शरीर, इंद्रिये, मन बुद्धी पदार्थ इत्यादींना संसाराच्या वस्तू समजून संसाराच्या सेवेमध्ये लावतो आणि कर्म तसेच पदार्थांशी आपला काहीही संबंध नाही असे समजतो (५ । ११). ज्ञानयोगात सत् असत्च्या विवेकाची प्रधानता असते. म्हणून ज्ञानयोगी असे समजतो की, गुणच गुणांत वर्तन करीत आहेत अर्थात् शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीकडूनच कर्म होत आहेत. माझा कर्माशी मुळीच संबंध नाही. (३ । २८, ५ । ८-९)

बहुतेक सर्व साधकांच्या अनुभवाची गोष्ट अशी आहे की, कल्याणाची उत्कट अभिलाषा जागृत होताच कर्म, पदार्थ आणि व्यक्ती (परिवार) ह्याबद्दल त्याला अरुची होऊ लागते. परंतु प्रत्यक्षात देहाशी घनिष्ट संबंध असल्याने आराम-विश्रामाची इच्छा राहते जी साधकाच्या उन्नतीत बाधक आहे. साधकांच्या मनात असा भाव असतो की, कर्म, पदार्थ आणि व्यक्तीचा स्वरूपतः त्याग केल्यावरच आम्ही परमार्थ मार्गात उन्नत होऊ शकतो. परंतु वास्तविक त्यांचा स्वरूपतः त्याग न करता त्यांच्या विषयीच्या आसक्तीचा त्याग करणेच आवश्यक आहे. सांख्ययोगात उत्कट वैराग्याशिवाय आसक्तीचा त्याग करणे कठीण जाते परंतु कर्मयोगात वैराग्याची उणीव असली तरीही केवळ दुसऱ्यासाठी कर्म केल्याने आसक्तीचा त्याग सुगम होतो.

गीतेने एकांतात राहून साधन करण्याचाही आदर केला आहे परंतु एकांतात सात्त्विक पुरुष तर साधन-भजनात आपला समय व्यतीत करतो. परंतु राजस पुरुष संकल्प-विकल्पात, तामस पुरुष निद्रा-आळस-प्रमाद यात आपला समय खर्च करतो जो पतन करणारा आहे. म्हणून साधकाची रुची तर एकांतातच राहण्याची असावी अर्थात् सांसारिक कर्मांचा त्याग करून पारमार्थिक कार्य करण्यातच त्याची प्रवृत्ती असावी. परंतु कर्तव्यरूपाने जे कर्म समोर येईल ते त्याने तत्परतेने केले पाहिजे. त्या कर्मात त्याची आसक्ती असू नये. जनसमुदायाविषयीही आसक्ती असू नये आणि कर्म न करण्यातही आसक्ती असू नये. कोठेही आसक्ती न राहिल्यास साधकाचे कल्याण फार लवकर होते. वास्तविक पाहता शरीराला एकांतात घेऊन जाण्यासच एकांत समजणे चुकीचे आहे. कारण शरीर संसाराचाच एक अंश आहे. म्हणून शरीराशी सबंध-विच्छेद होणे अर्थात् त्याच्या-विषयी अहंता, ममता न राहणेच वास्तविक एकांत आहे.

**परिशिष्ट भाव**—जे आपले आहे, आपल्यात आहे आणि आत्ता आहे त्या तत्त्वाची प्राप्ती काही केल्याने होत नाही, कारण त्याची अप्राप्ती कधी होतच नाही. आपण काही करू मग त्याची प्राप्ती होईल—हा भाव देहाभिमानाला पुष्ट करणारा आहे. प्रत्येक क्रियेचा आरंभ आणि अंत होतो. म्हणून क्रिया करण्याने त्याची प्राप्ती होईल, जो विद्यमान नाही.

परंतु प्रकृतीशी संबंध झाल्यामुळे प्रत्येक प्राण्यात क्रियेचा वेग राहतो, जो त्याला क्रियारहित होऊ देत नाही. क्रियेचा

वेग शांत करण्यासाठी हे आवश्यक आहे की, जे करावयास नको ते करू नये आणि जे केले पाहिजे ते निर्मम आणि निष्काम होऊन करावे अर्थात् आपल्यासाठी काहीही करू नये, तर केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच करावे. आपल्यासाठी क्रिया करण्याने क्रियेचा वेग कधी समाप्त होणार नाही. कारण आपले स्वरूप नित्य आहे आणि कर्म अनित्य आहे. म्हणून निष्कामभावाने दुसऱ्याच्या हितासाठी कर्म केल्याने क्रियेचा वेग शांत होऊन प्रकृतीशी संबंध-विच्छेद होईल आणि सर्व देशात, कालात इत्यादीत विद्यमान असणारे परमात्मतत्त्व प्रगट होईल, त्याचा अनुभव होईल.

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कश्चित् हि** | = कोणताही (मनुष्य) | **तिष्ठति** | = राहू शकत | **सर्वः** | = सर्व प्राण्यांकडून |
| **जातु** | = कोणत्याही अवस्थेत | **न** | = नाही | **प्रकृतिजैः** | = प्रकृतिजन्य |
| | | **हि** | = कारण | **गुणैः** | = गुण |
| **क्षणम् अपि** | = क्षणमात्रही | **अवशः** | = (प्रकृतीला) परवश झालेल्या | **कर्म** | = कर्म |
| **अकर्मकृत्** | = कर्म केल्याविना | | | **कार्यते** | = करवित असतात. |

***व्याख्या*— न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्**—कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—या कोणत्याही मार्गात साधक कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. या ठिकाणी ''**कश्चित्**'', ''**क्षणम्**'' आणि ''**जातु**'' हे तिन्ही विलक्षण पद ओहत. यापैकी ''**कश्चित्**'' पदाचा प्रयोग करून भगवान म्हणतात की, कोणताही मनुष्य कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही मग तो ज्ञानी असो की अज्ञानी! जरी ज्ञानी व्यक्तीचा आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीराशी कोणताही संबंध नसतो तरीपण त्याचे म्हणविल्या जाणाऱ्या शरीराकडूनही प्रत्येक क्षणाला क्रिया होत राहते. ''**क्षणम्**'' पदाचा प्रयोग करून भगवान् म्हणतात की, जरी मनुष्य मी प्रत्येक क्षणाला कर्म करतो असे मानत नाही तरीपण जोपर्यंत तो शरीराशी आपला सबंध मानतो, तोपर्यंत तो एक क्षणही कर्म केल्याशिवाय राहत नाही. ''**जातु**'' पदाचा प्रयोग करून भगवान् हे म्हणतात की, जागृती, सुषुप्ती, स्वप्न, मूर्च्छा इत्यादी कोणत्याही अवस्थेत मनुष्य कर्म केल्यावाचून राहू शकत नाही. याचे कारण भगवान् याच श्लोकाच्या उत्तरार्धात ''**अवशः**'' पदांनी सांगतात की, प्रकृतीला परवश झाल्यामुळे त्याला कर्म करावेच लागतात. प्रकृती निरंतर परिवर्तनशील आहे. साधकाला आपल्यासाठी काहीच करावयाचे नाही. जे विहित कर्म समोर येईल ते केवळ दुसऱ्याच्या हिताच्या दृष्टिकोनातून केले पाहिजे. परमात्मप्राप्तीचा उद्देश असल्याने साधक निषिद्ध कर्म तर करूच शकत नाही.

बहुतेक लोक केवळ स्थूल शरीराच्या क्रियानांच कर्म समजतात. परंतु गीता मनाच्या क्रियांनाही कर्म समजते. गीतेने शारीरिक, वाचिक आणि मानसिकरूपाने झालेल्या सर्व क्रियांना कर्म मानले आहे. ''**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः**'' (१८।१५) ज्या शारीरिक अथवा मानसिक क्रियाशी मनुष्य आपला संबंध मानतो त्याच सर्व क्रिया ''कर्म'' होऊन त्याला बांधणाऱ्या होतात दुसऱ्या क्रिया नव्हे.

माणसाची अशी एक समजूत झाली आहे की, ते अपत्यसंगोपन, तसेच उदरनिर्वाहाची साधने—व्यापार, नोकरी, अध्यापन इत्यादीलाच कर्म समजतात आणि त्या व्यतिरिक्त खाणे-पिणे, बसणे-उठणे, झोपणे, चिंतन करणे इत्यादींना कर्म मानीत नाहीत. याच कारणाने कित्येक जण व्यापार इत्यादी कर्मांचा त्याग करून असे समजतात की, मी कर्म करीत नाही. परंतु ही त्यांची फार मोठी गैर समजूत आहे. शरीरनिर्वाहसंबंधी स्थूलशरीराच्या क्रिया, झोप, चिंतन इत्यादी सूक्ष्मशरीराच्या क्रिया आणि समाधी इत्यादी कारण शरीराच्या क्रिया ही सर्व कर्मच आहेत. जोपर्यंत शरीराविषयी अहंता ममता आहे तोपर्यंत शरीराकडून होणाऱ्या सर्व क्रिया ''कर्म'' होतात. कारण शरीर प्रकृतीचे कार्य आहे आणि प्रकृती कधी अक्रिय राहत नाही. म्हणून शरीराविषयी अहंता ममता असताना, कोणीही मनुष्य, कोणत्याही अवस्थेत, क्षणभरसुद्धा कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही मग ती अवस्था प्रवृत्तीची असो की निवृत्तीची!

**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः**—प्रकृतिजन्य गुण प्रकृतीशी परवश झालेल्या प्राण्याकडून कर्म करवितात. परवश झाल्याने प्रकृतीच्या गुणांद्वारा कर्म करविले जातात. कारण प्रकृती आणि तिचे गुण निरंतर क्रियाशील असतात (३।२७, १३।२९). जरी आत्मा स्वतः अक्रिय, असंग, अविनाशी, निर्विकार तसेच निर्लिप्त आहे, तरीपण जोपर्यंत तो प्रकृती तसेच तिचे कार्य स्थूल सूक्ष्म आणि कारण शरीरापैकी कोणत्याही शरीराशी आपला संबंध समजून,

त्यापासून सुख इच्छितो तोपर्यंत तो प्रकृतीला परवश राहतो. (१४।५) याच परवशतेला याठिकाणी "**अवशः**" पद म्हटले आहे. नवव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात आणि आठव्या अध्यायाच्या एकोणीसाव्या श्लोकातही प्रकृतीशी संबंध ठेवल्याने परवश झालेल्या जीवाकडून कर्म केले जाते ह्याविषयी म्हटले आहे.

वृत्तींपासून स्वभाव तयार होतो, गुणांपसून वृत्ती उत्पन्न होते आणि प्रकृतीपासून गुण निर्माण होतात म्हणून मग स्वभावामुळे परवश म्हणा कि गुणामुळे परवश म्हणा अथवा प्रकृतीमुळे परवश म्हणा, एकच गोष्ट आहे. वास्तविक पाहता सर्वांच्या मुळाशी प्रकृतिजन्य पदार्थांची परवशताच आहे. याच परवशतेपासून सर्व प्रकारच्या परवशता निर्माण होतात. म्हणून प्रकृतिजन्य पदार्थांच्या परवशतेलाच कुठे काळाची, कुठे स्वभावाची, कुठे कर्माची आणि कुठे गुणाची परवशता म्हटले आहे. तात्पर्य हा जीव जोपर्यंत प्रकृती आणि तिच्या गुणांपासून अतीत होत नाही, परमात्म्याची प्राप्ती करून घेत नाही तोपर्यंत हा गुण, काळ, स्वभाव इत्यादिकांच्या परवशच राहतो अर्थात् हा जीव जोपर्यंत प्रकृतीशी आपला संबंध आहे असे समजतो, प्रकृतीत स्थित राहतो, तोपर्यंत हा कधी गुणाच्या, कधी काळाच्या, कधी भोगांच्या, कधी स्वभावाच्या परवश होत राहतो, कधीही स्वतंत्र राहत नाही. याशिवाय हा परिस्थिती व्यक्ती, स्त्री, पुत्र धन घर इत्यादिकांच्यासुद्धा परवश होत राहतो. परंतु जर त्याने गुणांहून अतीत आपल्या स्वरूपाचा अथवा परमात्मतत्त्वाचा अनुभव केला तर मग याची ही परवशता राहणार नाही आणि हा स्वतः सिद्ध स्वतंत्रतेला प्राप्त होईल.

## विशेष गोष्ट

प्रकृतीच्या सक्रिय (स्थूल) आणि अक्रिय (सूक्ष्म) दोन अवस्था असतात. जसे कार्य करणे सक्रिय अवस्था आहे आणि कार्य न करणे (झोप वगैरे) अक्रिय अवस्था आहे. वास्तविक पाहता अक्रिय अवस्थेतही प्रकृती अक्रिय राहत नाही तर तिच्यात सूक्ष्मरूपाने सक्रियता राहते. जसे एखाद्या झोपलेल्या मनुष्याला स्वतःहून जागे होण्यापूर्वीच उठवले तर तो म्हणतो की,माझी झोप पूर्ण झाली नाही. यावरुन हे सिद्ध होते की, झोपेच्या अक्रिय अवस्थेतही झोप पूर्ण होण्याची क्रिया होत होती. जेव्हा झोप पूर्ण झाल्यावर मनुष्य जागा होतो तेव्हा तो असे म्हणत नाही. कारण झोप पूर्ण झालेली असते. त्याचप्रमाणे समाधी, प्रलय, महाप्रलय इत्यादींच्या अवस्थेतही सूक्ष्मरूपाने क्रिया होत असते.

वास्तविक पाहता प्रकृतीची कधी अक्रिय अवस्था नसतेच. कारण ती क्षणाक्षणाला परिवर्तित होत असते. स्वतः आत्म्यात कर्तेपणा नसतो परंतु प्रकृतीचे कार्य शरीरादीशी आपला संबंध मानून तो प्रकृतीशी परवश होतो. याच परवशतेच्या कारणाने "स्व" अकर्ता असूनसुद्धा तो आपल्याला कर्ता समजतो. वस्तुतः आत्म्यात कोणतीही परिवर्तनरूप क्रिया होत नाही. जसे प्रकृतीद्वारा संपूर्ण सृष्टीच्या क्रिया स्वाभाविक रीतीने होत आहेत, तसेच तिच्याद्वारा कौमार्य, तारुण्य इत्यादी अवस्था आणि अन्नपचन, श्वासोच्छ्वास इत्यादी क्रिया तसेच पाहणे, ऐकणे इत्यादी क्रिया देखील स्वाभाविकपणेच होत आहेत. परंतु जीवात्मा काही क्रियाविषयी आपल्याला कर्ता मानून बांधला जातो.

प्रकृती निरंतर परिवर्तनशील आहे परंतु शुद्ध स्वरूपात कधी कोणतेही परिवर्तन होत नाही. खरे पाहिले तर प्राकृतिक पदार्थांना कोणतीही स्वतंत्र सत्ता नाही. क्षणाक्षणाला बदलणाऱ्या, एकत्रित झालेल्या परमाणूंचे नावच पदार्थ असे आहे. पदार्थाशी आपला संबंध मानल्याने कोणताही मनुष्य कोणत्याही अवस्थेत क्षणभर देखील कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. जर साधक असा वास्तविक अनुभव करील की, संपूर्ण क्रिया पदार्थातच होत आहेत आणि माझा पदार्थाशी किंचिन्मात्रसुद्धा संबंध नाही तर तो परवशतेतून मुक्त होऊ शकतो. कर्मयोगी प्रतिक्षण बदलणाऱ्या पदार्थांच्या, कामना, ममता आणि आसक्तीचा त्याग करून या परवशतेला नष्ट करतो.

भगवंतांनी या श्लोकात जी गोष्ट सांगितली तीच गोष्ट त्यांनी अठराव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकातही सांगितली आहे की, प्रकृतीशी आपला संबंध मानणारा कोणताही मनुष्य कर्माचा संपूर्णपणे त्याग करू शकत नाही. "**न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः**".

**परिशिष्ट भाव**—सर्व क्रिया केवळ प्रकृतीतच होतात. परंतु प्रकृतीशी आपले तादात्म्य स्वीकार केल्याने मनुष्य प्रकृतिजन्य गुणांच्या अधीन होतो—'**अवशः**' आणि त्याचा क्रियेशी संबंध होतो. म्हणून प्रकृतीशी आपला संबंध मानणारा कोणताही मनुष्य जागृती, स्वप्न, सुषुप्ती, मूर्च्छा, समाधी आणि सर्ग-महासर्ग, प्रलय-महाप्रलय इत्यादी कोणत्याही अवस्थेत क्षणमात्रही कर्म केल्याविना राहू शकत नाही.

सुषुप्ती, मूर्च्छा आणि समाधी-अवस्थेत क्रिया कशी होते? मनुष्य झोपला असेल आणि कोणी त्याला मध्येच जागे करील तर तो म्हणतो की, मला अपुऱ्या झोपेत जागे केले! यावरुन सिद्ध होते की, सुषुप्तीच्या वेळीही झोप पूरी होण्याची क्रिया होत

होती. तसेच मूर्च्छा आणि समाधीच्या वेळीही क्रिया होत असते. पातंजलयोगदर्शनात या क्रियेला 'परिणाम' नावाने म्हटले आहे.* 'परिणाम' चा अर्थ आहे—परिवर्तनाची धारा अर्थात् बदलण्याचा प्रवाह.† तात्पर्य हे आहे की, समाधीच्या आरंभापासून व्युत्थान होण्या पर्यंत क्रिया होत राहते. जर क्रिया झाली नसेल तर व्युत्थान होऊच शकत नाही. समाधीच्या वेळी परिणाम होतो आणि समाधीच्या शेवटी व्युत्थान होते.

प्रकृतीच्या संपूर्ण अवस्थाहून अतीत आहे—सहजावस्था अथवा सहज समाधी. सहजावस्था स्वरूपाची असते, ज्यात किंचिन्मात्र कोणतीही क्रिया नसते, क्रिया होणे संभवतच नाही. म्हणून सहजावस्थेत परिणाम तसेच व्युत्थान कधी होतच नाही. कारण क्रिया प्रकृति-विभागातच होतात, स्वरूप-विभागात नव्हे.

**'कार्यते ह्यवशः कर्म'**—कर्म करण्यात तर आपण परतंत्र आहोत, परंतु त्यात रागद्वेश करण्यात अथवा न करण्यात आपण स्वतंत्र आहोत.

***संबंध***—*मागील श्लोकात हे म्हटले गेले आहे की, कोणताही मनुष्य कोणत्याही अवस्थेत क्षणभरही कर्म केल्याशिवाय राहत नाही. यावर ही शंका होऊ शकते की, मनुष्य इंद्रियांच्या क्रियांना हट्टाने रोखूनसुद्धा आपल्याला अक्रिय मानू शकतो. याचे समाधान करण्यासाठी पुढील श्लोक सांगतात.*

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्।**
**इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते॥ ६॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो | **इन्द्रियार्थान्** | = इंद्रियांच्या विषयांचे | | असणारा मनुष्य |
| **कर्मेन्द्रियाणि** | = कर्मेन्द्रियांना (संपूर्ण इंद्रियांना) | **स्मरन्** | = चिंतन करीत | **मिथ्याचारः** | = मिथ्याचारी (मिथ्या आचरण करणारा) |
| **संयम्य** | = (हट्टाने) रोखून | **आस्ते** | = असतो, | | |
| **मनसा** | = मनाने | **सः** | = तो | | |
| | | **विमूढात्मा** | = मूढ बुद्धी | **उच्यते** | = म्हटला जातो. |

*व्याख्या*— **कर्मेन्द्रियाणि संयम्य......मिथ्याचारः स उच्यते**—या ठिकाणी "**कर्मेन्द्रियाणी**" पदाचा अभिप्राय पाच कर्मेंद्रिये (वाक, हस्त, पाद, उपस्थ आणि गुदा) यांचेशीच नाही तर पाच ज्ञानेंद्रिये (श्रोत्र, त्वचा, नेत्र, रसना आणि घ्राण) यांच्याशीही आहे. कारण ज्ञानेंद्रियावाचून केवळ कर्मेंद्रियांकडून कर्म होऊ शकत नाहीत. या व्यतिरिक्त केवळ हातपाय इत्यादी कर्मेंद्रियांना रोखल्याने तसेच कान इत्यादी ज्ञानेंद्रियांना जर रोखले नाही तर पूर्ण दांभिकपणाही सिद्ध होत नाही.

गीतेत कर्मेंद्रियांच्या अंतर्गतच ज्ञानेंद्रियांना मानले गेले आहे. म्हणून गीतेत "कर्मेन्द्रिय" शब्द तर येतो परंतु "ज्ञानेन्द्रिय" शब्द कोठे येत नाही. पाचव्या अध्यायाच्या आठव्या-नवव्या श्लोकात पाहणे, ऐकणे, स्पर्श करणे इत्यादी ज्ञानेंद्रियांच्या क्रियांनाही कर्मेंद्रियांच्या क्रियांशी सम्मिलित केले गेले आहे. यावरुन सिद्ध होते की, गीता ज्ञानेंद्रियांनाही कर्मेंद्रियच समजते. गीता मनाच्या क्रियांनाही कर्म मानते. "**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः**" (१८।१५) तात्पर्य संपूर्ण प्रकृती क्रियाशील असल्यामुळे प्रकृतीचे कार्यही क्रियाशील आहे.

**संयम्य**—यद्यपि या पदाचा अर्थ इंद्रियांचे योग्य प्रकाराने नियमन करणे असा आहे अर्थात् त्यांना वश करणे असा आहे तरीपण या ठिकाणी या पदाचा अर्थ इंद्रियांना वश करणे नसून त्यांना हट्टाने बाहेरून रोखणे असाच आहे. कारण की, इंद्रिय वश झाल्यास त्याला मिथ्याचार म्हणता येत नाही.

मूढबुद्धी असणारा (सत्-असत्चा विवेकरहित) मनुष्य बाहेरुन तर इंद्रियांच्या क्रियांना हट्टाने रोखतो परंतु मनाने त्या इंद्रियांच्या विषयाचे चिंतन करीत राहतो आणि अशा स्थितीला क्रियारहित मानून घेतो. म्हणून तो दांभिक अर्थात् दांभिक आचरण करणारा म्हटला जातो.

* व्युत्थाननिरोधसंस्कारयोरभिभव प्रादुर्भावौ निरोधक्षणचित्तान्वयो निरोध परिणामः ॥ ९ ॥ सर्वार्थतैकाग्रतयोः क्षयोदयौ चित्तस्य समाधि परिणामः ॥ १० ॥ ततः पुनः शान्तोदितौ तुल्यप्रत्ययौ चित्तस्यैकाग्रता परिणामः ॥ ११ ॥ (विभूतिपाद)

† 'अथ कोऽयं परिणामः ? अवस्थितस्य द्रव्यस्य पूर्वधर्मनिवृत्तौ धर्मान्तरोत्पत्तिः परिणामः' (योगदर्शन, विभूति० १३ चे व्यासभाष्य) 'हा परिणाम काय आहे ? अवस्थित द्रव्याच्या पूर्वी धर्माची निवृत्ती होऊन अन्य धर्माची उत्पत्ती (अवस्थान्तर) हाच 'परिणाम' आहे.'

जरी त्याने इंद्रियांच्या विषयांचा बाहेरून त्याग केला आहे आणि असे समजतो की, मी कर्म करीत नाही तरीपण अशा स्थितीतही तो वस्तुत: कर्मरहित झालेला नाही. कारण बाहेरुन क्रियारहित दिसत असूनसुद्धा अहंता, ममता आणि कामनेमुळे आसक्तिपूर्वक विषय चिंतनाच्या रूपात विषयभोगरूप कर्म तर होतच आहे.

सांसारिक भोगांना बाहेरुनही भोगले जाऊ शकते आणि मनानेही भोगले जाऊ शकते. बाहेरुन आसक्तिपूर्वक भोगांना भोगल्याने अंत: करणात भोगाविषयीचे जसे संस्कार पडतात तसेच संस्कार मनाने भोगांना भोगल्याने अर्थात् आसक्तिपूर्वक भोगांच्या चिंतन करण्यानेही पडतात. बाहेरुन भोगांचा त्याग तर मनुष्य विचाराने, लोक-लज्जेच्या भीतीने आणि व्यवहार सुरळीत चालणार नाहीत या भीतीनेही करू शकतो. परंतु मनाने भोग भोगण्यात बाहेरची कोणतीच बाधा येत नाही. म्हणून तो मनाने भोगाना भोगत राहतो आणि खोटा अभिमान करतो की, मी भोगांचा त्यागी आहे. मनाने भोग भोगल्याने विशेष हानी होते कारण त्याच्या सेवनास भरपूर अवसर मिळतो. म्हणून साधकांनी बाह्य भोगांच्या त्यागाप्रमाणेच मनातील भोगाच्या चिंतनाचा देखील विशेष सावधानीने त्याग करावा.

अर्जुनसुद्धा कर्मांचा स्वरूपाने त्याग करू इच्छित आहेत आणि भगवंतांना विचारीत आहेत की, आपण मला घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात? याच्या उत्तरात या ठिकाणी भगवंत म्हणतात की, जो मनुष्य अहंता, ममता, आसक्ती, कामना इत्यादी मनामध्ये ठेवून केवळ बाहेरुन कर्मांचा त्याग करून आपल्याला क्रियारहित मानतो त्याचे आचरण दांभिकपणाचे आहे. तात्पर्य साधकांनी कर्मांचा स्वरूपाने त्याग न करता कामना, आसक्तिरहित होऊन तत्परतेने कर्म करीत राहिले पाहिजे.

**परिशिष्ट भाव**—सांसारिक भोगांना बाहेरुनही भोगले जाऊ शकते आणि मनानेही. बाहेरुन भोग भोगणे आणि मनाने त्याच्या चिंतनाचा रस (सुख) घेणे—दोन्हीत कोणताही फरक नाही. बाहेरुन आसक्तिपूर्वक भोग भोगल्याने जसा संस्कार पडतो तसाच संस्कार मनाने भोग भोगल्याने अर्थात् मनाने भोगांच्या चिंतनाचा रस घेण्याने पडतो. भोगाचे स्मरण झाल्यावर त्याच्या स्मरणाने रस घेतात तर कित्येक वर्ष गेले तरीही ते भोग जसेच्या तसे (ताजे) कायम राहतात. म्हणून भोगाच्या चिंतनानेही एक नवीन भोग बनतो! इतकेच नव्हे, मनाने भोगांच्या चिंतनाचे सुख घेण्याने विशेष हानी होते. कारण लोक लज्जेमुळे, व्यवहारात भानगड होईल या भीतीने मनुष्य बाहेरुन तर भोगांचा त्याग करू शकतो, परंतु मनाने भोग भोगण्यात बाहेरुन कोणती बाधा येत नाही. म्हणून मनाने भोग भोगण्यासाठी विशेष अवसर मिळतो. म्हणून मनाने भोग भोगणे साधकासाठी फार नुकसान करणारी गोष्ट आहे. वास्तविक मनाने भोगांचा त्याग हाच वास्तविक त्याग आहे (गीता—दुसऱ्या अध्यायाचा चौसष्टावा श्लोक)

*संबंध—चौथ्या श्लोकात भगवंतांनी कर्मयोग आणि सांख्ययोगाच्या दृष्टीने कर्मांचा त्याग अनावश्यक दाखविला. नंतर पाचव्या श्लोकात म्हटले की, कोणताही मनुष्य कोणत्याही अवस्थेत क्षणभरसुद्धा कर्म केल्याशिवाय राहू शकत नाही. सहाव्या श्लोकात हट्टाने इंद्रियांच्या क्रियांना रोखून आपल्याला क्रियारहित समजणाऱ्याचे आचरण दांभिक म्हटले. यावरुन सिद्ध झाले की, कर्मांचा स्वरूपाने त्याग करण्याने तो त्याग वास्तविक त्याग होत नाही. म्हणून पुढील श्लोकात भगवान् वास्तविक त्यागाचा परिचय देत आहेत.*

## यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन।
## कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते॥ ७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **नियम्य** | = नियंत्रण करून | | (समस्त इंद्रियांद्वारा) |
| **अर्जुन** | = हे अर्जुन! | **असक्तः** | = आसक्तिरहित होऊन (निष्काम-भावाने) | **कर्मयोगम्** | = कर्मयोगाचे |
| **यः** | = जो (मनुष्य) | | | **आरभते** | = आचारण करतो, |
| **मनसा** | = मनाने | | | **सः** | = तोच |
| **इन्द्रियाणि** | = इंद्रियांवर | **कर्मेन्द्रियैः** | = कर्मेन्द्रियांद्वारा | **विशिष्यते** | = श्रेष्ठ आहे. |

*व्याख्या*— **तु**—या ठिकाणी अनासक्त होऊन कर्म करणाऱ्यांना, केवळ दांभिक लोकांपेक्षाच नाही तर सांख्ययोग्यापेक्षाही श्रेष्ठ दाखविण्याच्या दृष्टिकोनातून "तु" पद दिले गेले आहे.

**अर्जुन**—या शब्दाचा अर्थ स्वच्छ असा होतो. या ठिकाणी भगवंतांनी "**अर्जुन**" संबोधनाचा प्रयोग करून हा भाव दाखविला आहे की, तू निर्मळ अंत:करणाने युक्त आहेस मग तुझ्या अंत:करणात कर्तव्यकर्म विषयक हा संदेह कसा

निर्माण झाला? अर्थात् हा संदेह तुझ्यात स्थिर राहू शकत नाही.

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्य**—येथे "**मनसा**" पद संपूर्ण अंत:करण (मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार) याचा वाचक आहे आणि "**इंद्रियाणि**" पद सहाव्या श्लोकात आलेल्या "**कर्मेन्द्रियाणि**" पदाप्रमाणेच दहाही इंद्रियांचा वाचक आहे.

मनाने इंद्रियांना वश करण्याचे तात्पर्य हे आहे की, विवेकवती बुद्धीद्वारा "मन आणि इंद्रियांशी 'स्व' चा काही-ही संबंध नाही". असा अनुभव करणे. मनाने इंद्रियांचे नियमन केल्यास इंद्रियांचा आपला स्वतंत्र हट्ट राहत नाही अर्थात् त्यांना जिकडे वळवाल तिकडे वळतील आणि जेथून त्यांना परावृत्त कराल तेथून ते परावृत्त होतील.

इंद्रियांचे ठिकाणी ममतेचा (माझेपणा) संपूर्णतया अभाव झाल्यासच इंद्रिये वश होतात. बाराव्या अध्यायाच्या अकराव्या श्लोकातही कर्मयोग्यासाठी इंद्रियांना वश करण्याविषयी कथन आले आहे "**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान्**"। तात्पर्य वश झालेल्या इंद्रियांकडूनच कर्मयोगाचे आचरण होते.

मागील (सहाव्या) श्लोकात भगवंतांनी "**संयम्य**" पदाने दंभाचाराच्या विषयात इंद्रियांना हट्टाने रोखून धरण्या-विषयीचे विवेचन केले होते. परंतु या ठिकाणी "**नियम्य**" पदाने शास्त्रमर्यादेनुसार इंद्रियांचे नियमन करण्याविषयीचे (निषिद्ध कर्मापासून परावृत्त करून इंद्रियांना शास्त्रविहित कर्तव्यकर्मामध्ये प्रवृत्त करणे) विवेचन केले आहे. नियमन झाल्यास इंद्रियांचा संयम आपोआप होतो.

**असक्तः**—आसक्ती दोन ठिकाणी होत असते (१) कर्मांत (२) कर्मफलांत. संपूर्ण दोष आसक्तीतच असतात, कर्म किवा त्यांच्या फलात नव्हे. आसक्ती असताना योग सिद्ध होऊ शकत नाही. आसक्तीचा त्याग होताच योग सिद्ध होतो. म्हणून साधकांनी कर्मांचा त्याग न करता त्यामध्ये असलेल्या आसक्तीचाच त्याग केला पाहिजे. आसक्तिरहित होऊन सावधानीने आणि तत्परतेने कर्तव्यकर्माचे आचरण केल्याशिवाय कर्माशी संबंध-विच्छेद होऊ शकत नाही. साधक जेव्हा शरीर, इंद्रिय, मन, बुद्धीला "माझे" आणि "माझ्यासाठी" न समजता केवळ संसाराचे आणि संसारा-साठीच समजून संसाराच्या हितासाठी तत्परतेने कर्तव्य-कर्माचे आचरण करू लागतो तेव्हा तो आसक्तिरहित होतो. जर तो आपल्यासाठी कोणतेही कर्म न करता केवळ दुसऱ्याच्या हितासाठी संपूर्ण कर्म करतो तेव्हा त्याची आपली फलासक्ती आपोआप नष्ट होते.

कर्मेंद्रियांनी होणाऱ्या साधारण क्रियांपासून ते चिंतन तसेच समाधीपर्यंतच्या सर्व क्रियांचा आमच्या स्वरूपाशी कोणताच संबंध नाही (५।११). परंतु स्वरूपाने अनासक्त असूनही हा जीवात्मा स्वतः आसक्त होऊन संसाराशी आपला संबंध जोडून घेतो.

कर्मयोग्याचे वास्तविक महत्त्व आसक्तिरहित होण्यातच आहे. कर्मांनी प्राप्त होणाऱ्या कोणत्याही फलाची इच्छा न ठेवणे अर्थात् त्यापासून संपूर्णपणे असंग होणे हेच आसक्तिरहित होणे आहे.

सामान्य माणूस तर आपल्या कामनेच्या सिद्धीसाठीच एखाद्या कार्यात प्रवृत्त होतो. परंतु साधक आसक्तीच्या त्यागाचा उद्देश ठेवूनच एखाद्या कार्यात प्रवृत्त होतो. अशा साधकालाच येथे "**असक्तः**" म्हटले गेले आहे.

जर ज्ञानयोगी आणि कर्मयोगी—दोन्हीही फलेच्छा आणि आसक्तीचा त्याग करतात तर ज्ञानयोगापेक्षा कर्मयोग अधिक सुगम सिद्ध होतो. कारण कर्मयोग्याला परत दुसऱ्या कोणत्या अन्य साधनेची आवश्यकता राहत नाही. परंतु ज्ञानयोग्याला देहाभिमान आणि क्रिया-पदार्थाविषयी आसक्ती नाहीशी करण्यासाठी कर्मयोगाची (निष्कामभावनेने कर्म करणे) आवश्यकता असते (५।६, १५।११). कर्मयोगात आसक्तीचा त्याग मुख्य आहे ज्यायोगे कर्मयोग्याला समत्वबुद्धीची प्राप्ती होते. म्हणून भगवान् म्हणतात की, कर्मांचा त्याग करण्याची आवश्यकता नाही तर आसक्ति-रहित होऊन कर्म करण्याचीच आवश्यकता आहे.

कर्मांचा त्याग करणे योग्य आहे किंवा नाही—हे पाहणे वस्तुतः गीतेचा सिद्धांतच नाही. गीतेच्या तत्त्वानुसार कर्मामध्ये आसक्तीच (दोष असल्यामुळे) त्याज्य आहे. कर्मयोगात "कर्म" नेहमी दुसऱ्याच्या हितासाठीच होतात आणि "योग" आपल्यासाठी होतो. अर्जुन कर्माला "आपल्यासाठी" मानतात. म्हणून त्यांना युद्धरूप कर्तव्यकर्म घोर दिसत आहे. यावर भगवान् असे स्पष्ट सांगतात की, आसक्तीच घोर असते कर्म नव्हे.

**कर्मेन्द्रियैः कर्मयोगम् आरभते**—जसे याच श्लोकाच्या प्रथम चरणात "**इन्द्रियाणि**" पदाचे तात्पर्य दाही इंद्रियांशी आहे तसेच येथे "**कर्मेन्द्रियैः**" पदाला दाही इंद्रियांचा वाचक समजावे. जर "**कर्मेन्द्रियैः**" पदाने हात, पाय, वाणी इत्यादींनाच घेतले गेले तर ऐकल्या-पाहिल्याशिवाय तसेच मनाने विचार केल्याशिवाय कर्म कसे केले जातील? म्हणून या ठिकाणी सर्व करणांना अर्थात् अंत:करण आणि बहि:करण त्यालाही कर्मेन्द्रिय मानले गेले आहे. कारण त्या सर्वांकडून कर्म होतात.

जेव्हा कर्म आपल्यासाठी न करता दुसऱ्याच्या हितासाठी

केले जाते तेव्हा तो कर्मयोग म्हटला जातो. आपल्यासाठी कर्म करण्याने आपला संबंध कर्म तसेच कर्मफलाशी होतो आणि आपल्यासाठी कर्म न करता दुसऱ्यासाठी कर्म केल्याने कर्म तसेच कर्मफलाचा संबंध दुसऱ्याशी आणि परमात्म्याचा संबंध आपल्याशी होतो, जो नित्य आहे. अशा प्रकारे देश, काल, परिस्थिती इत्यादीनुसार प्राप्त कर्तव्य-कर्माला निः स्वार्थभावाने करणे कर्मयोगाचा आरंभ आहे. कर्मयोगी साधक दोन प्रकारचे असतात.

१. ज्याच्या अंत:करणात कर्म करण्याचा आवेग, आसक्ती, रुची तर असते परंतु आपल्या कल्याणाची इच्छा मुख्य असते. अशा साधकासाठी नवनवीन कर्म आरंभ करण्याची आवश्यकता नसते. त्याच्यासाठी केवळ प्राप्त परिस्थितीचा सदुपयोग करण्याची जरूरी आहे.

२. ज्याच्या अंत:करणात आपल्या कल्याणाची इच्छा मुख्य नाही आणि संसाराची सेवा करण्यात, त्यांना सुख पोहचविण्यात तसेच समाजाचा सुधार करण्यात अधिक रुची असते, ज्यायोगे, त्याच्या मनात असे येते की, अमुक-अमुक काम केले गेले तर पुष्कळांची सेवा होऊ शकते, समाजाचा सुधार होऊ शकतो इत्यादी. अशा साधकाने जर नवीन-नवीन कर्मांचा आरंभ केला तर कांहीही हरकत नाही. मात्र नवीन कर्माचा आरंभ केवळ कर्म करण्याची आसक्ती नष्ट करण्यासाठीच केला गेला पाहिजे.

गीतेत भगवंतांनी अर्जुनाला प्राप्त परिस्थितीचा सदुपयोग करण्यासाठीच सांगितले आहे, कारण अर्जुनाचे ठिकाणी कल्याणाची इच्छा मुख्य होती (२।७, ३।२, ५।१).

**स विशिष्यते**—जो आपल्या स्वार्थाचा, फलाच्या आसक्तीचा त्याग करून केवळ प्राण्यांच्या हितासाठी कर्म करतो तो श्रेष्ठ आहे. कारण त्याच्या संपूर्ण क्रियांचा प्रवाह संसाराकडे असल्याने त्याच्यात आपोआप असंगता येते.

साधकाचा जेव्हा आपल्या कल्याणाचा विचार होतो तेव्हा तो कर्मांना साधनेत विघ्न समजून त्यापासून उपरम होऊ इच्छितो. परंतु वास्तविक पाहता कर्म करणे हा दोष नाही, तर सकामभावनेने कर्म करणे हाच दोष आहे. म्हणून भगवान् म्हणतात की, बाहेरुन इंद्रियांचा संयम करून अंत:-करणात विषयाचे चिंतन करणाऱ्या दांभिक पुरुषापेक्षा आसक्तिरहित होऊन दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करणारा श्रेष्ठ आहे. तसे जर पाहिले तर दांभिक पुरुषापेक्षा स्वर्गादीच्या प्राप्तीसाठी सकामभावपूर्वक कर्म करणाराही श्रेष्ठ आहे तर मग दुसऱ्याच्या कल्याणासाठी निष्काम- भावपूर्वक कर्म करणारा कर्मयोगी श्रेष्ठ आहे—हे काय सांगितले पाहिजे? पाचव्या अध्यायात जेव्हा अर्जुनाने प्रश्न केला की, संन्यास आणि योग—यापैकी कोणता मार्ग श्रेष्ठ आहे? तेव्हा भगवंतांनी उत्तर देताना दोन्हीही कल्याण करणारे आहेत, असे सांगून कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोग श्रेष्ठ म्हटले. याठिकाणीही त्याच आशयाने स्वार्थभावाचा त्याग करून दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करणारा कर्मयोगी श्रेष्ठ आहे असे म्हटले आहे.

**परिशिष्ट भाव**—स्वत:च्या कल्याणाची इच्छा असावी, स्वभावात उदारता असावी आणि अंत:करणात करुणा असावी अर्थात् दुसऱ्याच्या सुखाने सुखी (प्रसन्न) आणि दु:खाने दु:खी (करुणिक) व्हावे—या तीन गोष्टी झाल्यास मनुष्य कर्मयोगाचा अधिकारी होतो. कर्मयोगाचा अधिकारी झाल्यावर कर्मयोग सुगमतेने होऊ लागतो.

कर्मयोगात एक विभाग 'कर्म' (कर्तव्याचा) आहे आणि एक विभाग 'योग' चा आहे. प्राप्त वस्तू, सामर्थ्य आणि योग्यतेचा सदुपयोग करणे आणि व्यक्तींची सेवा करणे—हे कर्तव्य आहे. कर्तव्य पालन केल्याने संसाराशी मानलेल्या संयोगाचा वियोग होतो—हा योग आहे. कर्तव्याचा संबंध संसाराशी आहे आणि योगाचा संबंध परमात्म्याशी आहे.

***संबंध**—गीता आपल्या शैलीनुसार प्रथम प्रस्तुत विषयाचे विवेचन करते मग करण्यापासून लाभ आणि न करण्यापासून हानी दाखविते. त्यानंतर त्याचे अनुष्ठान करण्याची आज्ञा देते. येथेही भगवान् अर्जुनाच्या प्रश्नाचे (मला घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात?) उत्तर देताना कर्माचा सर्वथैव त्याग असंभव आहे असे सांगतात.त्यानंतर कर्माचा स्वरूपाने त्याग करून मनाने विषयाचे चिंतन करण्यास दांभिक आचरण असे म्हणतात आणि निष्कामभावाने कर्म करणाऱ्या मनुष्याला श्रेष्ठ म्हणतात. आता पुढील श्लोकात भगवान् अर्जुनाला त्यानुसार कर्तव्यकर्म करण्याची आज्ञा देत आहेत.*

## नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः।
## शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः॥८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **त्वम्** | = तू | **कर्म** | = कर्तव्यकर्म | **अकर्मणः** | = कर्म न करण्यापेक्षा |
| **नियतम्** | = शास्त्रविधीने नियत केलेले | **कुरु** | = कर. | **कर्म** | = कर्म करणे |
| | | **हि** | = कारण | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ज्यायः** | = श्रेष्ठ आहे. | | करण्याने | **न, प्रसिद्ध्येत्** | = सिद्ध होणार नाही. |
| **च** | = तसेच | **ते** | = तुझा | | |
| **अकर्मणः** | = कर्म न | **शरीरयात्रा अपि** | शरीरनिर्वाहही | | |

***व्याख्या*— नियतं कुरु कर्म त्वम्**—शास्त्रात विहित आणि नियत अशा दोन प्रकारचे कर्तव्यकर्म करण्याविषयी आज्ञा दिली गेली आहे. विहित कर्माचे तात्पर्य—सामान्यरूपाने शास्त्रात सांगितलेले आज्ञारूप कर्म जसे व्रत, उपवास, उपासना इत्यादी. या विहित कर्मांना सपूर्णरूपाने करणे एका व्यक्तीसाठी कठीण आहे. परंतु निषिद्ध कर्मांचा त्याग करणे सुगम आहे. विहित कर्म न करू शकण्यात तितका दोष नाही जितका निषिद्ध कर्माच्या त्यागात लाभ आहे. जसे खोटे न बोलणे, चोरी न करणे, हिंसा न करणे इत्यादी निषिद्ध कर्माचा त्याग झाल्यास विहित कर्म आपोआप होऊ लागतात. नियत कर्माचे तात्पर्य आहे—वर्ण, आश्रम, स्वभाव आणि परिस्थितीनुसार प्राप्त कर्तव्यकर्म, जसे भोजन करणे, व्यापार करणे, घर बांधणे, रस्ता चुकलेल्या वाटसरूस मार्ग दाखविणे इत्यादी.

कर्मयोगाच्या दृष्टिकोनातून वर्णधर्मानुसार जे शास्त्रविहित कर्तव्यकर्म प्राप्त होईल ते मग घोर असो की सौम्य, नियतकर्मच आहे. येथे "**नियतं कुरु कर्म**" पदाने भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तू क्षत्रिय असल्याने आपल्या वर्णधर्मानुसार प्राप्त परिस्थितीत युद्ध करणे तुझे स्वाभाविक कर्म आहे (१८।४३). क्षत्रियासाठी युद्धरूप हिंसात्मक कर्म, घोर दिसत असूनही वास्तविक पाहिले तर घोर नाही तर त्याच्यासाठी ते नियतकर्मच आहे. दुसऱ्या अध्यायात भगवंतांनी म्हटले आहे की, स्वधर्माच्या दृष्टीनेही युद्ध करणे तुझ्यासाठी नियतकर्म आहे. "**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि**" (२।३१) वास्तविक तर स्वधर्म आणि नियतकर्म दोन्ही एकच आहेत. जरी दुर्योधन इत्यादीसाठीही युद्ध वर्णधर्मानुसार प्राप्त कर्म आहे, तरीपण ते अन्याययुक्त असल्याने नियत कर्माहून वेगळे आहे. कारण ते युद्ध करून अन्यायाने राज्य लुबाडू इच्छित आहेत. म्हणून त्यांच्यासाठी हे युद्ध नियत तसेच धर्मयुक्त कर्म नाही.

**कर्म ज्यायो ह्यकर्मणः**—याच अध्यायाच्या पहिल्या श्लोकात (अर्जुनाच्या प्रश्नात) आलेले "**ज्यायसी**" पदाचे उत्तर भगवान् याठिकाणी "**ज्यायः**" पदाने देत आहेत. तेथे अर्जुनाचा प्रश्न आहे की, जर आपणाला कर्मापेक्षा ज्ञान श्रेष्ठ मान्य आहे तर मला घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात? याच्या उत्तरात येथे भगवान् म्हणतात की, "कर्म न करण्यापेक्षा कर्म करणेच श्रेष्ठ आहे हे मला मान्य आहे". अशा प्रकारे अर्जुनाचा विचार युद्धरूप घोर कर्मापासून निवृत्त होण्याचा आहे आणि भगवंताचा विचार अर्जुनाला युद्धरूप नियतकर्मात प्रवृत्त करविण्याचा आहे. म्हणूनच पुढे अठराव्या अध्यायात भगवान् म्हणतात की, दोषयुक्त असले तरी सहज (नियत) कर्माचा त्याग करू नये "**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत्**" (१८।४८). कारण ह्याचा त्याग झाल्यास दोष लागतो आणि कर्माशी आपला संबंधही कायम राहतो. म्हणून कर्माचा त्याग करण्यापेक्षा नियतकर्म करणेच श्रेष्ठ आहे. याशिवाय आसक्तिरहित होऊन कर्म केले तर याहीपेक्षा श्रेष्ठ समजले जाते. कारण यामुळे कर्माशी संपूर्णपणे संबंधविच्छेद होतो. म्हणून भगवान् या श्लोकाच्या पूर्वार्धात अर्जुनाला अनासक्तभावाने नियतकर्म करण्याची आज्ञा देत आहेत आणि उत्तरार्धात कर्म केल्याशिवाय तुझा जीवननिर्वाहसुद्धा सिद्ध होणार नाही असे म्हणतात.

कर्मयोगात "**कर्म ज्यायो ह्यकर्मणः**" हा भगवंताचा मुख्य सिद्धांत आहे. यालाच भगवंतांनी "**मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि**" (२।४७) पदातून स्पष्ट केले आहे की, हे अर्जुन! तुझी कर्म न करण्यात आसक्ती होऊ नये. कारण कर्तव्यकर्मापासून अंग चोरणारा मनुष्य प्रमाद, आळस आणि निद्रेत आपला अमूल्य समय नष्ट करील किंवा शास्त्रनिषिद्ध कर्म करील ज्यामुळे त्याचे पतन होईल.

स्वरूपाने कर्माचा त्याग करण्यापेक्षा कर्म करीत असतानाच कर्माशी संबंध विच्छेद करणे श्रेष्ठ आहे. कारण कामना, वासना, फलासक्ती पक्षपात इत्यादीच कर्माशी संबंध जोडतात मग मनुष्य कर्म करो अथवा न करो. कामना इत्यादीच्या त्यागाचा उद्देश ठेवून कर्मयोगाचे आचरण केल्यास कामना इत्यादीचा त्याग फारच सुगम रीतीने होतो.

**शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः**—अर्जुनाच्या मनात असा भाव उत्पन्न झाला होता की, जर कर्मच केले नाही तर, कर्माशी आपोआप संबंध-विच्छेद होईल. म्हणून भगवान् अनेक प्रकारच्या युक्तींनी त्यांना कर्म करण्यासंबंधीची प्रेरणा करतात. त्यापैकी एका युक्तीने म्हणतात की, हे अर्जुन! तुला तर कर्म करावेच लागतील. बाकी गोष्टी तर सोडा पण कर्म केल्याशिवाय तुझा शरीरनिर्वाह (खाणे-पिणे इत्यादी) ही अशक्य होईल.

जसे ज्ञानयोगात विवेकाने संसाराशी संबंध-विच्छेद होतो तसेच कर्मयोगात कर्तव्यकर्माचे योग्य रीतीने अनुष्ठान

केल्यास संसाराशी संबध-विच्छेद होतो. म्हणून ज्ञानयोगापेक्षा कर्मयोगाला कोणत्याही दृष्टीने कमी समजू नये. कर्मयोगी शरीराला संसाराचेच समजून त्याला संसाराच्याच सेवेमध्ये लावतो अर्थात् शरीराविषयी त्याला कोणताच आपलेपणा राहत नाही. तो स्थूल, सूक्ष्म आणि कारण शरीराची एकता क्रमशः स्थूल, सूक्ष्म आणि कारण संसाराशी करतो. परंतु ज्ञानयोगी आपली एकता ब्रह्माशी करतो. अशा प्रकारे कर्मयोगी जड तत्त्वाशी एकता करतो आणि ज्ञानयोगी चेतन तत्त्वाशी एकता करतो.

## साधनसंबंधी मार्मिक गोष्ट

अर्जुनाची कर्मविषयी अरुची आहे अर्थात् त्यांच्या मनात कर्म न करण्याचा आग्रह आहे. केवळ अर्जुनाचीच गोष्ट अशी आहे असे नाही तर परमार्थ मार्गातील अन्य साधकसुद्धा बहुतेक या विषयात फार मोठी चूक करतात. जरी त्यांची इच्छा साधन करण्याची असते आणि साधन करतातसुद्धा तरीपण ते आपल्या मनासारखी परिस्थिती, अनुकूलता आणि सुखबुद्धीही इच्छितात, जे त्यांच्या साधनेत महान बाधक असते.

जो साधक तत्त्वप्राप्तीसाठी सुगमता हुडकतो आणि ती शीघ्र प्राप्त करू इच्छितो तो वास्तविक सुखेच्छु असतो साधनेचा प्रेमी नव्हे. जो सुगमतेने तत्त्वप्राप्तीची इच्छा करतो त्याला काठिण्य सहन करावे लागते आणि जो शीघ्रतेने तत्त्व-प्राप्तीची इच्छा करतो त्याला विलंब सहन करावा लागतो. कारण सुगमता आणि शीघ्रतेची इच्छा केल्याने साधकाची दृष्टी साधनेकडे न राहता फलाकडे राहते ज्यामुळे साधनेविषयी कंटाळा वाटावयास लागतो आणि साध्याच्या प्राप्तीत विलंबही होतो. ज्याचा हा दृढ निश्चय अथवा उद्देश आहे की, काहीही होवो मला तत्त्वाची प्राप्ती झालीच पाहिजे त्याची दृष्टी सुगमता आणि शीघ्रतेवर जातच नाही. तत्परतेने कार्यात लागलेली निश्चयी व्यक्ती जेव्हा आपल्या उद्देशाच्या पूर्तीसाठी कंबर कसून तयार होते तेव्हा ती सुखदु:खाकडे बघत नाही. **''मनस्वी कार्यार्थी न गणयति दुःखं न च सुखम्''** (भर्तृहरिनीतिशतक). साधकाची तर गोष्ट सोडाच, एक साधारण लोभी माणूसही दु:खाकडे पाहत नाही. बहुतेक असे पाहण्यात येते की, घाम येतो आहे, भूक-तहान लागलेली आहे अथवा शौचाला जाणे आवश्यक वाटत आहे तरीसुद्धा जर मालाची विशेष विक्री होत असेल आणि पैसे मिळत असतील तर तो लोभी व्यापारी सर्व कष्ट सहन करतो. अशा लोभी माणसासारखी साधकाची साध्याविषयी निष्ठा असली पाहिजे. त्याला साध्याच्या प्राप्तीवाचून चैन पडू नये, जीवन जगणे नकोसे वाटले पहिजे, खाणे-पिणे-आराम काहीही आवडू नये आणि हृदयात साधनेचा आदर आणि तत्परता असावी. साध्य प्राप्त करण्याविषयी उत्कंठा असल्याने विलंब तर असह्य होतो परंतु लवकर प्राप्ती व्हावी ही इच्छा नसते.

उत्कंठा वेगळी आणि शीघ्र प्राप्त होण्याची इच्छा वेगळी. आसक्तिपूर्वक साधन करणारा साधक साधनेत सुखाचा भोग घेतो आणि त्यात विलंब अथवा बाधा आल्यास त्याला क्रोध येतो. तसेच तो साधनेत दोषदृष्टी करतो. परंतु आदर आणि प्रेमाने साधना करणारा साधक साधनेत विलंब अथवा बाधा झाल्यास आर्तस्वराने रडू लागतो आणि त्याची उत्कंठा मग अधिक वेग घेते. हाच शीघ्रतेत आणि उत्कंठेत फरक आहे. शीघ्रतेत साधकाचा सुख-सुविधेचा भाव असतो की, तत्त्वप्राप्ती शीघ्र व्हावी म्हणजे नंतर विश्रांती घेऊ. अशा प्रकारे फलाकडे दृष्टी गेल्याने साधनेचा आदर कमी होतो. परंतु उत्कंठेमध्ये साधक आपल्या साधनेतच विश्रांती समजतो की, साधनेवाचून दुसरे करावयाचे तरी काय? यापेक्षा श्रेष्ठ कोणते काम आहे जे करणे शिल्लक राहिले आहे? म्हणून हेच काम (साधन) करावयाचे आहे मग ते सुगम होवो कि कठीण, शीघ्र होवो कि विलंबाने म्हणून त्याची पूर्ण शक्ती साधनेत लागते, ज्यामुळे त्याला शीघ्रतेने तत्त्वप्राप्ती होते. परंतु शीघ्रतेने सिद्धी इच्छिणारा साधक साध्याच्या प्राप्तीत विलंब झाल्यास निराशही होऊ शकतो. म्हणून साधकाने साध्यापेक्षाही साधनेला अधिक आदर दिला पाहिजे. जसे माता पार्वतीने म्हटले आहे—

**जन्म कोटि लगि रगर हमारी। बरउँ संभु न त रहउँ कुआरी॥**
**तजउँ न नारद कर उपदेसू। आपु कहहिं सत बार महेसू॥**

(मानस १।८१।३)

माता पार्वतीच्या भावात शीघ्रता नाही. यात तर साध्यापेक्षाही साधनेला अधिक आदर दिला गेला आहे.

प्रस्तुत श्लोकात भगवंत अर्जुनाला निमित्त करून साधकांना सावधान करीत आहेत की, त्यांनी आपल्या अनुकूलतेचा आणि सुखबुद्धीचा (जी साधनेत मूळ बाधा आहे) त्याग करून कर्तव्यकर्म करण्याविषयी अत्यंत तत्परतेने अग्रेसर व्हावे.

**परिशिष्ट भाव**—निष्कामभावाने कर्म करणारा कर्मयोगी केवळ स्वरूपाने कर्मांचा त्याग करणाऱ्यापेक्षा अथवा सकामभावाने कर्म करणाऱ्यापेक्षाही श्रेष्ठ नाही, तर ज्ञानयोग्यापेक्षाही श्रेष्ठ आहे—**'तयोस्तु कर्मसन्न्यासात् कर्मयोगो विशिष्यते'** (गीता ५।२) म्हणून भगवान् प्रस्तुत प्रकरणात निष्कामभावाने कर्म करण्यावर विशेष जोर देत आहेत.

*संबंध—मागील श्लोकात भगवंतांनी कर्म केल्याशिवाय शरीरनिर्वाहसुद्धा होत नाही असे म्हटले. यावरुन सिद्ध होते की, कर्म करणे अत्यंत आवश्यक आहे. परंतु कर्म करण्याने तर मनुष्य बंधनात पडतो—"**कर्मणा बध्यते जन्तुः**" तर मग मनुष्याने बंधनातून सुटण्यासाठी काय केले पाहिजे—हे पुढील श्लोकात भगवान् सांगतात.*

**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः।**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर॥ ९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यज्ञार्थात्** | = यज्ञासाठी (कर्तव्य-पालनासाठी) केल्या जाणाऱ्या | | कर्मांत (व्यस्त झालेला) | | (तू) |
| | | **अयम्** | = हा | **मुक्तसङ्गः** | = आसक्तिरहित होऊन |
| **कर्मणः** | = कर्माव्यतिरिक्त | **लोकः** | = मनुष्य-समुदाय | **तदर्थम्** | = त्या यज्ञासाठी (च) |
| **अन्यत्र** | = अन्यत्र (आपल्या-साठी केल्या जाणाऱ्या) | **कर्मबन्धनः** | = कर्मांनी बांधला जातो (म्हणून) | **कर्म** | = कर्तव्यकर्म |
| | | **कौन्तेय** | = हे कुंतीनंदन! | **समाचर** | = कर. |

***व्याख्या*— यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र**—गीतेच्या तत्त्वानुसार सर्व कर्तव्यही यज्ञच आहेत. यज्ञ शब्दाच्या अंतर्गत यज्ञ, दान, तप, होम, तीर्थसेवन, व्रत, वेदाध्ययन इत्यादी सर्व शारीरिक, व्यावहारिक आणि पारमार्थिक क्रिया येतात. कर्तव्य समजून केले जाणारे व्यापार, नोकरी, अध्ययन, अध्यापन, इत्यादी सर्व शास्त्रविहित कर्मांचे नावही यज्ञ आहे. दुसऱ्यांना सुख पोहचविणे तसेच त्यांच्या हितासाठी जी काही कर्म केली जातात ती सर्व यज्ञार्थ कर्म आहेत. यज्ञार्थ कर्म केल्याने आसक्ती फार लवकर नाहीशी होते तसेच कर्मयोग्याची संपूर्ण कर्म नष्ट होतात (४।२३) अर्थात् ती कर्म स्वतः तर बंधनकारक नसतातच पण पूर्व संचित कर्मसमूहाला सुद्धा समाप्त करून टाकतात.

वास्तविक पाहता मनुष्याची स्थिती त्याच्या उद्देशानुसार असते, क्रियानुसार नव्हे. जसे व्यापाऱ्याचा मुख्य उद्देश धन प्राप्ती असतो म्हणून त्याची वास्तविक स्थिती धनातच राहते आणि दुकान बंद करताच त्याची वृत्ती धनाकडेच जाते. तसेच यज्ञार्थ कर्म करीत असताना कर्मयोग्याची स्थिती आपल्या उद्देशात परमात्म्यात असते आणि कर्म समाप्त करताच त्याची वृत्ती परमात्म्याकडेच आकर्षित होते.

सर्व वर्णांसाठी वेगवेगळी कर्म आहेत. एका वर्णासाठी एखादे कर्म स्वधर्म आहे तर तेच कर्म दुसऱ्या वर्णासाठी (विहित नसल्याने) परधर्म म्हणजेच अन्यत्र कर्म होते. जसे भिक्षेवर जीवननिर्वाह करणे ब्राह्मणासाठी स्वधर्म आहे परंतु क्षत्रियासाठी परधर्म आहे. त्याचप्रमाणे निष्कामभावनेने कर्तव्यकर्म करणे मनुष्याचा स्वधर्म आहे आणि सकाम भावनेने कर्म करणे परधर्म आहे. जेवढी म्हणून सकाम आणि निषिद्ध कर्म आहेत ती सर्वची सर्व "अन्यत्रकर्म" श्रेणीत येतात. आपल्या सुख, मान, सन्मान, आराम इत्यादींसाठी जेवढी कर्म केली जातात ती सर्वची सर्वही अन्यत्र कर्म आहेत* म्हणून लहानात-लहान आणि मोठ्यात-मोठे जे काही कर्म केले जाईल त्यात साधकाने सावधान राहिले पाहिजे की, आपले कर्म एखाद्या स्वार्थासाठी तर होत नाही ना! साधक त्यालाच म्हणावे जो निरंतर सावधान राहतो. म्हणून साधकाने आपल्या साधनेत सतर्क, जागरुक राहिले पाहिजे.

**अन्यत्र कर्म**—यात दोन गुप्त भाव आहेत. (१) एखादी कोणी व्यक्ती आली तर त्याच्याशी एखादा मनुष्य "या बसा" इत्यादी आदर सूचक शब्दांचा प्रयोग करतो. परंतु अंतः-करणातून मी फार सज्जन आहे असे स्वतःला समजतो अथवा "अशा म्हणण्याने येणाऱ्या व्यक्तीवर माझा विशेष प्रभाव पडेल" या भावनेने म्हणतो तर यात स्वार्थाची भावना सुप्त असल्याने हे "अन्यत्र कर्म" च आहे यज्ञार्थ कर्म नव्हे.

(२) सत्संग अगर सभा ह्यात एखाद्याने प्रश्न केला, परंतु मनात जर असा भाव असेल की, ह्यामुळे "वक्ता आणि श्रोतृगण मला चांगला जाणकार समजतील," तर हे 'अन्यत्र-कर्म' च आहे, यज्ञार्थ कर्म नव्हे.

तात्पर्य साधकाने कर्म तर केले पाहिजे. परंतु त्यात स्वार्थ, कामना इत्यादीचा भाव नसला पाहिजे. कर्माचा निषेध नाही. परंतु सकामभावाचा निषेध आहे.

साधकाने भोग आणि ऐश्वर्य-बुद्धीने कोणतेही कर्म करू नये. कारण अशा बुद्धीमध्ये भोगासक्ती आणि कामना

* आपल्यासाठी कर्म केल्याने सकामभाव राहतो आणि सकामभाव राहिल्यास निषिद्ध कर्म होण्याची पूर्ण शक्यता राहते.

राहते ज्यामुळे कर्मयोगाचे आचरण होऊ शकत नाही. निर्वाहबुद्धीने कर्म केल्यासही जिवंत राहण्याची कामना कायम राहते. म्हणून निर्वाहबुद्धीही त्याज्य आहे. साधकाने केवळ साधनबुद्धीनेच प्रत्येक कर्म केले पाहिजे. सर्वात उत्तम साधक तर तो आहे, जो आपल्या मुक्तीसाठीसुद्धा कोणतेही कर्म न करता, केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच कर्म करतो, कारण आपले हित दुसऱ्यासाठी कर्म केल्याने होते, आपल्या-साठी कर्म केल्याने नव्हे. दुसऱ्यांच्या हितातच आपले हित आहे. दुसऱ्याच्या हिताहून आपले हित वेगळे मानणेच भूल आहे. म्हणून लौकिक तसेच शास्त्रीय केली जाणारी सर्वची सर्व कर्म केवळ लोकहितार्थच असावीत.

आपल्या सुखासाठी केले गेलेले कर्म तर बंधनकारक आहेच, आपल्या व्यक्तिगत हितासाठी केले गेलेले कर्मही बंधनकारक असते. केवळ आपल्या हिताकडे दृष्टी असल्याने व्यक्तित्व कायम राहते. म्हणून जप, चिंतन, ध्यान, समाधी सुद्धा लोक कल्याणासाठीच करावे. तात्पर्य स्थूल, सूक्ष्म आणि कारण तिन्ही शरीरांनी होणाऱ्या सर्व क्रिया संसारासाठीच असाव्यात आपल्यासाठी नव्हे. ''कर्म'' संसारासाठी आहे आणि संसाराशी संबंध-विच्छेद झाल्यावर परमात्म्याशी होणारा ''योग'' आपल्यासाठी आहे याचेच नाव कर्मयोग आहे.

**लोकोऽयं कर्मबन्धनः**—कर्तव्यकर्म (यज्ञ) करण्याचा अधिकार मुख्यत्वे करून मनुष्यालाच आहे. याचे वर्णन पुढें सृष्टिचक्राच्या प्रसंगात (३।१४-१६) ही केले आहे. ज्याचा उद्देश प्राणीमात्राचे हित करणे, त्यांना सुख पोहचविणे असते, त्याच्याकडूनच कर्तव्यकर्म होतात. जेव्हा मनुष्य दुसऱ्याच्या हितासाठी कर्म न करता केवळ आपल्या सुखासाठी कर्म करतो तेव्हा तो बांधला जातो.

आसक्ती आणि स्वार्थभावाने कर्म करणेच बंधनाला कारण आहे. आसक्ती आणि स्वार्थ नसल्यास आपोआप सर्वांच्या हितासाठी कर्म होतात. बंधन भावाने होते क्रियेने नव्हे. मनुष्य कर्माने बांधला जात नाही तर कर्मात तो जी आसक्ती आणि स्वार्थभाव ठेवतो त्यानेच तो बांधला जातो.

**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर**—या ठिकाणी ''मुक्तसङ्गः'' पदाने भगवान् म्हणतात की, कर्माविषयी, पदार्थाविषयी तसेच ज्यांच्याद्वारा कर्म केले जातात त्या शरीर, मन, बुद्धी इत्यादी सामुग्रीविषयी ममता, आसक्ती झाल्यासच बंधन होते. ममता, आसक्ती असल्याने कर्तव्यकर्मसुद्धा सहज आणि योग्य रीतीने होत नाहीत. ममता, आसक्ती नसल्यास परहित्तासाठी कर्तव्यकर्माचे आपोआप आचरण होते आणि जर कर्तव्यकर्म प्राप्त झाले नाही तर आपोआप निर्विकल्पतेत, स्वरूपात स्थिती होते. परिणामी साधन निरंतर होत राहते आणि असाधन कधी होतच नाही.

आळस आणि प्रमादामुळे नियतकर्माचा त्याग करणे ''तामस त्याग'' म्हणविला जातो (१८।७) ज्याचे फल मूढता अर्थात् मूढयोनीची प्राप्ती आहे **''अज्ञानं तमसः फलम्''** (१४।१६) कर्मांना दुःखरूप समजून त्यांचा त्याग करणे ''राजस त्याग'' म्हणविला जातो (१८।८), ज्याचे फल दुःखाची प्राप्ती आहे **''रजसस्तु फलं दुःखम्''** (१४।१६) म्हणून येथे भगवान् अर्जुनाला कर्माचा त्याग करण्यास सांगत नाहीत तर स्वार्थ, ममता, फलासक्ती, कामना, वासना, पक्षपात इत्यादीने रहित होऊन शास्त्रविधीनुसार, सावधानीने, उत्साहपूर्वक, कर्तव्यकर्म करण्याची आज्ञा देतात. जो ''सात्त्विक त्याग'' म्हटला जातो (१८।९). स्वतः भगवंतसुद्धा पुढे म्हणतात की, माझ्यासाठी काहीच करावयाचे शिल्लक नाही तरीपण मी सावधानीने कर्म करतो (३।२२-२३)

कर्तव्यकर्माचे योग्य रीतीने आचरण करण्यात दोन कारणांनी शैथिल्य निर्माण होते (१) मनुष्याचा असा स्वभाव आहे की, तो प्रथम फलाची कामना करूनच कर्मामध्ये प्रवृत्त होतो. जेव्हा तो पाहतो की, कर्मयोगानुसार फलाची कामना ठेवावयाची नाही तर मग तेव्हा तो विचार करतो की, कर्म करावयाचेच कशाला? (२) कर्म आरंभ केल्यानंतर जेव्हा शेवटी त्याला असे लक्षात येते की, याचे फल विपरीत होईल तेव्हा तो विचार करतो की, मी तर उत्तमातले-उत्तम कर्म करतो आणि जर फल विपरीत मिळत असेल तर मग कर्म करावेच कशाला?

कर्मयोगी कोणतीही कामना करीत नाही आणि कोणत्याही नाशवान फलाची इच्छा करीत नाही. तो केवळ संसाराचे हित समोर ठेवूनच कर्तव्यकर्म करतो. म्हणून उपर्युक्त दोन्ही कारणांनी त्याच्या कर्तव्यकर्मात शिथिलता येऊ शकत नाही.

## मार्मिक गोष्ट

प्रायः मनुष्याचा असा स्वभाव झाला आहे की, ज्यात त्याला आपला स्वार्थ दिसतो त्याच कर्माला तो मोठ्या तत्परतेने करतो. परंतु तेच कर्म त्याला बंधनकारक होते. म्हणून या बंधनातून सुटण्यासाठी त्याला कर्मयोगानुसार आचरण करण्याची फारच आवश्यकता आहे.

कर्मयोगात सर्व कर्म केवळ दुसऱ्यासाठीच केली जातात आपल्यासाठी केव्हाही नाही. दुसरे कोण कोण आहेत? हे समजून घेणे खूपच जरुरीचे आहे. आपल्या

शरीराला सोडून दुसरे प्राणी पदार्थ तर दुसरे आहेतच. परंतु हे आपले म्हणविले जाणारे स्थूलशरीर, सूक्ष्मशरीर (इंद्रिय, मन, बुद्धी, प्राण) आणि कारणशरीर (ज्यात मानलेला अहम् आहे) हे "स्व" च्या दृष्टीने दुसरेच आहेत.* कारण "स्व" (जीवात्मा) चेतन परमात्म्याचा अंश आहे आणि हे शरीर इत्यादी पदार्थ जड प्रकृतीचे अंश अहेत. संपूर्ण क्रिया जडामध्ये आणि जडासाठीच होतात. चेतनात किंवा चेतनासाठी केव्हाही कोणतीही क्रिया होत नाही म्हणून "करणे" आपल्यासाठी नाहीच, कधी झाले नाही, कधी होऊही शकत नाही. मात्र संसारापासून मिळालेल्या या शरीर इत्यादी जड पदार्थांना चेतन जेवढ्या अंशात "मी" "माझे" आणि "माझ्यासाठी" समजतो तेवढ्या अंशात त्याचा स्वभाव "आपल्यासाठी" करण्याचा होतो. म्हणून दुसऱ्यासाठी कर्म केल्याने ममता, आसक्ती सुगमतेने नाहीशी होते.

शरीराच्या अवस्था (कौमार्य, तारुण्य इत्यादी) बदलल्यावरही "मी तोच आहे" या रूपात आपल्या एका निरंतर राहणाऱ्या सत्तेचा प्राणीमात्राला अनुभव येतो. या अपरिवर्तनशील सत्तेची (आपले असणेपण) परमात्मतत्त्वाशी स्वतः एकता आहे आणि परिवर्तनशील शरीर, मन, बुद्धी इत्यादींची संसाराशी स्वतः एकता आहे. आमच्याकडून जी काही क्रिया केली जाते ती शरीर, इंद्रिय इत्यादीद्वाराच केली जाते. कारण संपूर्ण क्रियेचा संबध प्रकृती आणि प्रकृतिजन्य पदार्थाशी आहे. "स्व" (आपले स्वरूप) शी नव्हे. म्हणून शरीराच्या संबंधावाचून आम्ही कोणतीही क्रिया करू शकत नाही. यावरुन ही गोष्ट निश्चितरूपाने सिद्ध होत आहे की, आपल्याला आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही, जे काही करावयाचे आहे ते संसारासाठीच करावयाचे आहे. कारण "करणे" त्यालाच लागू पडते जो स्वतः करू शकतो. जो स्वतः काहीही करू शकत नाही त्याच्यासाठी "करणे" चे विधान नाहीच. जे काही केले जाते संसाराच्या साहाय्यतेनेच केले जाते. म्हणून "करणे" संसारासाठीच आहे. आपल्यासाठी करण्यानेच मनुष्य बंधनात पडतो—"**यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः**"

विनाशी आणि परिवर्तनशील शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादींशी आपल्या अविनाशी आणि अपरिवर्तनशील स्वरूपाचा कोणताही संबंध नाही. शरीरादींच्या साहाय्यतेशिवाय आपण काहीही करू शकत नाही. म्हणून आपल्यासाठी काहीही करावयाचे नाही. आपल्या सत्-स्वरूपात कधी कोणती उणीव येत नाही आणि उणीव आल्याशिवाय कोणतीही इच्छा निर्माण होत नाही. म्हणून आपल्यासाठी काहीही नको. अशा प्रकारे जेव्हा क्रिया आणि पदार्थाशी सर्वथा संबंध विच्छेद होतो (जो वास्तविक आहे) तेव्हा जर ज्ञानाचे संस्कार असतील तर स्वरूपाचा साक्षात्कार होतो आणि जर भक्तीचे संस्कार असतील तर भगवंताविषयी प्रेम निर्माण होते.

**परिशिष्ट भाव**—मनुष्य कर्म करण्याने बांधला जात नाही, तर 'अन्यत्र कर्म' करण्याने अर्थात् आपल्यासाठी कर्म करण्याने बांधला जातो. (याच अध्यायाचा तेरावा श्लोक). म्हणून '**यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्म बन्धनः।**' पदांचे तात्पर्य आहे—आपल्यासाठी काही करायचे नाही. मनुष्य कर्म-बन्धनातून तेव्हाच मुक्त होऊ शकतो, जेव्हा संसारापासून मिळालेल्या शरीर, वस्तू, योग्यता आणि सामर्थ्य (बल) संसाराच्याच सेवेत लावील आणि त्याच्या मोबदल्यात काहीही इच्छिणार नाही. कारण संसार आपणाला अशा वस्तू देऊ शकत नाही, ज्या आपण वास्तविक इच्छितो. आपण सुख इच्छितो, अमरता इच्छितो, निश्चिंतता इच्छितो, निर्भयता इच्छितो, स्वाधीनता इच्छितो. परंतु हे सर्व आपणाला संसारापासून मिळणार नाही, तर संसाराच्या संबंध-विच्छेदाने मिळेल. संसारापासून संबंध-विच्छेदासाठी हे आवश्यक आहे की, आपणाला संसारापासून जे मिळाले आहे, त्याला केवळ संसाराच्याच सेवेत अर्पण करावे.

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी म्हटले की, यज्ञ (कर्तव्यकर्म) व्यतिरिक्त होणारी कर्म बंधनकारक असतात. म्हणून या बंधनातून मुक्त होण्यासाठी कर्मांचा स्वरूपाने त्याग न करता कर्तव्यबुद्धीने कर्म करणे आवश्यक आहे. आता कर्मांच्या अवश्यकर्तव्यतेला पुष्ट करण्यासाठी आणखीही कारणे सांगतात.*

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक्॥१०॥**

---

* जसा संसार "पर" आहे तसेच शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धीसुद्धा "पर" अर्थात् दुसरेच आहेत. म्हणून कर्मयोगी यांना आपले न समजता यांचीसुद्धा सेवा करतो. शरीराला झोपाळू, आळशी, प्रमादी, निष्क्रिय आणि भोगी होऊ न देणे "शरीरा" ची सेवा आहे. इंद्रियांना सांसारिक भोगामध्ये व्यस्त होऊ न देणे "इंद्रियांची" सेवा अहे. मनाला कोणाचे अहित चिंतन, विषयाचे चिंतन तसेच व्यर्थ चिंतन न करू देणे "मना" ची सेवा आहे. बुद्धीला दुसऱ्याच्या कर्तव्याविषयी विचार करू न देणे, दुसरा काय करतो, काय नाही याचा विचार न करू देणे ही "बुद्धीची सेवा आहे. वास्तविक पाहता शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धीविषयी ममता, आसक्ती न ठेवणे ही त्यांची फार मोठी सेवा आहे.

**देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ॥ ११ ॥**

**प्रजापति** = प्रजापती ब्रह्मदेवाने
**पुरा** = सृष्टीच्या आदिकाळात
**सहयज्ञाः** = कर्तव्यकर्मांच्या विधानासहित
**प्रजाः** = प्रजेची (मनुष्य इत्यादीची)
**सृष्ट्वा** = रचना करून (त्यापैकी प्रधानतया मनुष्यांना)
**उवाच** = म्हटले की, (तुम्ही)
**अनेन** = या कर्तव्याद्वारा
**प्रसविष्यध्वम्** = सर्वांची वृद्धी करा (आणि)
**एषः** = हा (कर्तव्यकर्म-रूपी यज्ञ)
**वः** = तुम्हालोकाला
**इष्टकामधुक्** = कर्तव्यपालनाची आवश्यक सामुग्री प्रदान करणारा
**अस्तु** = होवो.
**अनेन** = याद्वारा (आपल्या कर्तव्यकर्माद्वारा तुम्ही)
**देवान्** = देवतांची
**भावयत्** = उन्नती करा (आणि)
**ते** = ते
**देवाः** = देवतालोक (आपल्या कर्तव्याद्वारा)
**वः** = तुम्हालोकांची
**भावयन्तु** = प्रगती करतील (अशाप्रकारे)
**परस्परम्** = परस्पराची
**भावयन्तः** = उन्नती करून (तुम्हीलोक)
**परम्** = परम
**श्रेयः** = कल्याणाला
**अवाप्स्यथ** = प्राप्त व्हाल.

***व्याख्या*— सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः—** ब्रह्मदेव प्रजा (सृष्टी) निर्माते तसेच त्यांचे स्वामी आहेत. म्हणून आपल्या कर्तव्याचे पालन करतानाच ते प्रजेचे रक्षण आणि कल्याणाचाही विचार करतात. कारण जो ज्याला उत्पन्न करतो त्याचे रक्षण करण्याचे दायित्व त्याचेवर येते. ब्रह्मदेव प्रजेची रचना करतात, त्याचे रक्षण करण्यात तत्पर असतात तसेच निरंतर त्यांच्या हिताविषयी विचार करतात. म्हणून ते "प्रजापती" म्हणविले जातात.

सृष्टी अर्थात् सर्गाच्या आरंभी ब्रह्मदेवाने कर्तव्य-कर्माची योग्यता आणि विवेक प्रदान करून मनुष्याची रचना केली आहे*. अनुकूल आणि प्रतिकूल परिस्थितीचा सदुपयोग कल्याण करणारा होतो. म्हणून ब्रह्मदेवाने अनुकूल प्रतिकूल परिस्थितीचा सदुपयोग करण्याचा विवेक प्रदान करूनच मनुष्याची रचना केली आहे.

सत्-असत्चा विवेक करण्यात असमर्थ असलेले पशु-पक्षी, वृक्ष-लता इत्यादीकडून स्वाभाविक परोपकार (कर्तव्यपालन) होत असतो. परंतु मनुष्याला तर भगवत्कृपेने विशेष विवेकशक्ती मिळालेली आहे. म्हणून जर त्याने आपल्या विवेकाला महत्त्व देऊन अकर्तव्य केले नाही तर त्याच्याकडूनही स्वाभाविक लोकहितार्थ कर्म होऊ शकतात.

देवता, ऋषी, पितर, मनुष्य तसेच अन्य पशु-पक्षी इत्यादी सर्वच प्राणी "प्रजा" आहेत. परंतु यात योग्यता, अधिकार आणि साधन ही विशेषता मनुष्यात असल्याने मनुष्यावर अन्य सर्व प्राण्यांना पाळण्याची जिम्मेदारी आहे. म्हणून या ठिकाणी "**प्रजाः**" पद विशेषरूपाने मनुष्यासाठीच वापरलेले आहे.

कर्मयोग अनादिकाळापासून चालत आलेला आहे. चौथ्या अध्यायाच्या तिसऱ्या श्लोकात "**पुरातनः**" पदानेही भगवान् म्हणतात की, हा कर्मयोग बऱ्याच काळापासून लोपलेला होता तोच मी तुला पुनः सांगितला आहे. त्याच गोष्टीला येथेही "**पुरा**" पदाने ते दुसऱ्या रीतीने सांगतात की, केवळ मीच नाही तर ब्रह्मदेवानेही सर्गाच्या आरंभी कर्तव्यासह प्रजेची निर्मिती करून त्या प्रजेलाही त्याच कर्मयोगाचे आचरण करण्याची आज्ञा दिली होती. तात्पर्य कर्मयोगाची (निःस्वार्थभावाने कर्मकरणे) परंपरा अनादिकालापासूनच चालत आलेली आहे. ही काही नवीन गोष्ट नव्हे. चौथ्या अध्यायात (चोवीसाव्यापासून तीसाव्या श्लोकापर्यंत) परमात्मप्राप्तीची जेवढी साधने सांगितली गेली आहेत ती सर्व "यज्ञ" नावानेच सांगितली आहेत. जसे—द्रव्ययज्ञ, तपयज्ञ, योगयज्ञ, प्राणायाम इत्यादी. बहुतेक "यज्ञ" शब्दाचा अर्थ हवनाशी संबधित क्रियेसाठीच प्रसिद्ध आहे परंतु गीतेत "यज्ञ" शब्द शास्त्रविधीने केल्या जाणाऱ्या संपूर्ण क्रियांचा वाचकही आहे. आपल्या वर्ण, आश्रम, धर्म, जाती, स्वभाव, देश, काल इत्यादीनुसार प्राप्त कर्तव्यकर्म यज्ञाच्या अंतर्गत येतात. दुसऱ्याच्या हिताच्या

* या ठिकाणी असे समजावे की, भगवंताच्या आज्ञेने आणि त्यांच्याच शक्तीने ब्रह्मदेव प्रजेची निर्मिती करतात. म्हणून वास्तविक पाहता सृष्टीचे मूळ निर्माते भगवंतच आहेत (४।१३, १७।२३)

भावनेने केले जाणारे सर्व कर्मसुद्धा "यज्ञ" च आहेत. अशा यज्ञाचे (कर्तव्याचे) दायित्व मनुष्यावरच आहे.

**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक्—** * ब्रह्मदेव मनुष्यांना म्हणतात की, तुम्ही लोकांनी आपापल्या कर्तव्य-पालनद्वारा सर्वांची वाढ करा, उन्नती करा. असे केल्यास तुम्हा लोकांना कर्तव्यकर्म करण्यात उपयोगी येणारी सामुग्री प्राप्त होत राहील, त्याची कधी कमी राहणार नाही.

अर्जुनाची कर्म न करण्याविषयी जी रुची होती ती नाहीशी करण्यासाठी भगवान् म्हणतात की, "प्रजापती ब्रह्मदेवाच्या वचनाप्रमाणेसुद्धा तू कर्तव्यकर्म करण्याचा उपदेश घेतला पाहिजे. दुसऱ्याच्या हितासाठी कर्तव्यकर्म केल्यानेच तुझी लौकिक आणि पारलौकिक उन्नती होऊ शकते."

निष्कामभावाने केवळ कर्तव्य पालनाच्या दृष्टीतून कर्म केल्यास मनुष्य मुक्त होतो आणि सकामभावाने कर्म केल्यास मनुष्य बंधनात पडतो. प्रस्तुत प्रकरणात निष्कामभावाने केल्या जाणाऱ्या कर्तव्यकर्माचे विवेचन चालू आहे. म्हणून येथे "**इष्टकाम**" पदाचा अर्थ "इच्छित भोग-सामुग्री" (जो सकामभाव सूचक आहे) घेणे उचित प्रतीत होत नाही. येथे त्या पदाचा अर्थ यज्ञ (कर्तव्यकर्म) करण्याची आवश्यक सामुग्री, आहे.†

कर्मयोगी दुसऱ्याची सेवा अथवा हित करण्यासाठी नेहमी तत्पर असतो. म्हणून प्रजापती ब्रह्मदेवाच्या विधानानुसार दुसऱ्यांची सेवा करण्याची सामुग्री, सामर्थ्य आणि शरीर-निर्वाहाच्या आवश्यक वस्तू त्याला कधीही कमी पडत नाहीत. त्याला ह्या उपयोगी वस्तू सुगमतेने मिळत राहतात. ब्रह्मदेवाच्या विधानानुसार कर्तव्यकर्म करण्याची सामुग्री ज्याला-ज्याला, जी-जी काही मिळाली आहे ती कर्तव्य पालन करण्यासाठी ज्याची त्याला पुरेशी प्राप्त झालेली आहे. कर्तव्य पालनाची सामुग्री कधीही कोणाजवळ अपुरी नसते. ब्रह्मदेवाच्या विधानात कधी केव्हाही फरक पडू शकत नाही. कारण जर त्यांनी कर्तव्यकर्म करण्याचे विधान निश्चित केले आहे तर जेवढ्याने कर्तव्याचे पालन होऊ शकते तेवढी सामुग्री देणेही त्यांच्यावरच अवलंबून आहे.

वास्तविक पाहता मनुष्यशरीर भोग भोगण्यासाठी नाहीच—"**एहि तन कर फल विषय न भाई**" (मानस ७।४४।१) म्हणूनच "सांसारिक सुखांना भोगा" अशी आज्ञा अथवा विधान कोणत्याही सत्-शास्त्रात नाही. समाज देखील स्वच्छंद भोग भोगण्याची आज्ञा देत नाही. याच्या विरुद्ध दुसऱ्यांना सुख पोहचविणेची आज्ञा अथवा विधान शास्त्र आणि समाज दोन्हीही देतात. जसे पित्यासाठी हे विधान तर मिळते की, त्याने पुत्राचे पालन-पोषण करावे परंतु पुत्राकडून पित्याने सेवा घ्यावीच हे विधान कुठेही मिळत नाही. त्याचप्रमाणे पुत्र, पत्नी इत्यादी अन्य संबंधियांसाठीही समजून घ्यावे.

कर्मयोगी नेहमी देण्याचाच भाव ठेवतो घेण्याचा नव्हे. कारण घेण्याचा भाव बांधणारा आहे. घेण्याचा भाव ठेवल्याने कल्याण प्राप्तीत तसेच सांसारिक पदार्थांच्या प्राप्ती-मध्येही बाधा उपस्थित होते. बहुधा सर्वांचा असा अनुभव आहे की, संसारात घेण्याचा भाव ठेवणारास कोणी देऊ इच्छित नाही म्हणून ब्रह्मदेव म्हणतात की, कशाचीही इच्छा न करता निःस्वार्थभावाने कर्तव्यकर्म केल्यानेच मनुष्य आपले कल्याण (उन्नती) करू शकतो.

**देवान् भावयतानेन**—या ठिकाणी "देव" पद उपलक्षक आहे म्हणून मनुष्य, देवता ऋषी, पितर इत्यादी सर्व प्राणी यांना या पदाच्या अंतर्गत समजले पाहिजे. कारण कर्मयोग्याचा उद्देश आपल्या कर्तव्यकर्माने प्राणीमात्रांना सुख पोहचविणे असतो. म्हणून ब्रह्मदेव येथे संपूर्ण प्राण्यांच्या उन्नतीसाठी मनुष्यांना आपल्या कर्तव्यकर्मरूप यज्ञाच्या पालनाचा आदेश देत आहेत. आपापल्या कर्तव्याचे पालन केल्याने मनुष्याचे आपोआप कल्याण होते (१८।४५). कर्तव्यकर्माच्या पालन करण्याच्या उपदेशाचे पूर्ण अधिकारी मनुष्यच आहेत. मनुष्यांनाच कर्म करण्याची स्वतंत्रता मिळालेली आहे. म्हणून त्यांनी या स्वतंत्रतेचा सदुपयोग केला पाहिजे.

**ते देवा भावयन्तु वः**—जसे वृक्ष, लता इत्यादीला स्वाभाविकच फळ, फूल लागतात. परंतु जर त्यांना खत आणि पाणी दिले तर त्यांना विशेष रीतीने फळ, फूल लागतात. तसेच यजन पूजनाने देवतांची पुष्टी होते ज्यामुळे देवतांची

* इष्ट शब्द "यज्" धातूने कृदन्ताचा "क्त" प्रत्यय केल्याने होतो जो यज्ञ (कर्तव्यकर्म) वाचक आहे आणि "काम" शब्द "कमु" धातुच्या "अण्" प्रत्ययाने होतो जो पदार्थ (सामुग्री) वाचक आहे.

† पूर्व श्लोकामध्ये भगवंतांनी म्हटले आहे की, यज्ञाशिवाय इतर कर्मामध्ये अर्थात् सकामभावनेने केल्या जाणाऱ्या कर्मामध्ये व्यस्त झालेला मनुष्य बांधला जातो आणि पुढे तेराव्या श्लोकातही म्हटले आहे की, जे आपल्यासाठी अर्थात् सकामभावनेने कर्म करतात ते पापी लोक पापाचेच भक्षण करतात. अशाप्रकारे मागील आणि पुढील श्लोकांचा विचार केला तर दोन्हीही ठिकाणी सकामभावनेचा त्याग करण्याविषयी सांगितले आहे. म्हणून मधल्या श्लोकांमध्येही (दहाव्या, अकराव्या आणि बाराव्या) सकामभावनेच्या त्यागाचाच विषय येणे उचित आहे. जर या ठिकाणी "इष्टकाम" पदाचा अर्थ "इच्छित पदार्थ" घेतला गेला तर (प्रकरणाच्या विरुद्ध होत असल्याने) दोष येतो. कारण इच्छित पदार्थ मिळविण्यासाठी केले गेलेले कर्म भगवंताच्या मताने बंधनकारक आहेत. म्हणून "इष्टकाम" पदाचा अर्थ "कर्तव्यासाठी आवश्यक साधन-सामुग्री" हाच आहे.

कामे विशेष न्यायप्रद होतात. परंतु जर मनुष्याने आपल्या कर्तव्यकर्माद्वारा देवतांचे यजन-पूजन केले नाही तर देवतांना पुष्टी मिळत नाही. म्हणून त्यांच्यात कर्तव्य-पालन करण्याविषयी उणीव येते. त्यांच्या कर्तव्य-पालन करण्यात उणीव आल्यानेच संसारात अतिवृष्टी, अनावृष्टी वगैरे संकटे येतात.

**परस्परं भावयन्तः**—या पदांचा अर्थ असा समजू नये की, दुसऱ्याने आपली सेवा केली तर आपण त्यांची सेवा करावी. उलट असे समजावे की, दुसरा आपली सेवा करो अथवा न करो आपल्याला तर आपल्या कर्तव्यद्वारा त्याची सेवा करावयाचीच आहे. दुसरा काय करत आहे आणि काय करत नाही, आपल्याला सुख देतो आहे का दुःख, या गोष्टीशी आपल्याला काही कर्तव्य नाही. कारण दुसऱ्याचे कर्तव्य पाहणारा आपल्या कर्तव्यापासून च्युत होतो. परिणामी त्याचे पतन होते. दुसऱ्याकडून कर्तव्याचे पालन करविणे आपल्या अधिकारातली गोष्टही नाही. आपल्या सर्वांचे हित करण्यासाठी केवळ आपल्या कर्तव्याचे पालन केले पाहिजे आणि त्याद्वारा सर्वांना सुख पोहचविले पाहिजे. सेवा करीत असताना आपली समज, सामर्थ्य, समय आणि सामुग्री स्वतःसाठी थोडीशीही राखून ठेवावयाची नाही. तरच जडतेशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद होईल.

आमचे जितके म्हणून सांसारिक संबंधी—माता-पिता, स्त्री-पुत्र, भाऊ-भावजय, इत्यादी आहेत त्या सर्वांची आपण सेवा करावयाची आहे. आपल्या सुखासाठी हे संबंध नाहीत. आपला ज्याच्याशी जसा संबंध आहे त्यानुसार त्याची सेवा करणे, मर्यादेनुसार त्यांना सुख पोहचविणे आपले कर्तव्य आहे. त्यांच्याकडून कोणतीही आशा ठेवणे आणि त्यांचेवर आपला अधिकार समजणे फार मोठी चूक आहे. आपण त्यांचे ऋणी आहोत आणि ऋण फेडण्यासाठी त्यांच्या घरी आपला जन्म झाला आहे.म्हणून निःस्वार्थभावाने त्या संबंधियांची सेवा करून आपण उऋण व्हावे—हे आपले सर्व प्रथम आवश्यक कर्तव्य आहे. सेवा तर आपल्याला सर्वांचीच करावयाची आहे. परंतु ज्यांची आपल्यावर जबाबदारी आहे त्या संबंधियांची सेवा सर्वप्रथम केली पाहिजे.

शरीर, इंद्रिय, मन, बुद्धी, पदार्थ इत्यादी आपले नाहीत आणि आपल्यासाठीही नाहीत—हा सिद्धांत आहे. म्हणून आपापल्या कर्तव्याचे पालन करण्याने आपोआप एकमेकांची उन्नती होते.

## कर्तव्य आणि अधिकारसंबंधी मार्मिक संकेत

जेव्हा मनुष्य आपल्या कर्तव्याचे पालन करून दुसऱ्याच्या अधिकाराचे रक्षण करतो तेव्हा कर्मयोग होतो. जसे माता-पित्याची सेवा करणे, पुत्राचे कर्तव्य आहे आणि माता-पित्याचा अधिकार आहे. जो दुसऱ्याचा अधिकार असतो तेच आपले कर्तव्य असते. म्हणून प्रत्येक मनुष्याने आपल्या कर्तव्य पालनद्वारा दुसऱ्याच्या अधिकाराची रक्षा करावी. तसेच दुसऱ्याचे कर्तव्य पाहू नये. दुसऱ्याचे कर्तव्य पाहिल्याने मनुष्य स्वतः कर्तव्यच्युत होतो कारण दुसऱ्याचे कर्तव्य पाहणे आपले कर्तव्य नाही. तात्पर्य दुसऱ्याचे हित करणे हे आपले कर्तव्य आहे आणि दुसऱ्याचा अधिकार आहे. जरी अधिकार कर्तव्याच्याच अधीन असतो तरीपण मनुष्याने आपला अधिकार पाहूच नये तर आपल्या अधिकाराचा त्याग करावा. केवळ दुसऱ्याच्या अधिकाराचे रक्षण करण्यासाठी आपल्या कर्तव्याचे पालन करावयाचे आहे. दुसऱ्याचे कर्तव्य पाहणे किंवा आपला अधिकार गाजविणे लोक आणि परलोकात भयंकर पतन करणारा आहे. वर्तमानकाळात घराघरातून, समाजातून जी अशांती, कलह, संघर्ष पाहण्यात येत आहे त्यात मूळ कारण हेच आहे की, लोक आपल्या अधिकाराची तर मागणी करतात. परंतु आपल्या कर्तव्याचे पालन करीत नाहीत. म्हणून ब्रह्मदेव देवता आणि मनुष्यांना उपदेश देतात की, एकमेकांचे हित करणे तुम्हा लोकांचे कर्तव्य आहे.

**श्रेयः परमवाप्स्यथ**—बहुतेक अशी धारणा झाली आहे की, या ठिकाणी परम कल्याण प्राप्तीचे कथन अतिशयोक्ती आहे परंतु वास्तविक पाहिले तर तसे नाही. जर या विषयात कोणाला संशय असेल तर तो स्वतः अशी क्रिया करून पाहू शकतो. जसे एखाद्याने आपल्याजवळ ठेव म्हणून ठेवलेली वस्तू त्याची त्याला परत केल्यास त्या व्यक्तिशी व ठेवीशी आमचा कसल्याच प्रकारचा संबंध राहत नाही. तसेच संसाराची वस्तू संसाराच्या सेवेत लावल्याने संसार आणि संसाराच्या वस्तूशी आमचा कोणताच संबंध राहत नाही. संसाराच्या मानलेल्या संबंधाचा विच्छेद होताच चिन्मयतेचा अनुभव येतो. म्हणून प्रजापती ब्रह्मदेवाच्या वचनात अतिशयोक्तीची कल्पना करणे अनुचित आहे.

हा सिद्धांत आहे की, जोपर्यंत मनुष्य आपल्यासाठी कर्म करतो तोपर्यंत त्याच्या कर्माची समाप्ती होत नाही आणि तो कर्मांनी बांधलाच जात राहतो. कृतकृत्य तोच होतो जो आपल्यासाठी काहीही करीत नही. आपल्यासाठी काहीही न करण्याने पापाचे आचरणही होत नाही. कारण पापाचे आचरण कामनेमुळेच होते (३।३७) म्हणून कल्याणेच्छुक साधकाने शास्त्रांच्या आज्ञेनुसार फळाच्या इच्छेचा आणि आसक्तीचा त्याग करून कर्तव्यकर्म करण्यात तत्पर रहावे.

मग कल्याण तर स्वतः सिद्ध आहे.

आपल्या कामनेचा त्याग केल्यास सर्व संसाराचे हित होते. जो आपल्या कामना-पूर्तीसाठी आसक्तिपूर्वक भोग भोगतो तो स्वतः तर आपली हिंसा (पतन) करतोच शिवाय ज्यांच्याजवळ भोगसामुग्रीचा अभाव आहे त्यांचीही हिंसा करतो अर्थात् दुःख देतो कारण की, भोगसामुग्री असणाऱ्या मनुष्याला पाहून अभावग्रस्त मनुष्याला त्या भोगसामुग्रीच्या अभावाचे दुःख होणे स्वाभाविक आहे. अशा प्रकारे स्वतः सुख भोगणारा व्यक्ती हिंसेपासून वाचू शकत नाही. याचे उलट परमार्थ मार्गावर आरूढ झालेल्या व्यक्तीला पाहून दुसऱ्याला सहज शांती मिळते. कारण पारमार्थिक संपत्तीवर सर्वांचा समान अधिकार आहे. निष्कर्ष असा निघाला की, मनुष्य कामना-आसक्तीचा त्याग करून आपल्या कर्तव्याचे पालन करीत राहील तर ब्रह्मदेवाच्या कथनानुसार तो परम कल्याणाला अवश्य प्राप्त होईल. यात कसलाही संशय नाही.

याठिकाणी परम कल्याणाची प्राप्ती मुख्यत्वे करून मनुष्यासाठीच सांगितली गेली आहे, देवतांसाठी नव्हे. कारण देवयोनी त्यांचे कल्याण करण्यासाठी निर्माण केलेली नाही. मनुष्य जे कर्म करतो त्या कर्मानुसार फळ देणे, कर्म करण्याची सामुग्री देणे, तसेच आपापले शुभ कर्मांचे फळ भोगण्यासाठी देवता योनी निर्माण केली आहे. ते निष्कामभावाने कर्म करण्याची सामुग्री देतात असे नाही. परंतु त्या देवतांपैकीही जर कोणाला आपल्या कल्याणाची इच्छा झाली तर त्याचे कल्याण होण्यात काहीही मनाई नाही अर्थात् जर कोणी आपले कल्याण करू इच्छितो तर तो करू शकतो. जर पाप्यातल्या पापी मनुष्यालाही आपला उद्धार करण्याची मनाई नाही तर मग देवतासाठी (जी पुण्ययोनी आहे) आपला उद्धार करण्याची मनाई कशी होऊ शकते? असे असूनही देवतांचा उद्देश भोग भोगण्याचाच असतो म्हणून त्यांच्या ठिकाणी बहुतेक आपल्या कल्याणाची इच्छा होत नाही.

**परिशिष्ट भाव**—मनुष्य कर्मयोनी आहे आणि चौऱ्यांशी लक्ष योनी, देवता, नारकीय जीव इत्यादी भोग योनी आहेत. सकामभाव वाले मनुष्य भोगांना भोगण्यासाठीच स्वर्गात जातात. म्हणून देवतालोक निष्कामभाव न ठेवता आपल्या जिम्मेदारीचे पालन करतात, ड्यूटी बजावतात. म्हणून येथे कल्याणाची गोष्ट मनुष्यांसाठीच समजावी.

मुक्ती स्वाभाविक आहे आणि बंधन अस्वाभाविक आहे. मनुष्ययोनी आपले कल्याण करण्यासाठीच आहे. म्हणून जो मनुष्य आपले कर्तव्यपालन करतो, त्याचे कल्याण स्वाभाविक होते—**'परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ'**। कल्याणासाठी नवीन काम करण्याची जरूरी नाही, तर जे काम कराल, त्यालाच स्वार्थ, अभिमान आणि फलेच्छेचा त्याग करून दुसऱ्यांच्या हितासाठी कराल तर कल्याण होईल. निष्कामभावाविनाही केवळ आपले कर्तव्यपालन केल्यास स्वर्गादी पुण्यलोकाची प्राप्ती होते. ज्या स्वर्गाची प्राप्ती मोठ-मोठ्या यज्ञ करण्याने होते, त्याचीच प्राप्ती क्षत्रिय केवळ आपले कर्तव्य कर्म—युद्ध करून प्राप्त करू शकतो.

जसे ब्रह्मदेवाने देवतां आणि मनुष्यांसाठी परस्पर एक-दुसऱ्याचे हित करण्याची गोष्ट सांगितली, तशीच चारी वर्णांसाठीही परस्पर एक-दुसऱ्याचे हित करण्याची गोष्ट समजावी. चारी वर्ण परस्पर एक-दुसऱ्याच्या हितासाठी आपापले कर्तव्य कर्म करतील तर ते परम कल्याणाला प्राप्त होतील.

संपूर्ण सृष्टीची रचनाच अशा पद्धती आहे की, आपल्यासाठी काहीही (वस्तू आणि क्रिया) नाही, दुसऱ्यासाठीच आहे—**'इदं ब्रह्मणे न मम'**। जसे प्रतिव्रता स्त्री पतीसाठीच असते, स्वतः साठी नव्हे. स्त्रीचे अंग पुरुषाला सुख देतात, परंतु स्त्रीला सुख देत नाहीत. पुरुषाचे अंग स्त्रीला सुख देतात, परंतु पुरुषाला सुख देत नाहीत. मातेचे दूध बाळासाठीच असते स्वतःसाठी नव्हे आणि बाळाच्या क्रिया मातेला सुख देतात, बाळाला नव्हे. माता-पिता संतानासाठी असतात आणि संतान माता-पित्यासाठी असते. श्रोता वक्त्यासाठी असतो आणि वक्ता श्रोत्यासाठी असतो. तात्पर्य हे आहे की, स्वतः सुख घेऊ नये, तर दुसऱ्याला सुख द्यावे. सृष्टीची रचना भोगासाठी नाही, तर उद्धारासाठी आहे!

देवताही स्वार्थाचा त्याग करून दुसऱ्याचे हित करू शकतात. म्हणून देवतांतही नारदासारखे ऋषि झाले आहेत. जरी भगवंताकडून कोणालाही मना नाही, तरीही कल्याणाचा मुख्य आणि स्वाभाविक अधिकारी मनुष्यच आहे.

एक शंका होऊ शकते की, आपण तर दुसऱ्याचे भले करावे, परंतु दुसरा आपले भले न करता बुरे करेल तर **'परस्परं भावयन्तः'** कसे होईल? याचे समाधान असे आहे की, आपण दुसऱ्याचे भले करू तर दुसरा आपले वाईट करू शकणारच नाही. त्याच्यात आपले वाईट करण्याचे सामर्थ्यच राहणार नाही. जर तो वाईट करेलही तरी तो नंतर पश्चात्ताप करेल, रडेल. जर तो आपले वाईट करेल, तर आपले भले करणारे, आपल्याशी सहानुभूती ठेवणारे कित्येक लोक निर्माण होतील. वास्तविक कोणाचे वाईट करण्याचे विधान कुठेही सापडत नाही. मनुष्यच द्वेषामुळे दुसऱ्याचे वाईट करतो. **'परस्परं भावयन्तः'**—हा मनुष्यतेचा विचार आहे. हेच नसल्यामुळे मनुष्य दुःख भोगत आहे.

**इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः॥ १२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यज्ञभाविताः** | = यज्ञाने पुष्ट झालेल्या | | सामुग्री | **अप्रदाय** | = सेवेत अर्पिल्याविना |
| **देवाः हि** | = देवताही | **दास्यन्ते** | = देत राहतील (अशा प्रकारे) | **यः** | = जो मनुष्य (स्वतः च त्याचा) |
| **वः** | = तुम्हालोकांना (न मागताच) | **तैः** | = त्या देवतांची | **भुङ्क्ते** | = उपयोग करतो, |
| **इष्टान्, भोगान्** | = कर्तव्य-पालनाची आवश्यक | **दत्तान्** | = दिलेली सामुग्री | **सः** | = तो |
| | | **एभ्यः** | = दुसऱ्यांच्या | **स्तेनः, एव** | = चोरच आहे. |

*व्याख्या*— **इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः**—येथेही "**इष्टभोग**" शब्दाचा अर्थ इच्छित पदार्थ होऊ शकत नाही. कारण मागील अकराव्या श्लोकात परम कल्याणाची गोष्ट आली आहे आणि त्याच्या हेतूसाठी हा (बारावा) श्लोक आहे. भोगेच्छा असताना परम कल्याण कधीही होणे शक्यच नाही. म्हणून येथे "**इष्ट**" शब्द "यज्" धातूपासून निर्माण झाल्याने तसेच "**भोग**"* शब्दाचा अर्थ आवश्यक सामुग्री असल्यामुळे उपर्युक्त पदाचा "त्या देवता तुम्हा लोकांना यज्ञ (कर्तव्यकर्म) करण्यासाठी आवश्यक सामुग्री देत राहतील" असा अर्थ होईल.

या ठिकाणी "**यज्ञभाविताः देवाः**" पदाचे तात्पर्य देवता तर आपल्या अधिकारानुसार मनुष्यांना आवश्यक सामुग्री देतातच केवळ मनुष्यांनाच आपले कर्तव्य पार पाडावयाचे आहे.

**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते**—ब्रह्मदेवाने देवतांसाठी "**ते देवाः**" पदाचा प्रयोग केला आहे कारण त्यांच्यासमोर मनुष्य होते, देवता नव्हे. परंतु येथे "**एभ्यः**" पदा (जो "**इदम्**" शब्दापासून निर्माण होतो) चा प्रयोग झाला आहे जो समीपतेचा द्योतक आहे. भगवंतासाठी तर सर्व समीपच आहेत. (७।२६) यावरुन सिद्ध होते की, आता येथून भगवंताचे वचन आंरभ होत आहे.

या ठिकाणी "**भुङ्क्ते**"† पदाचे तात्पर्य केवळ भोजन करण्यासाठीच नाही तर शरीरनिर्वाहाची संपूर्ण आवश्यक सामुग्री (भोजन, वस्त्र, धन, निवास इत्यादी) ला आपल्या सुखासाठी उपयोगात आणण्याविषयी आहे.

हे शरीर माता- पित्यापासून मिळाले आहे आणि याचे पालन-पोषणही त्यांचेकडूनच झाले आहे. विद्या गुरुजनांकडून मिळाली आहे. देवता सर्वांना कर्तव्यकर्माची सामुग्री देतात. ऋषी सर्वांना ज्ञान देतात. पितर मनुष्यांना सुख-सुविधेविषयी उपाय सांगतात. पशु-पक्षी, वृक्ष-लता इत्यादी दुसऱ्यांच्या सुखासाठी स्वतःला समर्पित करतात (जरी पशु-पक्षी यांना असे ज्ञान नसते की, आम्ही परोपकार करीत आहोत तरीपण त्यांच्याकडून परोपकार आपोआप होत राहतो). अशा प्रकारे आमच्याजवळ जी काही सामुग्री—बळ, योग्यता, पद, अधिकार, धन, संपत्ती इत्यादी आहे ती सर्वची सर्व दुसऱ्या-कडूनच मिळालेली आहे. म्हणून हिला दुसऱ्यांच्याच सेवेसाठी खर्च करावयाचे आहे.

शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी सर्व पदार्थ आम्हाला संसाराकडून मिळाले आहेत हे केव्हाही आपले नाहीत आणि आपले होणारही नाहीत. म्हणून यांना आपले आणि आपल्यासाठी समजून यांच्यापासून सुख भोगणेच बंधन आहे. या बंधनातून मुक्त होण्याचा हाच सरळ उपाय आहे की ज्यांच्याकडून हे पदार्थ मिळालेले आहेत ते त्यांचेच समजून त्यांच्याच सेवेमध्ये निष्कामभावाने लावणे हेच आमचे परम कर्तव्य आहे

साधकांच्या मनात बहुतेक अशी भावना निर्माण होते की, जर आम्ही संसाराची सेवा करीत राहू तर त्यात आमची आसक्ती होईल आणि आम्ही संसारात फसून जाऊ. परंतु भगवंताच्या वचनावरुन सिद्ध होते की, फसण्याचे कारण सेवा नाही तर आपल्यासाठी काही तरी घेण्याचा भावच कारण आहे. म्हणून घेण्याचा भाव सोडून देवतांप्रमाणे दुसऱ्यांना सुख पोहचविणेच मनुष्यमात्राचे

* "भुज् पालनाभ्यवहारयोः" (सिद्धांतकौमुदि १५४८)-"भुज्" धातुचे दोन अर्थ होतात—पालन आणि भक्षण. येथे "पालन" अर्थ घेणेच योग्य वाटते.

† येथे अनवनार्थक "भुज्" धातुने "भुङ्क्ते" पद निर्माण झाले आहे. अनवनाचा अर्थ भक्षण अर्थात् वस्तूला आपल्या उपयोगात आणणे, असा आहे.

परम कर्तव्य आहे.

कर्मयोगाच्या सिद्धांतामध्ये प्राप्त सामुग्री, सामर्थ्य, समय तसेच समज ह्याचा सदुपयोग करण्याचे विधान आहे. जी सामुग्री प्राप्त आहे, त्यापेक्षा अधिकाची (नवीन-नवीन सामुग्री इत्यादीची) कामना करणे कर्मयोगाच्या सिद्धांताच्या विरुद्ध आहे. म्हणून प्राप्त सामुग्री इत्यादीलाच दुसऱ्यांच्या हितासाठी लावायचे आहे. अधिकाची किंचिन्मात्रही आवश्यकता नाही. सयुक्तिक गोष्ट हीच आहे की, ज्याच्या ठिकाणी जेवढे सामर्थ्य असते त्याच्याकडून तेवढीच आशा ठेवली जाते तर मग भगवंत अथवा देवता त्याच्याकडून अधिकाची आशा कसे करू शकतात?

**स्तेन एव सः**—येथे "**सः स्तेनः**" पदात एकवचन देण्याचे तात्पर्य आपल्या कर्तव्याचे पालन न करणारा मनुष्य सर्वांना प्राप्त झालेल्या सामुग्री (अन्न, जल, वस्त्र इत्यादी) चा भाग दुसऱ्यांना न देता स्वत: एकटाच वापरतो, म्हणून तो चोरच आहे.

जो मनुष्य दुसऱ्यांना त्यांचा भाग न देता स्वत: एकटाच त्याचा भोग घेतो तो तर चोर आहेच परंतु जो मनुष्य कोणत्याही एका अंशाने आपला स्वार्थ सिद्ध करू इच्छितो अर्थात् सामुग्रीला सेवेत लावून मोबदल्यात मान-सन्मान इत्यादीची इच्छा करतो तोही तेवढ्या अंशात चोरच आहे. अशा मनुष्याचे अंत:करण कधीही शुद्ध आणि शांत राहू शकत नाही.

हे व्यष्टी शरीर कोणत्याही प्रकाराने समष्टी संसारापासून वेगळे नाही आणि वेगळे होऊ शकतही नाही. कारण समष्टीचा अंशच व्यष्टी म्हणविला जातो. म्हणून व्यष्टी (शरीर) ला आपले समजणे आणि समष्टी संसाराला आपले न माननेच राग-द्वेष इत्यादी द्वंद्वाचे कारण आहे. तसेच हाच अहंकार, व्यक्तित्व अथवा विषमता आहे* कर्मयोगाच्या अनुष्ठानाने हे सर्व (राग-द्वेष इत्यादी) सुगमतेने नष्ट होते. कारण कर्मयोग्याचा हा भाव असतो की, मी जे काही करीत आहे ते सर्व माझ्यासाठी नाही तर केवळ संसारासाठीच करीत आहे. यातही एक फार महत्त्वाची मार्मिक गोष्ट अशी आहे की, कर्मयोगी आपल्या कल्याणासाठीही कोणते कर्म न करता सांसारिक कल्याणाच्या उद्देशानेच सर्व कर्म करतो. कारण सर्वांच्या कल्याणाहून आपले कल्याण वेगळे समजणे हे व्यक्तित्व आणि विषमतेला जन्म देते, जे साधकाच्या उन्नतीत बाधा आणते. शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी जे काही आमचेजवळ आहे ते सर्वच्या सर्व आम्हाला संसाराकडून मिळालेले आहे. संसारापासून मिळालेल्या वस्तूला केवळ आपल्या स्वार्थ सिद्धीत लावणे ईमानदारी नाही.

## कर्तव्यसंबंधी विशेष गोष्ट

हिंदु संस्कृतीचा एकमेव उद्देश मनुष्यांचे कल्याण करणे हाच आहे. याच उद्देशाने ब्रह्मदेव (सृष्टीच्या आरंभी) मनुष्याला नि:स्वार्थभावाने आपापल्या कर्तव्याद्वारा एकमेकांना सुख पोहचविण्याची आज्ञा देत आहेत (३।१०)

परिवारामध्ये भाऊ, बहीण, माता इत्यादी सर्वचे सर्व कर्म करतच असतात परंतु त्यांच्याकडून ही फार मोठी चूक होते की, ते कामना, ममता, आसक्ती, स्वार्थ इत्यादीला वश होऊन कर्म करतात. म्हणून अलौकिक आणि पारलौकिक दोन्हीही लाभ त्यांना मिळत नाहीत तर हानीच होते. स्वार्थाला वश होऊन आपल्यासाठी कर्म करण्यानेच लोकांमध्ये भांडणे, खटपट, ईर्षा इत्यादी होतात आणि परलोकात दुर्गती होते. दुसऱ्याची सेवा करून मोबदल्यात कशाची तरी इच्छा ठेवल्याने वस्तू आणि व्यक्तीशी मनुष्याचा संबंध जोडला जातो. कोणत्याही कर्माशी स्वार्थाचा संबंध जोडला तर ते कर्म तुच्छ आणि बंधनकारक होते. स्वार्थी मनुष्याला संसारात कोणीही चांगला म्हणत नाही. मागणाऱ्याला कोणीही अधिक देऊ इच्छित नाही. बहुतेक असे आढळून येते की, घरामध्येसुद्धा रागी आणि भोगी व्यक्तीपासून वस्तू लपविल्या जातात. या विरुद्ध आपल्या-जवळ जेवढी समज, समय, सामर्थ्य आणि सामुग्री आहे तेवढ्यानेच आपण दुसऱ्यांची सेवा केली तर त्याने कल्याण तर होतेच. याशिवाय वस्तू, आराम, मान-सन्मान, आदर-सत्कार इत्यादींची इच्छा न ठेवताही त्या प्राप्त होऊ लागतात. परंतु कर्मयोग्याला मान-सन्मान इत्यादीची इच्छा नसते. कारण यांची इच्छा आणि सुखभोगच बंधनकारक असतात.

"मला सुख कसे मिळेल" केवळ याच इच्छेने मनुष्य कर्तव्यच्युत आणि पतित होतो. म्हणून दुसऱ्याला सुख कसे मिळेल? असा भाव कर्मयोग्याने नेहमी ठेवला पाहिजे. घरामध्ये, माता-पिता, भाऊ-बहीण, स्त्री- पुत्र जितक्या व्यक्ती आहेत त्या सर्वांनी एकमेकांविषयी हिताचा विचार केला पाहिजे. बहुतेक सेवा करणाऱ्याकडून एक चूक होते की, तो "मी सेवा करतो", "मी वस्तू देतो" असे समजून खोटा अभिमान बाळगतो. वास्तविक पाहिले तर सेवा

* आत्मापि चायं न मम सर्वा वा पृथिवी मम (महाभारत, अश्वमेधिक० ३२।११) हे शरीरही माझे नाही किंवा ही सर्व पृथ्वीच माझी आहे.

करणारी व्यक्ती सेव्याची वस्तूच सेव्याला देते. जसे आईचे दूध ते तिच्या स्वत: साठी नसून मुलासाठीच असते, तसेच मनुष्याजवळ जेवढी म्हणून सामुग्री आहे ती त्याच्या स्वत:-साठी नसून दुसऱ्यासाठीच आहे. म्हणून मनुष्याला प्राप्त सामुग्रीविषयी ममता करण्यास अर्थात् तिला आपली आणि आपल्यासाठी समजण्याचा अधिकार नाही. ममता जरी ठेवली तरी प्राप्त सामुग्री तर नित्य राहणार नाही, केवळ ममतारूप बंधन राहील. याच कारणाने भगवान् म्हणतात की, वस्तूंना आपली समजून स्वत: तिचा भोग घेणारा मनुष्य चोरच आहे.

देवता, ऋषी, पितर, पशुपक्षी, वृक्ष-लता इत्यादी सर्वांचाही स्वभाव परोपकार करण्याचा आहे. मनुष्याला यांचे साहाय्य नेहमी मिळत असल्याकारणाने तो यांचा ऋणी आहे. या ऋणातून मुक्त होण्यासाठीच पंच महायज्ञ (ऋषियज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ आणि मनुष्ययज्ञ) याचे विधान आहे. मनुष्यच एक असा प्राणी आहे जो बुद्धिपूर्वक सर्वांना आपल्या कर्तव्यकर्माने तृप्त करू शकतो. म्हणून सर्वात जास्त जबाबदारी मनुष्यावर आहे. यालाच अशी स्वतंत्रता मिळाली आहे की, ज्याचा सदुपयोग करून हा परम श्रेयाची प्राप्ती करू शकतो.

देवता इत्यादी तर आपल्या कर्तव्याचे पालन करीतच असतात. जर मनुष्याने आपल्या कर्तव्याचे पालन केले नाही तर देवतामध्येच नाही तर त्रैलाक्यात चलबिचल उत्पन्न होते. परिणामस्वरूप अतिवृष्टी, अनावृष्टी, भूकंप, दुर्भिक्ष इत्यादी प्राकृतिक प्रकोप होऊ लागतात. भगवंतही (३।२३-२४ मध्ये) म्हणतात की, जर मी सावधानीने कर्तव्याचे पालन केले नाही तर सर्व लोक नष्ट भ्रष्ट होतील. ज्याप्रमाणे गतिशील बैलगाडीचे चाक जर मोडले तर त्यामुळे संपूर्ण गाडीला झटका बसतो त्याप्रमाणे गतिशील सृष्टिचक्रात जर एक व्यक्तीही कर्तव्यच्युत होत असेल तर त्याचा विपरीत प्रभाव संपूर्ण सृष्टीवर पडतो. याच्या विरुद्ध जसे शरीराचे एकही पीडित अंग नीट झाले तर संपूर्ण शरीराचे आपोआप हित होत असते. तसेच आपल्या कर्तव्याचे योग्य पालन करणाऱ्या मनुष्याकडून संपूर्ण सृष्टीचे आपोआप हित होते.

प्रजापती ब्रह्मदेवाने देवता आणि मनुष्य दोघांना आपापले कर्तव्य पालन करण्याची आज्ञा दिली आहे. देवता इत्यादी सर्व मर्यादेने व्यवहार करतात. केवळ मनुष्यच आपल्या अज्ञानाने मर्यादांचा भंग करतो. कारण त्याला दुसऱ्याची सेवा करण्यासाठी जी सामुग्री मिळालेली आहे त्यावर तो आपला अधिकार असल्याचे समजतो. अनंत जन्माच्या कर्मबंधनापासून मुक्त होण्यासाठी मनुष्याला स्वतंत्रता मिळालेली आहे. परंतु तो त्याचा दुरुपयोग करून कर्म आणि कर्मफलाविषयी ममता, आसक्ती ठेवतो. परिणामी नवे बंधन निर्माण करून तो स्वत: फसून जातो आणि पुढे अनेक जन्मांत दु:ख भोगण्याची तयारी करतो. म्हणून मनुष्याने त्याला जी काही सामुग्री मिळाली आहे त्याद्वारा त्याने त्रैलोक्याची सेवा करावी अर्थात् त्या सामुग्रीला त्याने भगवंत, देवता, ऋषी, पितर, मनुष्य इत्यादी सर्व प्राण्यांच्या सेवेमध्ये लावावे.

**शंका**—जी काही सामुग्री प्राप्त झाली आहे ती सर्वची सर्व दुसऱ्यांच्या सेवेत लावल्यास कर्मयोग्याचा जीवननिर्वाह कसा होऊ शकेल?

**समाधान**—वास्तविक पाहता ही शंका शरीराशी आपली एकता समजल्यानेच अर्थात् शरीरालाच आपले स्वरूप समजल्याने निर्माण होते. परंतु कर्मयोगी शरीराशी आपला कोणताही संबंध मानीतच नाही तर त्याला संसाराचे आणि संसारासाठीच समजून त्याच्याच सेवेमध्ये लावतो. त्याची दृष्टी अविनाशी स्वरूपावर असते, नाशवान शरीरावर नसते. ज्याची दृष्टी शरीरावर राहते तोच अशी शंका करू शकतो की, कर्मयोग्याचा जीवननिर्वाह कसा होईल?

जोपर्यंत भोगेच्छा असते तोपर्यंत जगण्याची इच्छा आणि मरण्याचे भय राहते. भोगेच्छा कर्मयोग्यात राहतच नाही कारण त्याची संपूर्ण कर्म आपल्यासाठी न होता दुसऱ्यांच्या सेवेसाठीच होतात. म्हणून कर्मयोगी आपल्या जगण्याची पर्वा करीत नाही. त्याच्या मनात हा प्रश्न उठतच नाही की, माझा जीवननिर्वाह कसा होईल? वास्तविक पाहता ज्याच्या अंत:करणात जगताची मुळीच गरज वाटत नाही. त्याची आवश्यकता जगताला वाटते. म्हणून जगत याच्या निर्वाहाचा स्वत: प्रबंध करते.

ज्याचे जीवन परोपकारासाठीच समर्पित झाले आहे असे पशु-पक्षी, कीट-पतंग, वृक्ष-लता, इत्यादी सर्व साधारण प्राण्यांचाही जीवननिर्वाहाचा जर प्रबंध आहे तर शरीरासहित मिळालेल्या सर्व सामुग्रीला प्राण्यांच्या हितात खर्च करणाऱ्या मनुष्याच्या जीवननिर्वाहाचा प्रबंध नसेल हे कसे शक्य आहे?

सर्वांचे पालन करणाऱ्या भगवंताच्या असीम कृपेने जीवन निर्वाहाची सामुग्री सर्व प्राण्यांना समानरूपाने मिळालेली आहे. याचे प्रत्यक्ष उदाहरण सर्वासमोर आहे. मातेच्या शरीरात ज्याठिकाणी रक्तच रक्त आहे त्यातच मुलाच्या जीवननिर्वाहासाठी मधुर आणि पुष्टिकर दूध

आपोआप निर्माण होते. म्हणून मग प्रारब्धाला माना की भगवत्कृपेला, मनुष्याच्या जीवननिर्वाहाची सामुग्री त्याला मिळतच असते. याविषयी संदेह, चिंता, शोक, विचार करण्याची मुळीच आवश्यकता नाही. भगवंताच्या राज्यामध्ये जर पाप्यातल्या पापी तसेच नास्तिकातल्या नास्तिक पुरुषाचा-ही जीवननिर्वाह चालतो तर कर्मयोग्याच्या जीवननिर्वाहामध्ये कोणती बाधा येऊ शकते? म्हणून असा प्रश्न निर्माण करणेच चूक आहे.

**परिशिष्ट भाव**—'**यज्ञभाविताः**' पदाचा अर्थ आहे—यज्ञापासून पुष्ट झालेले, पूजित झालेले, संबंधित झालेले. मध्यलोकात असल्यामुळे मुनष्य वरच्या व खालच्या सर्वच लोकात राहणाऱ्या प्राण्यांना पुष्ट करू शकतो. सर्वांचे हित करण्यासाठीच मनुष्याला मध्यलोकात वसविले गेले आहे. म्हणून मनुष्य कल्याणाचा अधिकारी आहे.

*संबंध—नवव्या श्लोकात भगवंतांनी "यज्ञासाठी केले जाणारे कर्म बांधणारे होत नाहीत" असे सांगून यज्ञासाठी कर्म करण्याची आज्ञा दिली. त्या आज्ञेला ब्रह्मदेवाच्या वचनाने पुष्ट करून नवव्या श्लोकात सांगितलेल्या आपल्या वचनाची एक वाक्यता करून पुढील श्लोकात यज्ञ (कर्तव्यकर्म) करण्याच्या आणि न करण्याच्या फलाचे स्पष्ट विवेचन करीत आहेत.*

## यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः।
## भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात्॥ १३॥

**यज्ञशिष्टाशिनः** = यज्ञशेषाचा (योगाचा) अनुभव करणारे
**सन्तः** = श्रेष्ठ मनुष्य
**सर्व किल्बिषैः** = संपूर्ण पापापासून
**मुच्यन्ते** = मुक्त होतात.
**तु** = परंतु
**ये** = जे
**आत्मकारणात्** = केवळ स्वतःसाठीच
**पचन्ति** = (अन्न) शिजवितात अर्थात् सर्व कर्म करतात
**ते** = ते
**पापाः** = पापीलोक (तर)
**अघम्** = पापाचेच
**भुञ्जते** = भक्षण करतात.

*व्याख्या*— **यज्ञशिष्टाशिनः सन्तः**—कर्तव्यकर्माचे निष्कामभावनेने विधिपूर्वक पालन केल्यास (यज्ञशेषाच्या रुपात) योग अथवा समताच शिल्लक राहते. कर्मयोगात महत्त्वाची गोष्ट अशी आहे की, संसाराकडून प्राप्त झालेल्या सामुग्रीद्वाराच कर्म होते. म्हणून संसाराच्या सेवेत लावल्यानेच ते कर्म "**यज्ञ**" सिद्ध होते. यज्ञाची सिद्धी झाल्यास सहज राहिलेले अवशिष्ट "**योग**" आपल्यासाठी होते. हा योग (समता) च यज्ञशेष आहे. ज्याला भगवंतांनी चौथ्या अध्यायात "**अमृत**" म्हटले आहे. "**यज्ञशिष्टामृतभुजः**" (४। ३१)

**मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः**—येथे "**किल्बिषैः**" पद बहुवचनी आहे. ज्याचा अर्थ—"संपूर्ण पापांपासून अर्थात् बंधनांपासून" असा आहे. परंतु भगवंतांनी या पदासोबत "**सर्व**" पदही दिले आहे ज्याचे विशेष तात्पर्य हे होते की, यज्ञशेषाचा अनुभव झाल्यास मनुष्याला कोणत्याही प्रकारचे बंधन राहत नाही. त्याची संपूर्ण कर्म (संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण) विलीन होतात.* (४। २३) संपूर्ण कर्म विलीन झाल्यावर त्याला सनातन ब्रह्माची प्राप्ती होते. (४। ३१)

याच अध्यायाच्या नवव्या श्लोकात भगवंतांनी यज्ञार्थ कर्माऐवजी अन्यत्र कर्मांना बंधनकारक म्हटले आणि चौथ्या अध्यायाच्या तेवीसाव्या श्लोकात यज्ञार्थ कर्म करणाऱ्या मनुष्याचे संपूर्ण कर्म विलीन होण्याविषयी म्हटले. या दोन्ही श्लोकांत (३। ९ आणि ४। २३) जी गोष्ट आली आहे तीच गोष्ट येथे "**सर्वकिल्बिषैः**" पदाने म्हटली गेली आहे. तात्पर्य यज्ञशेषाचा अनुभव करणारे मनुष्य संपूर्ण बंधनरूपी कर्मातून मुक्त होतात. पापकर्म तर बंधनकारक असतातच. सकामभावनेने केलेले पुण्यकर्मही (फलदायक असल्याने) बंधनकारक असतात. यज्ञशेषा (समता) चा अनुभव झाल्यास पाप आणि पुण्य दोन्हीही राहत नाहीत-"**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते**" (२। ५०)

आता विचार करा की, बंधनाचे वास्तविक कारण काय आहे? असे व्हावे आणि असे होऊ नये—याच कामनेने बंधन होते. ही कामना संपूर्ण पापांना जन्म देणारी (मूळ) आहे (३। ३७) म्हणून कामनेचा त्याग करणे अत्यंत आवश्यक आहे.

---

* कामना न राहिल्यास संचित कर्म विलीन होतात. जोपर्यंत शरीर असते तोपर्यंत प्रारब्धानुसार अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती येते. परंतु यामुळे तो सुखी-दुःखी होत नाही अर्थात् त्या परिस्थितीचा त्याच्यावर कोणताही परिणाम होत नाही—हे प्रारब्ध कर्माचे विलीन होणे आहे. फलेच्छा न राहिल्यास क्रियमाण कर्म अकर्म होतात अर्थात् फल देणारे राहत नाहीत—हे क्रियमाण कर्माचे विलीन होणे आहे.

वास्तविक पाहता कामनेला कोणतीही स्वतंत्र सत्ता नाही. कामना अभावापासून उत्पन्न होते आणि "स्व" (सत्-स्वरूप) च्या ठिकाणी कोणत्याही प्रकारचा अभाव नाहीच आणि होऊही शकत नाही. म्हणून "स्व" च्या ठिकाणी कामना नाहीच. केवळ अज्ञानाने शरीरादी असत् पदार्थाशी आपली एकता समजून, मनुष्य असत् पदार्थाच्या अभावाच्या अनुषंगाने आपल्यात अभाव मानू लागतो आणि त्या अभावाची पूर्ती करण्यासाठी असत् पदार्थाची कामना करू लागतो. साधकांनी ही गोष्ट लक्षात ठेवावी की, आरंभ आणि समाप्त होणाऱ्या क्रियांपासून उत्पन्न आणि नष्ट होणारे पदार्थ तर मिळतीलच. अशा उत्पत्ति-विनाशशील पदार्थापासून मनुष्याच्या अभावाची पूर्ती कधी होऊच शकत नाही. जर या पदार्थापासून अभावाच्या पूर्तीचा प्रश्नच नाही तर मग ह्या पदार्थांची कामना करणे ही चूकच आहे. असा योग्य विचार केल्यास कामनेची निवृत्ती सहज होऊ शकते.

मात्र आपले म्हणविले जाणारे शरीरादी पदार्थांना कधीही आपले आणि आपल्यासाठी न समजता दुसऱ्याच्या सेवेत लावल्याने ह्या पदार्थाशी आपोआप संबंध-विच्छेद होतो. ज्यामुळे तात्काळ आपल्या सत्स्वरूपाचा बोध होतो. नंतर मग कोणताही अभाव शिल्लक राहत नाही. ज्याच्या मनात कोणत्याही प्रकारच्या अभावाची मान्यता (कामना) राहत नाही, तो मनुष्य जिवंतपणीच संसारापासून मुक्त आहे.

**ये पचन्त्यात्मकारणात्**—आपल्यासाठी काहीतरी इच्छिण्याचा भाव अर्थात् स्वार्थ, कामना, ममता, आसक्ती तसेच आपल्याला चांगले म्हणवून घेण्याचा थोडाही भाव "**आत्मकारणात्**" पदाच्या अंतर्गत येतो. मनुष्यात जितकी स्वार्थ बुद्धी जास्त राहते तो तितकाच अधिक पापी असतो.

येथे "**पचन्ति**" पद उपलक्षक आहे, ज्याचा अर्थ केवळ "स्वयंपाककरणे" एवढाच मर्यादित नसून खाणे-पिणे, चालणे-बसणे इत्यादी संपूर्ण सांसारिक क्रियांच्या सफलतेशी आहे.

आपला स्वार्थ इच्छिणारी व्यक्ती आपल्यासाठी पाक-क्रिया करो (कार्य करो) अथवा दुसऱ्यासाठी, वास्तविक तो आपल्यासाठीच पाक क्रिया करतो. याच्या विरुद्ध आपल्या स्वार्थभावाचा त्याग करून कर्तव्यकर्म करणारा साधक आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीरासाठी पाक क्रिया करो अथवा दुसऱ्यासाठी, वास्तविक तो दुसऱ्यासाठीच पाक क्रिया करतो. संसाराकडून जी काही सामुग्री आम्हाला मिळालेली आहे तिला संसाराच्या सेवेत न लावता आपल्या सुख-भोगासाठी लावणेच आपल्यासाठी पाक क्रिया करणे आहे. संसाराच्या लहानात लहान अंशाला-शरीराला आपले आणि आपल्यासाठी मानणे फार मोठे पाप आहे. परंतु शरीराला आपले न मानता याला आवश्यकतेनुसार अन्न, जल, वस्त्र इत्यादी देणे आणि याला आळशी, प्रमादी, भोगी होऊ न देणे ही शरीराची सेवा आहे ज्यामुळे शरीराविषयी ममता-आसक्ती राहत नाही.

मनुष्याला आपल्या कर्माचे फळ स्वत:ला भोगावे लागते. परंतु त्याच्याद्वारा केल्या गेलेल्या कर्माचा प्रभाव संपूर्ण संसारावर पडतो. "आपल्यासाठी" कर्म करणारा मनुष्य आपल्या कर्तव्यापासून च्युत होतो आणि आपल्या कर्तव्यापासून च्युत झाल्यामुळेच राष्ट्रात अकाल, महामारी, मृत्यू इत्यादी महान कष्ट होतात. म्हणून मनुष्यासाठी उचित आहे की, त्याने आपल्यासाठी काहीही करू नये, आपले काहीही समजू नये तसेच आपल्यासाठी कशाचीही इच्छा ठेऊ नये.

कर्मफलाचा (उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या सर्व वस्तू) आश्रय घेणे "आपल्यासाठी पाक क्रिया करणे" चे अन्तर्गत आहे. याचसाठी भगवंतांनी सहाव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकात "**अनाश्रितः कर्मफलम्**" पदाने कर्मयोग्याला कर्म-फळाचा आश्रय घेऊ नये असे म्हटले आहे. सर्वथैव अनाश्रित झाल्यावरच मनुष्य आपल्यासाठी काहीही करत नाही. ज्यामूळे तो योगामध्ये स्थित होतो.

**भुञ्जते ते त्वघं पापाः**—या पदात भगवंतांनी "आपल्यासाठी" कर्म करणारांची सभ्य भाषेत निंदा केली आहे. आपल्यासाठी केल्या गेलेल्या कर्मापासून तो इतका पाप संग्रह करतो की, चौऱ्यांशी लाख योनीचे आणि नर-कांचे दुःख भोगूनसुद्धा ते पाप संपत नाही तर संचित रूपात शिल्लक राहते. मनुष्ययोनी असे अद्भुत शेत आहे की, ज्यामध्ये जे कोणते पाप अथवा पुण्याचे बीज पेरले जाईल ते अनेक जन्मापर्यंत फळ देत राहते.* म्हणून मनुष्याने तात्काळ असा निश्चय करावा की, "आता मी पाप (आपल्यासाठी कर्म) करणार नाही". या निश्चयात फार मोठी शक्ती आहे. खरे तर असे आहे की, परमात्म्याकडे वाटचाल करण्याचा दृढ निश्चय झाल्यास पाप होणे आपोआप बंद होते.

* वास्तविक पाहिले तर मनुष्यजन्मच सर्व जन्मांमध्ये मूळचा आणि शेवटचा जन्म आहे. जर मनुष्याने परमात्मप्राप्ती करून घेतली तर त्याचा शेवटचा जन्म हाच आहे आणि परमात्मप्राप्ती करून घेतली नाही तर अनंत जन्मांचा मूळचा जन्म हाच आहे.

**परिशिष्ट भाव**—मनुष्याजवळ शरीर, योग्यता, पद, अधिकार, विद्या, बल इत्यादी जे काही आहे ते सर्व मिळालेले आहे आणि निघून जाणारे आहे. म्हणून ते आपले आणि आपल्यासाठी नाही, तर दुसऱ्यांच्या सेवेसाठी आहे. या गोष्टीत आपल्या भारतीय संस्कृतीचा सिद्धांत पूर्ण बसतो. जसे आपल्या शरीराचे सर्व अवयव शरीराच्या हितासाठीच आहेत, तसेच संसारातील सर्वच मनुष्य संसाराच्या हितासाठीच आहेत. कोणताही मनुष्य कोणत्याही देश, वेश, वर्ण, आश्रम इत्यादीचा का असेना, आपल्या कर्माद्वारा दुसऱ्यांची सेवा करून सुगमतेने आपले कल्याण करू शकतो.

आपल्यात जी काही विशेषता आहे, ती दुसऱ्यांसाठी आहे, आपल्यासाठी नव्हे. जर सर्व मनुष्य असे करू लागतील तर कोणीही बद्ध राहणार नाही, सर्व जीवन्मुक्त होतील. मिळालेली वस्तू दुसऱ्यांच्या सेवेत अर्पिली तर आपल्या घरून काय खर्च झाले. फुकटात कल्याण होईल. याशिवाय मुक्तीसाठी इतर काही करण्याची आवश्यकताच नाही. जेवढे आमच्याजवळ आहे, तेवढेच सेवेत लावण्याची जिम्मेदारी आहे, त्यापेक्षा अधिकची जिम्मेदारी नाहीच. त्यापेक्षा अधिक करूही शकत नाही. आपल्या जवळ जितकी वस्तू, योग्यता आणि सामर्थ्य आहे, तितकी पूर्ण सेवेत खर्च कराल तर कल्याण सुद्धा पूर्णच होईल.

वास्तविक शरीराने संसाराचेच काम होते, आपले काम होतच नाही, कारण शरीर आपल्यासाठी नाहीच. काहीना काही काम करण्यासाठीच शरीराची जरूरी असते. जर काहीही करणार नाही तर शरीराची काय जरूरी आहे? म्हणून शरीराद्वारा आपल्यासाठी काही करणेच दोष आहे. मिळालेल्या वस्तू द्वारा आपण आपल्यासाठी काही करू शकत नाही, तर त्याच्याद्वारा संसाराची सेवा करू शकतो. शरीर संसाराचा अंश आहे, म्हणून याच्याद्वारा जे काही होइल, संसारासाठीच होईल. संसाराच्या पुढे शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी जाऊ शकतच नाहीत, त्यांना इंद्रियाहून वेगळे करू शकतच नाही. म्हणून आपल्या सुखासाठी कर्म करणे मनुष्यपणा नव्हे, तर राक्षसपणा आहे, असुरपणा आहे. वास्तविक माणूस तोच आहे, जो दुसऱ्यांच्या हितासाठी कर्म करतो. आपल्या सुखासाठी कर्म करणारे पापाचेच भक्षण करतात अर्थात् सदा दुःखी च राहतात आणि दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करणारे संपूर्ण पापापासून मुक्त होतात अर्थात् नेहमीसाठी सुखी होतात—**'यज्ञशिष्टामृतभूजो यान्ति ब्रह्म सनातनम्'** (गीता ४। ३१).

***संबंध***—*"मला घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात?" अर्जुनाच्या या प्रश्नाच्या उत्तरात भगवंतांनी अनेक कारणे सांगून पुढील दोन श्लोकात सृष्टिचक्राच्या संरक्षणासाठीही यज्ञ (कर्तव्यकर्म) करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली आहे.*

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसम्भवः।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः॥ १४॥**
**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम्।**
**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्॥ १५॥**

**भूतानि** = संपूर्ण प्राणी
**अन्नात्** = अन्नापासून
**भवन्ति** = उत्पन्न होतात.
**अन्नसम्भवः** = अन्नाची उत्पत्ती
**पर्जन्यात्** = वर्षाने होते.
**पर्जन्यः** = वर्षा (पाऊस)
**यज्ञात्** = यज्ञाने
**भवति** = होते.
**यज्ञः** = यज्ञ
**कर्मसमुद्भवः** = कर्मांनी संपन्न होतो.
**कर्म** = कर्मांना (तू)
**ब्रह्मोद्भवम्** = वेदापासून उत्पन्न (झालेले)
**विद्धी** जाण (आणि)
**ब्रह्म** = वेद
**अक्षर समुद्भवम्** = अक्षर ब्रह्मापासून प्रगट झालेले जाण.
**तस्मात्** = म्हणून (तो)
**सर्वगतम्** = सर्वव्यापी
**ब्रह्म** = परमात्मा
**यज्ञे** = यज्ञात (कर्तव्यकर्मात)
**नित्यम्** = नित्य
**प्रतिष्ठितम्** = स्थित आहे.

*व्याख्या*— **अन्नाद्भवन्ति भूतानि**—प्राणाचे पोषण करण्यासाठी जे खावे लागते तेच "अन्न"* म्हणविले जाते.

ज्या प्राण्याचे जे खाद्य आहे जे भक्षण केल्याने त्याच्या शरीराची उत्पत्ती, भरण आणि पुष्टी होते. त्यालाच येथे "अन्न" नावाने म्हटले आहे. जसे मातीतील कीडा माती खाऊनच जगतो तर मातीच त्याच्यासाठी अन्न झाले.

जरायुज (मनुष्य, पशू इत्यादी) उद्भिज (वृक्षादी) अण्डज (पक्षी, सर्प, मुंगी इत्यादी) आणि स्वेदज (गोचिड,

* "अद भक्षणे" धातुने "क्त" केल्यास "अदोऽनन्ने" (अष्टा० ३।२।६८) सूत्राच्या निपतनाने "अन्न" शब्द तयार होतो नाहीतर "अदो जग्धिर्ल्यप्ति किति०" (अष्टा० २।४।३६) ने जग्ध शब्द होईल.

ढेकूण, ऊ वगैरे) हे चार प्रकारचे प्राणी अन्नापासूनच उत्पन्न होतात आणि उत्पन्न झाल्यानंतर अन्नावरच जगतात.*

**पर्जन्यादन्नसम्भवः**—संपूर्ण खाद्य पदार्थांची उत्पत्ती पाण्यापासून होते. गवत, अन्न, धान्य इत्यादी तर पाण्यापासून होतातच, मातीच्या उत्पन्न होण्यातसुद्धा पाणीच कारण आहे. अन्न, पाणी, वस्त्र निवास इत्यादी शरीरनिर्वाहाची सर्व सामुग्री स्थूल अथवा सूक्ष्मरूपाने पाण्याशीच संबंध ठेवते आणि पाण्याचा आधार पाऊस आहे.

**यज्ञाद्भवति पर्जन्यः**—यज्ञ शब्द मुख्यरूपाने आहुती देण्याच्या क्रियेचे वाचक आहे. परंतु गीतेच्या सिद्धांत आणि कर्मयोगाच्या प्रस्तुत प्रकरणानुसार येथे ''यज्ञ'' शब्द संपूर्ण कर्तव्यकर्मांचा द्योतक आहे. यज्ञात त्याग मुख्य असतो. आहुती देण्यात अन्न, तूप इत्यादी वस्तूंचा त्याग आहे, दान करण्यात वस्तूंचा त्याग आहे, तप करण्यात आपल्या सुख-भोगाचा त्याग आहे, कर्तव्यकर्म करण्यात आपल्या स्वार्थ, आराम इत्यादीचा त्याग आहे. म्हणून ''यज्ञ'' शब्द यज्ञ (हवन), दान, तप इत्यादी संपूर्ण शास्त्रविहित क्रियांचा दर्शक आहे.

बृहदारण्यक उपनिषदामध्ये एक कथा येते. प्रजापती ब्रह्मदेवाने देवता, मनुष्य आणि असुर—या तिघांना निर्माण करून त्यांना ''द'' या अक्षराचा उपदेश दिला. देवतांजवळ भोग सामुग्रीचे अधिक्य असल्याने त्यांनी ''द'' चा अर्थ ''दमन करा'' असे समजले. मनुष्यात संग्रहाची प्रवृत्ती असल्याने त्यांनी ''द'' चा अर्थ ''दान करा'' असे समजले असुरांमध्ये हिंसेचा (दुसऱ्यांना कष्ट देणे) भाव अधिक असल्याने त्यांनी ''द'' चा अर्थ ''दया करा'' असा घेतला. अशा प्रकारे देवता, मनुष्य आणि असुर तिघांना दिल्या गेलेल्या उपदेशाचे तात्पर्य दुसऱ्यांचे हित करण्यातच आहे. वर्षाकाळी मेघ जे द.. द.. द.. ची गर्जना करतात. ते आजही ब्रह्मदेवाच्या उपदेशाच्या (दमन करा, दान करा, दया करा) रूपाने कर्तव्यकर्म करण्याविषयी आठवण देतात. बृहदारण्यक० (५।२।१-३)

आपल्या कर्तव्यकर्माच्या पालनाने पाऊस कसा पडेल? वचनापेक्षा स्वतःच्या आचरणाचा आपोआप दुसऱ्यावर फार मोठा परिणाम होतो. ''**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः।**'' (३।२१) मनुष्याने आपापल्या कर्तव्याचे पालन केले तर त्याचा परिणाम देवतांवरही पडेल ज्यामुळे ते देखील कर्तव्याचे पालन करतील, वर्षा करतील (३।११). या विषयात एक कहाणी आहे. चार शेतकरी-बालक होते. आषाढाचा महिना आला तरी पाऊस पडला नाही तेव्हा त्यानी विचार केला की, शेतात नांगरट करण्याची वेळ आली आहे. पाऊस नाही झाला तर नाही झाला, आपण तर आपल्या कर्तव्याचे पालन करावे असा विचार करून त्यांनी शेतात जाऊन नांगरट करण्यास सुरुवात केली. मोरांनी त्यांना शेत नांगरीत असताना पाहिले तर विचार केला की, वर्षा तर अद्याप झाली नाही मग हे लोक नांगरटी का करीत आहेत? जेव्हा हे त्यांना कळले की, हे आपल्या कर्तव्याचे पालन करीत आहेत मग त्यांनी विचार केला की, आपण आपले कर्तव्यकर्म करण्यात मागे का रहावे? अशा विचाराने मोर ओरडू लागले, नाचू लागले. मोरांचा आवाज ऐकून मेघाने विचार केला की, आज आमची गर्जना न ऐकताच मोर कसे ओरडत आहेत? सर्व गोष्टीचा पत्ता लगल्यावर त्यांनीही असा विचार केला की, आपण आपल्या कर्तव्यापासून माघार का घ्यावी? त्यांनी ही गर्जना सुरू केली. मेघाची गर्जना ऐकून इंद्राने विचार केला की, ही काय भानगड आहे? जेव्हा त्याला कळाले की, ते आपल्या कर्तव्याचे पालन करीत आहेत तेव्हा त्यानेही विचार केला की, माझे कर्तव्यकर्म करण्यात मी का मागे राहू? अशा विचाराने इंद्राने देखील मेघांना पाऊस पाडण्याची आज्ञा दिली.

**यज्ञः कर्मसमुद्भवः**—निष्कामभावाने केले जाणारे लौकिक आणि शास्त्रीय सर्व विहित कर्मांचे नाव ''यज्ञ'' आहे. ब्रह्मचाऱ्यासाठी अग्निहोत्र करणे ''यज्ञ'' आहे. तसेच स्त्रीयांसाठी स्वयंपाक करणे ''यज्ञ'' आहे.† आयुर्वेदाच्या जाणकाराने केवळ लोकांच्या हितासाठी वैद्य-कर्म केले तर त्याच्यासाठी तोच ''यज्ञ'' आहे. त्याचप्रमाणे विद्यार्थी आपल्या अध्ययनाला आणि व्यापारी आपल्या व्यापाराला (जर ते केवळ दुसऱ्याच्या हितासाठी निष्कामभावाने केले तर) ''यज्ञ'' समजू शकतात. अशा प्रकारे वर्ण, आश्रम, देश, काळाची मर्यादा राखून निष्कामभावनेने केले गेलेले सर्वच शास्त्रविहित कर्तव्यकर्म ''यज्ञ'' रूप असतात. यज्ञ कोणत्याही

* ''अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते। अन्नेन जातानि जीवन्ति'' (तैत्तिरीयोपनिषद ३।२)

† वैवाहिको विधिः स्त्रीणां संस्कारो वैदिक स्मृतः।
पतिसेवा गुरौ वासो गृहार्थोऽग्निपरिक्रिया॥ (मनुस्मृति २।६७)

स्त्रीयांसाठी वैवाहिक विधीचे पालनच वैदिक (यज्ञोपवीत) संस्कार, पतीची सेवाच गुरुकुल-निवास (वेदाध्ययन) आणि गृहकृत्य हेच अग्निहोत्र (यज्ञ) म्हटले गेले आहे.

प्रकारचा असो क्रियाजन्यच असतो.

संखिया एक विषारी वनस्पती, भिलावा (बिबा) इत्यादी विषांनाही वैद्य लोक जेव्हा शुद्ध करून औषधरूपाने देतात तेव्हा ते विषही अमृतासारखे होऊन मोठमोठ्या रोगांना नष्ट करणारे होतात. त्याचप्रमाणे कामना, ममता, आसक्ती, पक्षपात, विषमता, स्वार्थ, अभिमान इत्यादी हे सर्व कर्मात विषासमान आहेत. कर्माच्या ह्या विषारी भागाला काढून टाकल्यावर ते कर्म अमृतमय होऊन जन्म-मरणरूप महान रोगाला नष्ट करणारे होतात. अशा अमृतमय कर्मांनाच ''यज्ञ'' म्हणतात.

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि**—वेद कर्तव्यकर्म करण्याची विधी सांगतात (४।३२). मनुष्याला कर्तव्यकर्म करण्याच्या विधीचे ज्ञान वेदापासून होत असल्यानेच कर्माला वेदापासून उत्पन्न झाले असे म्हटले गेले आहे.

''वेद'' शब्दाच्या अंतर्गत ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेदासह स्मृती, पुराण, इतिहास (रामायण-महाभारत) तसेच भिन्न-भिन्न सांप्रदायांच्या आचार्यांचे अनुभव-वचन इत्यादी संपूर्ण वेदानुकूल सत्-शास्त्रांना गृहीत धरले पाहिजे.

**ब्रह्माक्षरसमुद्भवम्**—येथे ''ब्रह्म'' पद वेदाचा वाचक आहे. वेद सच्चिदानन्दघन परमात्म्यापासूनच प्रगट झाले आहेत (१७।२३) अशाप्रकारे परमात्मा सर्वांचे मूळ झाले.

परमात्म्यापासून वेद प्रगट होतात. वेद कर्तव्य पालनाची विधी सांगतात. मनुष्य त्या कर्तव्याचे विधीपूर्वक पालन करतो. कर्तव्यकर्माच्या पालनाने ''यज्ञ'' होतो आणि यज्ञाने पाऊस पडतो. पावसामुळे अन्न उत्पन्न होते, अन्नापासून प्राणी निर्माण होतात आणि त्या प्राण्यांपैकी मनुष्य कर्तव्य-कर्माच्या पालनाने यज्ञ करतात.* अशा प्रकारे हे सृष्टिचक्र चालत आहे.

**तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम्**—येथे ब्रह्म पद अक्षरा (सगुण-निराकार परमात्मा) चा वाचक आहे. म्हणून सर्वगत (सर्वव्यापी) परमात्मा आहे, वेद नव्हे.

सर्वव्यापी असूनही परमात्मा विशेषरूपाने ''यज्ञात'' (कर्तव्यकर्म) नित्य विद्यमान असतात. तात्पर्य जेथे निष्काम-भावाने कर्तव्यकर्माचे पालन केले जाते तेथे परमात्मा असतात. म्हणून परमात्मप्राप्तीची इच्छा असणारे मनुष्य आपल्या कर्तव्यकर्माद्वारा परमात्म्याला सुगमतेने प्राप्त करू शकतात ''**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः**''। (१८।४६)

**शंका**—परमात्मा जर सर्वव्यापी आहे तर त्यांना केवळ यज्ञात नित्य प्रतिष्ठित का म्हटले गेले आहे? दुसऱ्या जागी ते नित्य प्रतिष्ठित नाहीत काय?

**समाधान**—परमात्मा तर सर्व ठिकाणी समानरूपाने नित्य विद्यमान आहेत. ते अनित्य आणि एकदेशीय नाहीत. म्हणून त्यांना याठिकाणी ''सर्वगत'' म्हटले गेले आहे. यज्ञात (कर्तव्यकर्म) नित्य प्रतिष्ठित म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, यज्ञ त्यांचे उपलब्धि-स्थान आहे. जमीनीत सर्वत्र पाणी असूनही ते विहीर इत्यादीतूनच उपलब्ध होते, सर्व ठिकाणाहून नव्हे. नळीमध्ये सर्वत्र पाणी भरलेले असूनही ज्या ठिकाणी छिद्र आहे किंवा तोटी आहे तेथूनच पाणी प्राप्त होते. तसेच सर्वगत असूनही परमात्मा यज्ञापासूनच प्राप्त होतात.

आपल्यासाठी कर्म केल्याने तसेच जडतेशी (शरीरादी) आपला संबंध समजल्याने सर्वव्यापी परमात्म्याच्या प्राप्तीत बाधा येते. निष्कामभावपूर्वक, केवळ दुसऱ्याच्या हितासाठी, आपल्या कर्तव्याचे पालन करण्याने ही बाधा दूर होते आणि नित्यप्राप्त परमात्म्याचा आपोआप अनुभव येतो. हेच कारण आहे की, भगवंत अर्जुनाला, जे आपल्या कर्तव्यकर्मापासून परावृत्त होऊ इच्छित होते, अनेक युक्तींनी कर्तव्याचे पालन करण्यावर विशेष भर देऊन सांगत आहेत.

*संबंध—सृष्टिचक्रानुसार चालण्याची अर्थात् आपल्या कर्तव्याचे पालन करण्याची जिम्मेदारी मनुष्यावरच आहे. म्हणून जो मनुष्य आपल्या कर्तव्याचे पालन करीत नाही त्याचा उपहास भगवान् पुढील श्लोकात करतात.*

# एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः।
# अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति॥ १६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पार्थ! | **इह** | = या लोकात | **प्रवर्तितम्** | = (परंपरेने) चालत आलेल्या |
| **यः** | = जो मनुष्य | **एवम्** | = अशा प्रकारे | | |

* मनुष्येतर सर्व स्थावर जंगम प्राण्याकडून आपोआप यज्ञ (परोपकार) होत असतो. परंतु ते यज्ञाचे अनुष्ठान बुद्धिपूर्वक करू शकत नाहीत. बुद्धिपूर्वक यज्ञाचे अनुष्ठान मनुष्यच करू शकतो. कारण याचा अधिकार आणि योग्यता मनुष्यालाच आहे.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **चक्रम्** | = सृष्टिचक्रा- | **इन्द्रियारामः** | = इंद्रियांद्वारा भोगात रममाण होणारा | | जगणारा) मनुष्य |
| **न, अनुवर्तयति** | = नुसार चालत नाही, | **अघायुः** | = पापी (पापमय जीवन | **मोघम्** | = (संसारात) व्यर्थच |
| **सः** | = तो | | | **जीवति** | = जगतो. |

***व्याख्या*— पार्थ—**नवव्या श्लोकात प्रारंभ केलेल्या प्रकरणाचा उपसंहार करून भगवान् याठिकाणी अर्जुनाला "पार्थ" संबोधन देऊन जणू म्हणत आहेत की, तू त्या पृथा (कुन्ती) चा पुत्र आहेस, जिने अजीवन कष्ट सहन करूनही आपल्या कर्तव्याचे पालन केले होते. म्हणून तुझ्याकडूनही आपल्या कर्तव्याची अवहेलना व्हावयास नको. ज्या युद्धाला तू घोर कर्म म्हणत आहेस, ते तुझ्यासाठी घोर कर्म नाही तर यज्ञ (कर्तव्यकर्म) आहे. याचे पालन करणेच सृष्टिचक्रानुसार वर्तन करणे आहे आणि याचे पालन न करणे म्हणजे सृष्टिचक्रानुसार वर्तन न करणे होय.

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः**—जसे रथाच्या चाकाचा लहानसा भाग जरी तुटला तरी रथाच्या सर्व अंगाना, तसेच त्यात बसलेल्या रथी आणि सारथ्याला धक्का बसतो त्याचप्रमाणे जो मनुष्य चौदाव्या-पंधराव्या श्लोकात वर्णित सृष्टिचक्रानुसार वर्तन करीत नाही तो संपूर्ण सृष्टीच्या संचालनामध्ये बाधा आणतो.

संसार आणि व्यक्ती दोन (विजातीय) वस्तू नाहीत. जसे शरीराचा अंगाशी आणि अंगाचा शरीराशी घनिष्ट संबंध आहे तसेच संसाराचा व्यक्तीशी आणि व्यक्तीचा संसाराशी घनिष्ट संबंध आहे. जेव्हा व्यक्ती कामना, ममता, आसक्ती आणि अहंकाराचा त्याग करून आपल्या कर्तव्याचे पालन करते तेव्हा त्यामुळे संपूर्ण सृष्टीला आपोआप सुख पोहचते.

**इंद्रियारामः**—जो मनुष्य कामना, ममता, आसक्ती इत्यादींनी युक्त होऊन इंद्रियांद्वारा भोग भोगतो, त्याला याठिकाणी भोगात रममाण होणारा म्हटले गेले आहे. असा मनुष्य पशुपेक्षाही नीच आहे कारण पशू नवीन पाप करीत नाहीत तर पूर्वी केल्या गेलेल्या, पापांचेच फळ भोगून शुद्ध होऊ लागतात. परंतु "इंद्रियाराम" मनुष्य नव-नवीन पाप करून पतनाकडे जातो आणि त्याबरोबरच सृष्टिचक्रात बाधा उत्पन्न करून संपूर्ण सृष्टीला दुःख पोहचवितो.

**अघायुः**—सृष्टिचक्रानुसार न चालणाऱ्या मनुष्याचे आयुष्य, त्याचे जीवन केवळ पापमय असते. कारण की, इंद्रियांद्वारा भोगबुद्धीने भोग भोगणारा मनुष्य हिंसारूप पापापासून वाचूच शकत नाही. स्वार्थी, अभिमानी आणि भोग तसेच संग्रहाची इच्छा करणाऱ्या मनुष्याकडून दुसऱ्यांचे अहित होत असते. म्हणून अशा मनुष्याचे जीवन पापमय असते. गोस्वामी श्री तुलसीदासजी म्हणतात—

**परद्रोही परदाररत परधन पर अपबाद। ते नर पाँवर पापमय देह धरें मनुजाद॥**

(मानस ७।३९)

**मोघं पार्थ स जीवति**—आपल्या कर्तव्याचे पालन न करणाऱ्या मनुष्याची सभ्य भाषेत निंदा करून भगवान् म्हणतात की, असा मनुष्य संसारात व्यर्थच जगत असतो अर्थात् तो मृत्यू पावला असता तर बरे झाले असते. तात्पर्य जर तो आपल्या कर्तव्याचे पालन करून सृष्टीला सुख पोहचवीत नाही तर कमीत कमी दुःख तरी देऊ नये. जसे भगवान् श्रीरामांच्या वनवासाचेवेळी अयोध्या-वासियांना, जेव्हा ते चित्रकूटला आले होते, तेव्हा कोल, किरात, भिल्ल इत्यादी जंगली लोकांनी म्हटले होते की, आम्ही आपले वस्त्र आणि भांडी चोरत नाहीत हीच आमची फार मोठी सेवा आहे. "**यह हमारि अति बडि सेवकाई। लेहिं न बासन बसन चोराई॥**" (मानस २।२५१।२) तसेच आपल्या कर्तव्याचे पालन न करणारा मनुष्य कमीत कमी सृष्टिचक्रात बाधा न टाकील तर ही त्याची सेवाच आहे.

सृष्टिचक्रानुसार न चालणाऱ्या मनुष्यासाठी भगवंतांनी प्रथम "**स्तेन एव सः**" (३।१२) "तो चोरच आहे" आणि "**भुञ्जते ते त्वघम्**" (३।१३) "ते तर पापच खातात" अशा प्रकारे म्हटले आणि आता या श्लोकात "**अघायुरिन्द्रियारामः**" तो पापायु आणि इंद्रियाराम आहे असे म्हणून त्याच्या जगण्यालाही व्यर्थ म्हणतात.

गोस्वामी तुलसीदासजी महाराजही म्हणतात—

**तेज कृसानु रोष महिषेसा। अघ अवगुन धन धनी धनेसा॥**
**उदय केत सम हित सबही के। कुंभकरन सम सोवत नीके॥**

(मानस १।४।३)

**परिशिष्ट भाव**—नवव्या श्लोकापासून येथपर्यंत जे वर्णन आले आहे, त्याचे तात्पर्य निःस्वार्थभावाने दुसऱ्यांची सेवा करण्यातच आहे.

***संबंध*—*संसाराशी संबंध-विच्छेद करण्यासाठी जो आपले कर्तव्याचे पालन करीत नाही त्या मनुष्याचा पूर्व श्लोकात भगवंताने उपहास केला आहे. परंतु ज्याने आपल्या कर्तव्याचे पालन करून संसाराशी संबंध-विच्छेद करून घेतला आहे त्या महापुरुषाच्या स्थितीचे वर्णन भगवान् पुढील दोन श्लोकात करतात.***

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः।**
**आत्मन्येव च सन्तुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥१७॥**

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **तु** | = | परंतु | **च** | = | आणि | **सन्तुष्टः** | = | संतुष्ट |
| **यः** | = | जो | **आत्मतृप्तः** | = | आपण आपल्यातच तृप्त (असणारा) | **स्यात्** | = | आहे, |
| **मानवः** | = | मनुष्य | | | | **तस्य** | = | त्याच्यासाठी |
| **आत्मरतिः एव** | = | आपण आपल्यातच रममाण असणारा | **च** | = | तसेच | **कार्यम्** | = | कोणतेही कर्तव्य |
| | | | **आत्मनि, एव** | = | आपण-आपल्यातच | **न, विद्यते** | = | नाही |

*व्याख्या*— **यस्त्वात्मरतिरेव........च सन्तुष्टस्तस्य—** येथे ''तु'' पद पूर्व श्लोकात वर्णित आपल्या कर्तव्याचे पालन न करणाऱ्या मनुष्यापेक्षा कर्तव्यकर्म करून सिद्धिला प्राप्त झालेल्या महापुरुषाची विलक्षणता दाखविण्यासाठी प्रयुक्त झाले आहे.

जोपर्यंत मनुष्य आपला संसाराशी संबंध मानतो तो-पर्यंत तो आपली आवड (प्रीती) इद्रियांच्या भोगाशी तसेच स्त्री, पुत्र, परिवाराशी ठेवतो आणि ''तृप्ती'' जेवणाने (अन्न-पाणी) तसेच ''तुष्टी'' (संतुष्टी) धनाने समजतो. परंतु या-विषयी त्याची प्रीती, तृप्ती आणि तुष्टी कधीही पूर्ण होणारी नसते आणि निरंतरही नसते. कारण संसार प्रतिक्षण परिवर्तनशील, जड आणि नाशवान आहे तसेच ''स्व'' नित्य एकरस राहणारा, चेतन आणि अविनाशी आहे. तात्पर्य ''स्व'' चा संसाराशी लेशमात्रही संबंध नाही. म्हणून ''स्व'' ची प्रीती, तृप्ती आणि तुष्टी संसारापासून कशी होऊ शकेल?

कोणत्याही मनुष्याची प्रीती संसाराशी नित्य राहत नाही—हा सर्वांचा अनुभव आहे. विवाहाच्या वेळी स्त्री आणि पुरुषात एकमेकांविषयी जी प्रीती अथवा आकर्षण दिसून येते, ती एक-दोन मुले झाल्यानंतर राहत नाही. कुठे कुठे तर स्त्रिया आपल्या म्हाताऱ्या पतीसाठी असेही म्हणत असलेल्या आढळून येतात की, ''हा म्हातारा मरून गेला तर फार चांगले होइल.'' भोजन केल्याने जी तृप्ती होते ती फारच थोड्या काळापुरती असते. मनुष्याला धनप्राप्तीत जी संतुष्टी दिसून येते ती देखील क्षणिक असते. कारण धनाची लालसा उत्तरोत्तर वाढतच जाते. म्हणून उणीव निरंतर कायम राहते. तात्पर्य संसाराविषयी प्रीती, तृप्ती आणि तुष्टी कधीही कायमची राहू शकत नाही.

मनुष्याला सांसारिक वस्तूमध्ये प्रीती, तृप्ती आणि तुष्टीचा केवळ भास होतो, वास्तविक नव्हे. जर खरी झाली असती तर पुन: अरती, अतृप्ती, असंतुष्टी झाली नसती. स्वरूपाविषयी प्रीती, तृप्ती संतुष्टी स्वाभाविक आहे. स्वरूप सत् आहे. सत्मध्ये कधी अभाव होत नाही. ''**नाभावो विद्यते सतः**'' (२।१६) आणि अभावावाचून कोणती कामना उत्पन्न होत नाही. म्हणून स्वरूपात निष्कामता स्वत: सिद्ध आहे. परंतु जेव्हा जीवात्मा चुकीने संसाराशी आपला संबंध मानतो तेव्हा तो प्रीती, तृप्ती आणि संतुष्टीला संसारात शोधू लगतो आणि त्याच्यासाठी सांसारिक वस्तूंची कामना करू लागतो. कामना केल्यानंतर जेव्हा त्या वस्तू (धनादी) मिळतात तेव्हा मनात स्थित असलेली कामना पूर्ण झाल्यामुळे (आणि दुसरी कामना उत्पन्न होण्यापूर्वी) त्याची अवस्था निष्काम होते आणि त्याच निष्कामतेचे त्याला सुख होते. परंतु त्या सुखाला मनुष्य चुकीने सांसारिक वस्तूंच्या प्राप्तीपासून उत्पन्न झाल्याचे समजतो आणि त्या सुखालाच प्रीती, तृप्ती आणि संतुष्टीच्या नावाने ओळखतो. जर वस्तूच्या प्राप्तीने ते सुख झाले असते तर त्याच्या मिळण्याने त्या वस्तूच्या अस्तित्वात सदा सुख रहावयास पाहिजे होते, दु:ख कधीही व्हावयास नको होते आणि पुन: वस्तूची कामना उत्पन्न व्हावयास नको होती. परंतु सांसारिक वस्तूपासून कधीही पूर्ण (नेहमीसाठी) प्रीती, तृप्ती आणि संतुष्टी प्राप्त होऊ न शकल्याने, तसेच संसाराशी ममतेचा संबंध कायम राहिल्यामुळे तो पुन: नवीन नवीन कामना करू लागतो. कामना उत्पन्न झाल्याने आपल्यात अभावाचा तसेच काम्य वस्तूच्या मिळण्याने आपल्यात पराधीनतेचा अनुभव होतो. म्हणून कामना करणारा माणूस नेहमी दु:खी राहतो.

या ठिकाणी ही गोष्ट ध्यानात ठेवावयाची आहे की, साधक तर त्या सुखाचे मूळ कारण निष्कामता मानतात आणि दु:खाचे कारण कामना मानतात. परंतु संसारात आसक्त मनुष्य वस्तूच्या प्राप्तीत सुख मानतो आणि वस्तुच्या अप्राप्तीत दु:ख मानतो. जर आसक्त मनुष्यानेसुद्धा साधकासमानच यथार्थ दृष्टीने पाहीले, तर त्याला शीघ्रच स्वत:सिद्ध निष्कामतेचा अनुभव होऊ शकतो.

सकामी मनुष्यांना कर्मयोगाचे अधिकारी म्हटले गेले आहे ''**कर्मयोगस्तु कामिनाम्**''(श्रीमद्भा० ११।२०।७) सकामी मनुष्यांची प्रीती, तृप्ती आणि तुष्टी संसाराविषयी असते. म्हणून कर्मयोगाने सिद्ध झालेल्या निष्कामी महापुरुषांची स्थिती वर्णन करताना भगवान् म्हणतात की, त्यांची प्रीती,

तृप्ती आणि तुष्टी सकामी मनुष्यासारखी संसाराविषयी न राहता आपोआप स्वरूपाविषयी होते (२।५५) जी वास्तविक पूर्वीपासूनच आहे.

वास्तविक पाहता प्रीती, तृप्ती आणि तुष्टी तिन्ही वेगळे नसतांनाही संसाराच्या संबंधामुळे वेगवेगळे प्रतीत होतात. याच कारणाने संसाराशी संबंध विच्छेद झाल्याने त्या महापुरुषाची प्रीती, तृप्ती आणि तुष्टी—तिन्ही एकाच तत्त्वाविषयी (स्वरूपा) होते.

भगवंतांनी या श्लोकात दोन वेळा तसेच पुढे (अठराव्या) श्लोकात एकवेळा "एव" आणि "च" पदांचा प्रयोग केला आहे. यावरुन असा भाव प्रगट होतो की, कर्मयोग्याच्या प्रीती, तृप्ती आणि तुष्टीमध्ये कोणत्याही प्रकारची उणीव येत नाही आणि तत्त्वाखेरीज दुसऱ्याची आवश्यकताही राहत नाही (६।२२)

**तस्य कार्यं न विद्यते**—मनुष्यासाठी जे काही कर्तव्य-कर्माचे विधान केले गेले आहे त्याचा उद्देश परम कल्याणस्वरूप परमात्म्याची प्राप्ती करणेच आहे. कोणत्याही साधनाने (कर्मयोग, ज्ञानयोग अथवा भक्तियोग) उद्देशाची सिद्धी झाल्यास काहीही करणे, जाणणे आणि मिळविणे शिल्लक राहत नाही जी मनुष्याच्या जीवनाची परम सफलता आहे.

मनुष्याच्या वास्तविक स्वरूपात थोडाही अभाव नसताना सुद्धा, जोपर्यंत तो संसाराच्या संबंधामुळे, आपल्यात अभाव समजून आणि शरीराला "मी" आणि "माझे" समजून, आपल्यासाठी कर्म करतो, तोपर्यंत त्याच्यासाठी कर्तव्य शिल्लक राहते. परंतु तो जेव्हा आपल्यासाठी काहीही न करता "दुसऱ्यासाठी" अर्थात् शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राणासाठी, माता, पिता, स्त्री, पुत्र परिवारासाठी, समाजासाठी, देशासाठी आणि जगतासाठी संपूर्ण कर्म करतो तेव्हा त्याचा शरीराशी संबंध-विच्छेद होतो. संसाराशी संबंध विच्छेद होताच त्याला आपल्यासाठी कोणतेही कर्तव्य शिल्लक राहत नाही. कारण स्वरूपात कोणतीही क्रिया नसते. जी काही क्रिया होत असते ती संसाराच्या संबंधानेच होते आणि संसारिक वस्तूद्वाराच होते. म्हणून ज्यांचा संसाराशी संबंध आहे त्यांच्यासाठीच कर्तव्य आहे.

जेव्हा काहीना काही मिळविण्याची कामना होते तेव्हाच कर्म होते आणि कामना, अभावामुळे निर्माण होते. सिद्ध महापुरुषात कसलाही अभाव नसतोच. तर मग त्यांच्यासाठी कर्तव्य ते काय?

कर्मयोगाने सिद्ध महापुरुषाची रती, तृप्ती आणि तुष्टी जेव्हा आपली आपणातच होते तेव्हा कृतकृत्य, ज्ञात-ज्ञातव्य आणि प्राप्त-प्राप्तव्य झाल्यामुळे तो विधी निषेधाच्या पलीकडे जातो. त्याच्यावर जरी शास्त्राचे शासन नसते तरीही त्याच्या संपूर्ण क्रिया स्वाभाविकच शास्त्रानुकूल तसेच दुसऱ्यांसाठी आदर्श होतात.

या ठिकाणी "**तस्य कार्यं न विद्यते**" पदाचा अभिप्राय असा नाही की, त्या महापुरुषाकडून कोणतीही क्रिया होतच नाही. काहीही करणे शिल्लक न राहूनसुद्धा त्या महापुरुषाकडून लोकसंग्रहासाठी क्रिया आपोआप होत राहतात. जसे डोळ्यांच्या पापण्यांची उघडझाप, श्वासाचे आवागमन, भोजनाचे पचणे इत्यादी क्रिया आपोआप (प्रकृतीत) होतात तसेच त्या महापुरुषाकडून सर्व शास्त्रानुरूप आदर्शरूप क्रियाही (कर्तृत्वाभिमान नसल्यामुळे) आपोआप होतात.

**परिशिष्ट भाव**—कर्मयोगी नि:स्वार्थभावाने संसाराच्या सेवेसाठीच संपूर्ण कर्म करतो. जसे गंगाजलानेच गंगेची पूजा केली जाते, तसेच संसारापासून मिळालेले शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी आणि अहम्ला संसाराच्याच सेवेत लावल्याने चिन्मय स्वरूप शेष राहते. म्हणून त्याची प्रीती, तृप्ती आणि संतुष्टी स्वरूपातच होते.

सांसारिक विधी आणि निषेध—दोन्ही वास्तविक निषेधच आहेत, कारण हे दोन्हीही राहणारे नाहीत. म्हणून संसारापासून संबंध-विच्छेद झाल्यास कर्मयोग्यासाठी कोणता विधि-निषेध राहतच नाही—'**तस्य कार्यं न विद्यते**'।

## नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन।
## न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः॥१८॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्य** | = त्याचा (कर्मयोगाने सिद्ध झालेल्या पुरुषाचा) | **न** | = नाही (आणि) | | (कोणत्याही प्राण्याशी) |
| | | **अकृतेन एव** | = कर्म न करण्याशी-ही (कोणते प्रयोजन राहत) | **कस्य** | = याचा |
| **इह** | = या संसारात | | | **कश्चित्** | = किंचिन्मात्रही |
| **कृतेन** | = कर्म करण्याशी | **न** | = नाही | **अर्थव्यपाश्रयः** | = स्वार्थाचा संबंध |
| **कश्चन** | = कोणतेही | **च** | = तसेच | | |
| **अर्थः** | = प्रयोजन राहत | **सर्वभूतेषु** | = संपूर्ण प्राण्यांत | **न** | = राहत नाही |

*व्याख्या*— **नैव तस्य कृतेनार्थः**—प्रत्येक मनुष्याची काही ना काही करण्याची प्रवृत्ती असते. जोपर्यंत ही करण्याची प्रवृत्ती कोणत्याही संसारिक वस्तूच्या प्राप्तीसाठी असते तोपर्यंत त्याचे आपल्यासाठी करणे शिल्लकच राहते. आपल्यासाठी काही ना काही मिळविण्याच्या इच्छेनेच मनुष्य बंधनात पडतो. त्या इच्छेच्या निवृत्तीसाठी कर्तव्यकर्म करण्याची आवश्यकता आहे.

कर्म दोन प्रकाराने केली जातात. कामना पूर्तीसाठी आणि कामना निवृत्तीसाठी! साधारण मनुष्य तर कामना पूर्तीसाठी कर्म करतात. परंतु कर्मयोगी कामना निवृत्तीसाठी कर्म करतो. म्हणून कर्मयोगाने सिद्ध झालेल्या महापुरुषात कोणतीही कामना नसल्यामुळे, त्याचा कोणत्याही कर्तव्याशी थोडासुद्धा संबंध राहत नाही. त्याच्याकडून निःस्वार्थभावाने संपूर्ण सृष्टीच्या हितासाठी आपोआप कर्म होतात.

कर्मयोगाने सिद्ध झालेल्या महापुरुषाचा कर्माशी स्वतः-साठी (व्यक्तिगत सुख आरामाविषयी) कोणताही संबंध राहत नाही. या महापुरुषाचा असा अनुभव असतो की, पदार्थ, शरीर, इंद्रिय, अंतःकरण इत्यादी केवळ संसाराचे आहेत आणि संसारापासून मिळालेले आहेत, व्यक्तिगत नाहीत. म्हणून यांच्या-कडून केवळ संसारासाठीच कर्म करणे योग्य आहे आपल्यासाठी नव्हे. कारण हे आहे की, संसाराच्या साहाय्यतेशिवाय कोणतेही कर्म केले जाऊ शकत नाही. याशिवाय मिळालेल्या कर्म-सामुग्रीचा संबंधही समष्टी संसाराशीच आहे आपल्याशी नव्हे. म्हणून आपले काहीही नाही. व्यष्टीसाठी समष्टी होऊच शकत नाही. मनुष्याची हीच चूक होते की, तो आपल्यासाठी समष्टीचा उपयोग करू इच्छितो. म्हणूनच त्याला अशांती प्राप्त होते. जर त्याने शरीर, इंद्रिय, मन, बुद्धी, पदार्थ इत्यादीचा उपयोग समष्टी-साठी केला तर त्याला महान् शांती प्राप्त होऊ शकते. कर्मयोगाने सिद्ध झालेल्या महापुरुषात हीच विशेषता असते की, त्याचे म्हणविले जाणारे शरीर, इंद्रिय, मन, बुद्धी, पदार्थ इत्यादीचा उपयोग केवळ संसारासाठी होतो. म्हणून त्याचा शरीरादीच्या क्रियांशी स्वतःचे काहीही प्रयोजन राहत नाही. प्रयोजन नसतानाही त्या महापुरुषाकडून स्वाभाविकच लोकांसाठी आदर्शरूपी उत्तम कर्म होतात. ज्याचे कर्म करण्याशी प्रयोजन असते त्याच्याकडून आदर्श कर्म होत नाहीत—हा सिद्धांत आहे.

**नाकृतेनेह कश्चन**—जो मनुष्य शरीर, इंद्रिय, मन, बुद्धी इत्यादीशी आपला संबंध मानतो आणि आळस, प्रमाद इत्यादीत आवड ठेवतो तो कर्म करू इच्छित नाही. कारण त्याचे प्रयोजन प्रमाद, आळस, आराम यापासून उत्पन्न होणाऱ्या तामस सुखाचे राहते (१८।३९). परंतु हा महापुरुष ज्याने सात्त्विक सुखाचीही हद्द ओलांडली आहे तो तामस सुखाविषयी कसा प्रवृत्त होऊ शकतो? कारण त्याचा शरीरादीशी थोडाही संबंध राहत नाही, तर मग आळस, आराम इत्यादीमध्ये आवड असण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

### मार्मिक गोष्ट

पुष्कळसे साधक कर्म न करण्यालाच महत्त्व देतात. ते कर्मापासून उपरत होऊन समाधीत स्थित होऊ इच्छितात. ज्यामुळे कोणतेही चिंतन शिल्लक राहू नये. ही गोष्ट श्रेष्ठ आणि लाभप्रद तर आहे परंतु सिद्धांत नाही. जरी प्रवृत्ती (करणे) पेक्षा निवृत्ती (न करणे) श्रेष्ठ आहे तरीपण हे काही तत्त्व नाही.

प्रवृत्ती (करणे) आणि निवृत्ती (न करणे) दोन्हीही प्रकृतीच्या कक्षेतले आहेत. निर्विकल्प समाधीपर्यंत सर्व प्रकृतीचे राज्य आहे. कारण निर्विकल्प समाधीपासूनही व्युत्थान होते. सर्व क्रिया प्रकृतीतच होतात—**"प्रकर्षेण करणं (भावेल्युट्) इति प्रकृतिः"** आणि क्रिया झाल्याशिवाय व्युत्थान होणे शक्यच नाही. म्हणून चालणे, बोलणे, पाहणे, ऐकणे इत्यादीप्रमाणे झोपणे, बसणे, उठणे, मौन असणे, मूर्च्छित असणे आणि समाधिस्थ होणे सुद्धा सर्व क्रिया आहेत.* वास्तविक तत्त्वात (चेतनस्वरूप) प्रवृत्ती आणि निवृत्ती दोन्हीही नाहीत. तत्त्व प्रवृत्ती आणि निवृत्ती दोन्हींचा निर्लिप्त प्रकाशक आहे.

शरीराशी तादात्म्य झाल्यासच (शरीराविषयी) "करणे" आणि "न करणे" हे दोन विभाग (द्वन्द्व) होतात. वास्तविक पाहता "करणे" आणि "न करणे" दोन्ही एकाच जातीचे आहेत. शरीराशी संबंध असल्यास "न करणे" देखील वास्तविक "करणे" च होते. जसे "**गच्छति**" जातो क्रिया आहे तसेच "**तिष्ठति**" (उभा आहे) ही क्रियाच आहे. जरी स्थूल दृष्टीने "**गच्छति**" मध्ये क्रिया स्पष्ट दिसून येते आणि

* प्रकृती निरंतर क्रियाशील आहे म्हणून तिच्याशी संबंध ठेवून कोणताही जीव कोणत्याही अवस्थेत क्षणमात्रसुद्धा कर्म केल्यावाचून राहू शकत नाही (३।५, १८।११). म्हणून जोपर्यंत प्रकृतीशी संबंध आहे तोपर्यंत समाधीसुद्धा कर्मच आहे, ज्यामध्ये समाधी आणि उत्थान—या दोन अवस्था असतात. परंतु प्रकृतीशी संबंध विच्छेद झाल्यावर दोन अवस्था राहत नाहीत तर "सहज समाधी" अथवा "सहजावस्था" असते ज्यामधून कधी उत्थान होत नाही. कारण अवस्थेचे भेद प्रकृतीमध्ये असतात स्वरूपामध्ये नव्हे. म्हणून सहजावस्थेला सर्वात उत्तम म्हटले गेले आहे.

उत्तमा सहजावस्था मध्यमा ध्यानधारणा। कनिष्ठा शास्त्रचिन्ता च तीर्थयात्राऽधमाऽधमा॥

''**तिष्ठति**'' मध्ये क्रिया दिसून येत नाही तरीपण सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर ज्या शरीरामध्ये जाण्याची क्रिया होती त्यामध्येच आता उभे राहण्याची क्रिया आहे. त्याचप्रमाणे कोणतेही काम करणे आणि न करणे या दोन्हीतही क्रिया आहे. म्हणून ज्याप्रमाणे क्रियांचे स्थूलरूपाने दिसणे (प्रवृत्ती) प्रकृतीतच आहे त्याचप्रमाणे स्थूल दृष्टीने क्रियांचे न दिसणे (निवृत्ती) ही प्रकृतीतच आहे. ज्याचे प्रकृती आणि तिच्या कार्याशी भौतिक तसेच आध्यात्मिक आणि लौकिक तसेच पारलौकिक कोणतेही प्रयोजन राहत नाही, त्या महापुरुषाचा करणे अथवा न करणेशी कोणताही स्वार्थ राहत नाही.

जडतेशी संबंध झाल्यानेच करणे आणि न करणेचा प्रश्न उद्भवतो. कारण जडतेच्या संबंधाशिवाय कोणतीही क्रिया होतच नाही. या महापुरुषाचा जडतेशी सर्वथैव संबंध-विच्छेद होतो आणि त्याला प्रवृत्ती आणि निवृत्ती दोन्हीहून अतीत अशा सहज निवृत्त तत्त्वात आपल्या स्वाभाविक स्थितीचा अनुभव येतो. म्हणून साधकाला जडते (शरीराविषयी अहंता आणि ममता) विषयी संबंध-विच्छेद करण्याचीच आवश्यकता आहे. तत्त्व नित्य जसेच्या तसे विद्यमान आहेच.

**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः**—शरीर तसेच संसाराशी थोडासाही स्वार्थाचा संबंध न राहिल्यामुळे त्या महापुरुषाच्या संपूर्ण क्रिया सहज दुसऱ्यांच्या हितासाठी होतात. जसे शरीराची सर्व अंग सहज शरीराच्या हितासाठी तत्पर असतात तसेच त्या महापुरुषाचे आपले म्हणविले जाणारे शरीर (जो संसाराचा एक लहानसा भाग आहे) आपोआप संसाराच्या हिताविषयी तत्पर असते. त्याचा भाव आणि त्याच्या संपूर्ण क्रिया संसाराच्या हितासाठीच होतात. जसे आपल्या हाताने आपलेच तोंड धुतले तर आपल्यात स्वार्थ, प्रत्युपकार अथवा अभिमानाचा भाव येत नाही तसेच आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीराद्वारा संसाराचे हित झाल्यास त्या महापुरुषात थोडाही स्वार्थ प्रत्युपकार अथवा अभिमानाचा भाव राहत नाही.

पूर्व श्लोकात भगवंतांनी सिद्ध महापुरुषासाठी म्हटले आहे की, त्याला काहीही कर्तव्य नाही—''**तस्य कार्यं न विद्यते**''. त्याचे कारण सांगत असताना भगवंतांनी या श्लोकात त्या महापुरुषासाठी तीन गोष्टी सांगितल्या आहेत. (१) कर्म करण्याशी त्याचे काहीही प्रयोजन नसते (२) कर्म न करण्याविषयी त्याचे काहींही प्रयोजन राहत नाही (३) कोणत्याही प्राण्याशी आणि पदार्थाशी त्याचा थोडाही स्वार्थाचा संबंध राहत नाही अर्थात् काही मिळविण्याविषयीही त्याचे काही प्रयोजन राहत नाही.

वस्तुतः स्वरूपात करणे अथवा न करणेचे काहीही प्रयोजन नाही आणि कोण्या व्यक्तीशी तसेच वस्तूशी कोणताही संबंध नसतो. कारण शुद्ध स्वरूपाकडून कोणतीही क्रिया होत नाही. जी काही क्रिया होते ती प्रकृती आणि प्रकृतिजन्य पदार्थाच्या संबंधानेच होते. म्हणून आपल्यासाठी काहीही करण्याचे विधान नाही.

जोपर्यंत मनुष्याचे ठिकाणी करण्याची आसक्ती, मिळविण्याची कामना, जगण्याची आशा आणि मरण्याचे भय असते तोपर्यंत त्याच्यावर कर्तव्याचे दायित्व राहते. परंतु ज्याचे ठिकाणी कोणत्याही क्रियेच्या करण्या आणि न करण्याविषयी कोणतीही आसक्ती नाही, संसारातील कोणतीही वस्तू इत्यादी प्राप्त करण्याची इच्छा नाही, जिवंत राहण्याविषयी काहीही आशा नाही आणि मृत्युपासून कसलेही भय नाही, त्याला कर्तव्य करावे लागत नाही तर त्याच्याकडून सहज कर्तव्यकर्म होत राहतात. जेथे अकर्तव्य होण्याची शक्यता असते तेथेच कर्तव्य पालनाची प्रेरणा दिली जाते.

## विशेष गोष्ट

गीतेत भगवंतांनी अशी शैली ठेवली आहे की, ते भिन्न भिन्न साधनांनी परमात्म्याकडे अग्रेसर होणाऱ्या भिन्न भिन्न लक्षणानुसारच परामात्म्याला प्राप्त झालेल्या सिद्ध महापुरुषांच्या लक्षणांचे वर्णन करतात. येथे सतराव्या-अठराव्या श्लोकातही याच शैलीचा प्रयोग केला गेला आहे.

जे साधन जेथून प्रारंभ होते शेवटी तेथेच त्याची समाप्ती होत असते. गीतेत कर्मयोगाचे प्रकरण जरी दुसऱ्या अध्यायाच्या एकोणचाळीसाव्या श्लोकापासून प्रारंभ झाले आहे तरीपण कर्मयोगाच्या मूळ साधनाचे विवेचन दुसऱ्या अध्यायाच्या सत्तेचाळीसाव्या श्लोकात केले गेले आहे. त्या श्लोकाच्या (२।४७) चार चरणांत सांगितले गेले आहे

(१) **कर्मण्येवाधिकारस्ते** (तुझा कर्म करण्यातच अधिकार आहे).

(२) **मा फलेषु कदाचन** (कर्मफलात तुझा केव्हाही अधिकार नाही)

(३) **मा कर्मफलहेतुर्भूः** (तू कर्मफलाला हेतूही होऊ नको).

(४) **मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि** (तुझी कर्म न करण्याविषयी आसक्ती होऊ नये).

प्रस्तुत श्लोका (३।१८) मध्ये त्याच उपर्युक्त साधनाच्या सिद्धीची गोष्ट आहे. त्याठिकाणी (२।४७ मध्ये) दुसऱ्या आणि तिसऱ्या चरणात साधकासाठी जी गोष्ट सांगितली आहे

ती प्रस्तुत श्लोकाच्या उत्तरार्धात सिद्ध महापुरुषासाठी सांगितली आहे की, त्याचे कर्म करणे अथवा कर्म न करणे—दोन्हीशीही कोणते प्रयोजन राहत नाही. अशा प्रकारे सतराव्या अठराव्या श्लोकामध्ये "कर्मयोगा" ने सिद्ध झालेल्या महापुरुषाच्या लक्षणाचेच वर्णन केले गेले आहे.

कर्मयोगाच्या साधनेच्या दृष्टीने वास्तविक अठरावा श्लोक प्रथम आणि सतरावा श्लोक नंतर यावयास पाहिजे होता. कारण जेव्हा कर्मयोगाने सिद्ध झालेल्या महापुरुषाचे करण्याशी अथवा न करण्याशी कोणतेच प्रयोजन राहत नाही तसेच त्याचा कोणत्याही प्राणी पदार्थाशी थोडाही स्वार्थाचा संबंध राहत नाही. तेव्हा त्याची रती, तृप्ती आणि तुष्टी आपली-आपणातच होते. परंतु सोळाव्या श्लोकात भगवंतांनी "**मोघं पार्थ स जीवति**" पदांनी कर्तव्य पालन न करणाऱ्या मनुष्याच्या जगण्याला निरर्थक म्हटले होते. म्हणून सतराव्या श्लोकात "**यः तु**" पद देऊन हे सांगतात की, जरी सिद्ध महापुरुषाने कर्तव्यकर्म केले नाही, तरी त्याचे जीवन निरर्थक होत नाही तर महान् सार्थक होते कारण त्याने मनुष्य-जन्माच्या उद्देशाची पूर्ती केली आहे. म्हणून, त्याला आता काहीही करावयाचे शिल्लक राहिले नाही.

ज्या स्थितीत कोणतेही कर्तव्य शिल्लक राहत नाही त्या स्थितीला सामान्यातील सामान्य माणूससुद्धा प्रत्येक अवस्थेत तत्परता आणि दृढपूर्वक निष्कामभावनेने कर्तव्यकर्म करून प्राप्त करू शकतो. कारण त्याच्या प्राप्तीत सर्व स्वतंत्र आणि अधिकारी आहेत. कर्तव्याचा संबंध प्रत्येक परिस्थितीशी जडलेला आहे. म्हणून प्रत्येक परिस्थितीमध्ये कर्तव्य करणे आवश्यक असते. केवळ सुख लोलुपतेनेच मनुष्य कर्तव्याला विसरतो. जर तो निःस्वार्थभावाने दुसऱ्याची सेवा करून आपली सुखलोलुपता नाहीशी करील तर जीवनाच्या सर्व दुःखातून मुक्त होऊन परम शांतीला प्राप्त होऊ शकतो. या परमशांतीच्या प्राप्तीत सर्वांचा समान अधिकार आहे. संसाराचे संपूर्ण पदार्थ, पद इत्यादी सर्वांना समान रूपाने मिळणे शक्य नाही. परंतु परमशांती सर्वांना समानरूपानेच मिळते.

**परिशिष्ट भाव**—संसारात 'करणे' आणि 'न करणे' दोन्ही सापेक्ष आहेत. 'म्हणून मला काहीही करावयाचे नाही'—हेही 'करणे' च आहे. परंतु परमात्मतत्त्वात 'न करणे' निरपेक्ष आहे, स्वाभाविक आहे. कारण चिन्मय सत्तेचा क्रिया करण्याशीही संबंध नाही आणि क्रिया न करण्याशीही संबंध नाही. म्हणून परमात्मतत्त्वाला प्राप्त झालेल्या कर्मयोगी महापुरुषाचा कोणत्याही वस्तूशी कोणताही संबंध राहत नाही, कोणत्याही व्यक्तीशी कोणताही संबंध राहत नाही आणि कोणत्याही क्रियेशी कोणताही संबंध राहत नाही—'**योऽवतिष्ठति नेङ्गते**' (गीता १४। २३). त्याच्या दृष्टीत एका चिन्मय सत्तेशिवाय काहीही राहत नाही.

***संबंध**—मागील दोन श्लोकांत वर्णन केलेल्या महापुरुषाची स्थिती प्राप्त करण्यासाठी साधकांनी काय केले पाहिजे—यासाठी भगवान् पुढील श्लोकात साधन सांगतात.*

## तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर।
## असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः॥ १९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = म्हणून (तू) | **कर्म** | = कर्माचे | **कर्म** | = कर्म |
| **सततम्** | = निरंतर | **समाचर** | = व्यवस्थित आचरण कर, | **आचरन्** | = करीत |
| **असक्तः** | = आसक्तिरहित (होऊन) | **हि** | = कारण | **पूरुषः** | = मनुष्य |
| **कार्यम्** | = कर्तव्य- | **असक्तः** | = आसक्तिरहित (होऊन) | **परम्** | = परमात्म्याला |
| | | | | **आप्नोति** | = प्राप्त होतो. |

*व्याख्या*— **तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर**—पूर्व श्लोकाशी या श्लोकाचा संबंध दाखविण्यासाठी येथे "**तस्मात्**" पद आले आहे. पूर्व श्लोकात भगवंतांनी म्हटले की, आपल्यासाठी कर्म करण्याची कोणतीच आवश्यकता नसूनही सिद्ध महापुरुषाद्वारा लोकसंग्रहासाठी क्रिया होतात. म्हणून अर्जुनालाही त्याचप्रमाणे (निष्कामभावनेने) कर्तव्यकर्म करून परमात्म्याला प्राप्त करण्याची आज्ञा देण्यासाठी भगवंतांनी "**तस्मात्**" पदाचा उपयोग केला आहे. कारण आपले स्वरूप—"**स्व**" ह्यासाठी कर्म करणे आणि न करणे कोणतेच प्रयोजन नाही. कर्म नेहमी "**पर**"(दुसऱ्या) साठी होत असते, "**स्व**" साठी होत नाही. म्हणून दुसऱ्यासाठी कर्म करण्याने कर्म करण्याची आसक्ती नष्ट होते आणि स्वरूपात स्थिती होते.

आपल्या स्वरूपाहून विजातीय (जड) पदार्थाविषयी असलेल्या आकर्षणाला "आसक्ती" म्हणतात. आसक्तिरहित होण्यासाठी आसक्तीच्या कारणाला जाणणे आवश्यक आहे.

''मी शरीर आहे'' आणि ''शरीर माझे आहे'' असे मानल्याने शरीरादी नाशवान् पदार्थाचे महत्त्व अंत:करणात अंकित होते. याच कारणाने त्या पदार्थांविषयी आसक्ती निर्माण होते.

आसक्तीच पतन करणारी आहे, कर्म नव्हे. आसक्ती-मुळेच मनुष्यशरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी जड पदार्थांशी आपला संबंध मानून आपल्या आराम, सुखभोगासाठी अनेक प्रकारचे कर्म करतो. अशा प्रकारे जडतेशी आसक्तिपूर्वक मानलेला संबंधच मनुष्याच्या वारंवार जन्म मरणाला कारण होतो ''**कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु**'' (१३।२१) आसक्तिरहित होऊन कर्म करण्याने जडतेशी संबंध-विच्छेद होतो.

आसक्ती असणारा मनुष्य दुसऱ्याचे हित करू शकत नाही. परंतु आसक्तिरहित मनुष्याकडून स्वत: स्वाभाविक प्राणीमात्राचे हित होत असते. त्याची सर्व कर्म केवळ दुसऱ्यांच्या हितार्थच होतात. संसारापासून प्राप्त झालेल्या सामुग्रीने (शरीरादी) आम्ही आत्तापर्यंत आपल्यासाठीच कर्म केली आहेत. त्याला आपल्याच सुखभोगासाठी आणि संग्रहासाठी वापरले आहे. म्हणून संसाराचे आमच्यावर ऋण झाले आहे. ते फेडण्यासाठी केवळ संसाराच्या हितासाठी कर्म करणे आवश्यक आहे. आपल्यासाठी (फलाची कामना ठेवून) कर्म केल्याने जुने ऋण तर फिटत नाही नवीन ऋण मात्र आणखी वाढते. ऋणातून मुक्त होण्यासाठी वारंवार संसारात यावे लागते. केवळ दुसऱ्याच्या हितासाठी सर्व कर्म करण्याने जुने ऋण समाप्त होते आणि आपल्यासाठी काहीही न करण्याने तसेच कशाचीही इच्छा न ठेवल्याने नवीन ऋणाचा बोजा होणार नाही. अशाप्रकारे जेव्हा जुने ऋण फिटते आणि नवीन ऋण होणार नाही तेव्हा बंधनाचे कोणतेच कारण न राहिल्याने मनुष्य सहज मुक्त होतो.

कोणतेही कर्म निरंतर राहत नाही परंतु आसक्ती (अंत:करणात) निरंतर राहते. म्हणून भगवान् ''**सततम् असक्त:**'' पदाने निरंतर आसक्तिरहित होण्याविषयी म्हणतात. ''मला कुठेही आसक्त व्हावयाचे नाही'' अशी जागृती साध-कांनी निरंतर ठेवली पाहिजे. निरंतर आसक्तिरहित राहून जे विहित कर्म समोर येईल त्याला केवळ कर्तव्य समजून करावे—असा उपर्युक्त पदाचा भाव आहे.

खरे पाहिले तर कोणाच्याही अंत:करणात आसक्ती निरंतर राहत नाही. जर संसार निरंतर राहत नाही, क्षणा-क्षणाला बदलत राहतो, तर त्याची आसक्ती निरंतर कशी राहू शकते? असे असूनही मानलेल्या ''**अहम्**'' बरोबर आसक्ती निरंतर राहत असलेली प्रतीत होते.

**कार्यम्**—अर्थात् कर्तव्य त्याला म्हणतात जे करू शकतो आणि जे अवश्य केले पाहिजे. दुसऱ्या शब्दात कर्तव्याचा अर्थ, असा आहे की, आपल्या स्वार्थाचा त्याग करून दुसऱ्याचे हित करणे अर्थात् दुसऱ्यांची शास्त्रविहित न्याययुक्त मागणी पूर्ण करणे, जी पूर्ण करण्याचे सामर्थ्य आमच्या ठिकाणी आहे. अशा प्रकारे कर्तव्याचा संबंध परहिताशी आहे.

कर्तव्याचे पालन करण्यात सर्व स्वतंत्र आणि समर्थ आहेत, कोणीही पराधीन आणि असमर्थ नाही. केवळ प्रमाद आणि आळसामुळे अकर्तव्य करण्याची वाईट सवय झाल्याने तसेच फलाची इच्छा राहण्यानेच, वर्तमान काळी कर्तव्य-पालन करणे, कठीण वाटते. नाहीतर कर्तव्य-पालनासारखे काहीच सोपे नाही. कर्तव्याचा संबंध परिस्थितीनुसार असतो. मनुष्य प्रत्येक परिस्थितीत स्वतंत्रेने कर्तव्याचे पालन करू शकतो. कर्तव्याचे पालन करण्यानेच आसक्ती नष्ट होते. अकर्तव्य करणे तसेच कर्तव्य न करण्याने आसक्ती आणखी वाढते. कर्तव्य अर्थात् दुसऱ्यांच्या हितार्थ कर्म करण्याने वर्तमान काळातील आसक्ती आणि कशाचीही इच्छा न ठेवल्याने भविष्य काळातील आसक्ती नष्ट होते.

**समाचर**—पदाचे तात्पर्य कर्तव्यकर्म अत्यंत सावधगिरीने, उत्साहपूर्वक, तत्परतेने विधीपूर्वक केले पाहिजे. कर्तव्यकर्म करण्यात थोडीही असावधानी झाल्यास कर्मयोगाच्या सिद्धीत बाधा येऊ शकते.

वर्ण, आश्रम, प्रकृती (स्वभाव) आणि परिस्थितीनुसार ज्या मनुष्यासाठी जे शास्त्रविहित कर्तव्यकर्म सांगितले गेले आहे योग्य वेळ आल्यावर तेच त्याचे ''सहज कर्म'' होते. सहज कर्मात जर एखादा दोष दिसून आला, तरीही त्या कर्माचा त्याग करू नये. (१८।४८) कारण सहज कर्म केले असता मनुष्य पापाला प्राप्त होत नाही (१८।४७). म्हणूनच या ठिकाणी भगवान् अर्जुनाला जणु हे म्हणत आहेत की, तू क्षत्रिय आहेस म्हणून युद्ध करणे (घोर दिसत असतानाही) तुझे सहज कर्म आहे, घोर कर्म नाही. म्हणून प्राप्त झालेल्या सहज कर्माला अनासक्त होऊन करावे. अनासक्तीनेच समता प्राप्त होते.

## विशेष गोष्ट

जेव्हा जीव मनुष्ययोनीत जन्म घेतो तेव्हा त्याला शरीर, धन, जमीन घर इत्यादी सर्व सामुग्री मिळते आणि जेव्हा तो येथून जातो तेव्हा सर्व सामुग्री येथेच राहते. या साध्या गोष्टी-वरुन हे सहजच सिद्ध होते की, शरीरादी सर्व सामुग्री मिळालेली आहे आपली नव्हे. ज्याप्रमाणे एखादा मनुष्य काम

करण्यासाठी एखाद्या कार्यालयात (ऑफिस) मध्ये जातो तर त्याला खुर्ची, टेबल कागद इत्यादी सर्व सामुग्री कार्यालयाचे काम करण्यासाठीच मिळते, आपली समजून घरी घेऊन जाण्यासाठी नव्हे, त्याप्रमाणे मनुष्याला संसारात शरीरादी सर्व सामुग्री संसाराचे (सेवा) काम करण्यासाठीच मिळाली आहे आपली समजण्यासाठी नव्हे. मनुष्य तत्परतेने आणि उत्साहाने कार्यालयाचे काम करतो व त्या कामाच्या मोबदल्यात त्याला वेतन मिळते. काम कार्यालयासाठी असते आणि वेतन त्याच्यासाठी असते. त्याचप्रमाणे संसारासाठीच सर्व काम करण्याने संसाराशी संबंध-विच्छेद होतो आणि योगा (परमात्म्याशी आपला नित्य संबंध) चा अनुभव आपल्याला होतो. ''कर्म'' आणि ''योग'' दोन्ही मिळून कर्मयोग म्हटला जातो. कर्म संसारासाठी होते आणि योग आपल्यासाठी होतो. हा योगच जणू वेतन आहे.

संसार साधनेचे क्षेत्र आहे. येथे प्रत्येक सामुग्री साधने-साठीच मिळते. भोग आणि संग्रहासाठी केव्हाही नाही. सांसारिक सामुग्री आपली आणि आपल्यासाठी नाहीच. आपली वस्तू—परमात्मतत्त्व प्राप्त झाल्यावर मग अन्य कोणती वस्तू मिळण्याची इच्छा राहत नाही (६।२२). परंतु सांसारिक वस्तू कितीही मिळाल्या तरी त्यांच्या प्राप्तीची इच्छा कधीही नष्ट होत नाही उलट वाढतच जाते.

जेव्हा मनुष्य मिळालेल्या वस्तूला आपली आणि आपल्यासाठी मानतो तेव्हा तो त्या चुकीमुळे बंधनात सापडतो. ही चूक दुरुस्त करण्यासाठी कर्मयोगाचे अनुष्ठानच सुगम आणि श्रेष्ठ उपाय आहे. कर्मयोगी कोणत्याही वस्तूला आपली आणि आपल्यासाठी न मानता त्या वस्तूला दुसऱ्याच्या सेवेमध्ये (त्यांचीच समजून) लावतो. म्हणून तो सुगमतेने संसारबंधनातून मुक्त होतो.

कर्म तर सर्वच प्राणी करतात पण साधारण प्राणी आणि कर्मयोगी यांच्याकडून केल्या गेलेल्या कर्मामध्ये फार मोठा फरक असतो. साधारण मनुष्य (कर्मी) आसक्ती, ममता, कामना इत्यादीला जवळ ठेवूनच कर्म करतो आणि कर्मयोगी आसक्ती, ममता, कामना इत्यादीचा त्याग करून कर्म करतो. कर्मीच्या कर्माचा प्रवाह स्वत: कडे असतो आणि कर्मयोग्याच्या कर्माचा प्रवाह संसाराकडे असतो. म्हणून कर्मी बांधला जातो आणि कर्मयोगी मुक्त होतो.

**असक्तो ह्याचरन्कर्म**—मनुष्यच आसक्तिपूर्वक संसाराशी आपला संबंध जोडतो, संसार संबंध जोडत नाही. म्हणून संसाराच्या हितासाठीच सर्व कर्म करावेत आणि मोबदल्यात कोणत्याही फलाची इच्छा ठेऊ नये. हेच मनुष्याचे कर्तव्य आहे. अशाप्रकारे आसक्तिरहित होऊन अर्थात् मला कुणाकडूनही काहीही नको, या भावनेने संसारासाठी कर्म केल्याने संसाराशी आपोआप संबंध-विच्छेद होतो.

कर्मयोगी संसाराची सेवा करीत असल्याने वर्तमानातील वस्तूशी आणि कसल्याच प्रकारची इच्छा नसल्याने भविष्य काळातील वस्तूशी संबंध-विच्छेद करतो.

यात्रेमध्ये स्वयंसेवक आपले कर्तव्य समजून दिवसभर यात्रेकरूंची सेवा करतात आणि मोबदल्यात कुणाकडूनही कशाचीही इच्छा ठेवीत नाहीत. म्हणून रात्री झोपताना त्यांना कुणाचीही आठवण येत नाही. कारण सेवा करीत असताना त्यांनी कुणाकडूनही काही इच्छिले नाही. त्याचप्रमाणे जो सेवाभावाने दुसऱ्यासाठीच सर्व कर्म करतो आणि कुणाकडून मान-सन्मान इत्यादीची इच्छा ठेवीत नाही त्याला संसाराची आठवण येत नाही. तो सुगमतेने संसार-बंधनातून मुक्त होतो.

कर्म तर सर्वच जण करतात पण जेव्हा आसक्तिरहित होऊन दुसऱ्यासाठी कर्म केले जातात तेव्हाच कर्मयोग होतो. आसक्ती शास्त्रविहित कर्तव्यकर्म करण्यानेच नष्ट होऊ शकते. **''धर्म ते बिरति''** (मानस ३।१६।१) शास्त्रनिषिद्ध कर्म करण्याने आसक्ती केव्हाही नष्ट होऊ शकत नाही.

**परमाप्नोति पूरुषः**—ज्याप्रमाणे तेराव्या अध्यायाच्या चौतीसाव्या श्लोकात भगवंतांनी **''परम्''** पदाने सांख्ययोग्याला परमात्म्याची प्राप्ती होण्याविषयी म्हटले. त्याचप्रमाणे येथे **''परम्''** पदाने कर्मयोग्याला परमात्मप्राप्ती होण्याविषयी म्हटले आहे. तात्पर्य साधक (रुची, योग्यता, विश्वासानुसार) कोणत्याही मार्गाचा (कर्मयोग-ज्ञानयोग-भक्तियोग) अवलंब करो त्याच्या द्वारा प्राप्तव्य वस्तू एक परमात्माच आहे. (५।४-५) ज्या तत्त्वाच्या प्राप्तीमध्ये विकल्प, संदेह, निराशा नाही तसेच जे नित्य असते, सर्व देशात असते, सर्व काळात असते, सर्वांसाठी असते, सर्वांचे आपले असते आणि ज्या तत्त्वापासून कधी, कोणीही कोणत्याही अवस्थेत थोडेही वेगळे होऊ शकत नाही अर्थात् जे सर्वांना नित्य अभिन्नरूपाने स्वत: प्राप्त असते तेच तत्त्व प्राप्तव्य होऊ शकते.

**शंका**—कर्म करीत असताना कर्मयोग्याचा कर्तृत्वा-भिमान कसा नष्ट होतो ? कारण कर्तृत्वाभिमान नष्ट झाल्याशिवाय परमात्मतत्त्वाचा अनुभव होऊ शकत नाही.

**समाधान**—साधारण मनुष्य सर्व कर्म आपल्या-साठीच करतो. आपल्यासाठी कर्म करण्याने मनुष्यामध्ये कर्तृत्वाभिमान राहतो. कर्मयोगी कोणतीही क्रिया आपल्या-साठी करीत नाही. तो असे समजतो की, संसारापासून शरीर, इंद्रिय मन, बुद्धी, पदार्थ, धन इत्यादी जी काही

सामुग्री मिळाली आहे, ती सर्व संसाराचीच आहे, आपली नव्हे. जेव्हा केव्हा अवसर प्राप्त होतो तेव्हा तो सामुग्री, समय, सामर्थ्य इत्यादींना संसाराच्या सेवेमध्ये लावतो. त्यांना संसाराच्या सेवेत लावीत असताना कर्मयोगी असे समजतो की, मी संसाराचीच वस्तू संसाराच्या सेवेत लावीत आहे. अर्थात् सामुग्री, समय, सामर्थ्य इत्यादी ज्यांची सेवा होत आहे त्यांचीच आहे. असे समजल्याने कर्तृत्वाभिमान राहत नाही.

कर्तृत्वाला भोक्तृत्व कारण आहे. कर्मयोगी भोगाची आशा ठेवून कर्म करीतच नाही. भोगाची आशा करणारा मनुष्य कर्मयोगी नसतो. जसे आपल्या हाताने आपलेच तोंड धुतले तर असे वाटत नाही की, मी फार उपकार केला आहे. कारण मनुष्य हात आणि तोंड दोघांना अपलेच अंग मानतो. तसेच कर्मयोगीही शरीराला संसाराचेच एक अंग मानतो. म्हणून जर अंगाने अंगीचीच सेवा केली आहे तर त्यामध्ये कर्तृत्वाभिमान कसा निर्माण होईल?

असा नियम आहे की, मनुष्य ज्या उद्देशाला अनुसरून कर्मामध्ये प्रवृत्त होतो, कर्म समाप्त होताच तो त्याच उद्देशात तल्लीन होतो. जसे व्यापारी धनाच्या उद्देशाने व्यापार करतो. दुकान बंद करताच त्याचे लक्ष सहज रुपयाकडेच जाते आणि तो रुपये मोजू लागतो. त्याचे ध्यान, आज कोण कोण ग्राहक आले होते, कोण्या कोण्या जातीचे आले होते इत्यादी-कडे जात नाही. कारण ग्राहकाशी त्याचे काहीही प्रयोजन नसते. संसाराचा उद्देश ठेवून कर्म करणारा मनुष्य, संसारात कितीही तल्लीन झाला तरी, त्याची संसाराशी एकता होऊ शकत नाही. कारण वास्तविक पाहता संसाराशी मुळीच एकता नाही. संसार प्रतिक्षण परिवर्तनशील आणि जड आहे परंतु "स्व" (आपले स्वरूप) अचल आणि चेतन आहे. परंतु परमात्म्याचा उद्देश ठेवून कर्म करणाऱ्याची परमात्म्याशी एकता होऊनच जाते (मग साधकाला याचा अनुभव येवो अथवा न येवो). कारण "स्व" ची परमात्म्याशी स्वत:सिद्ध (तात्त्विक) एकता आहे. अशा प्रकारे जेव्हा कर्ता "कर्तव्य" रूप होऊन आपल्या उद्देश्याशी (परमात्मतत्त्व) एक होतो तेव्हा कर्तृत्वाभिमानाचा प्रश्नच उद्भवत नाही.

कर्मयोगी ज्या उद्देश्यासाठी—परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीसाठी सर्व कर्म करतो त्या परमात्मतत्त्वात कर्तृत्वाभिमान अथवा कर्तृत्व (कर्तेपणा) नाही. म्हणून प्रत्येक क्रियेच्या आंरभी आणि शेवटी त्या उद्देश्याशी एकतेचा अनुभव आल्याकारणाने कर्मयोग्याचे ठिकाणी कर्तृत्वाभिमान राहत नाही.

प्राणीमात्राकडून केल्या जाणाऱ्या प्रत्येक कर्माचा आरंभ आणि अंत होत असतो. कोणतेही कर्म निरंतर राहत नाही. म्हणून कोणाचेही कर्तृत्व निरंतर राहत नाही तर कर्माचा अंत होताच कर्तृत्वाचाही अंत होतो. परंतु मनुष्याकडून चूक ही होते की, जेव्हा तो कोणतीही क्रिया करतो, तेव्हा तर तो आपल्याला त्या क्रियेचा कर्ता मानतच असतो पण जेव्हा ती क्रिया करीत नाही, तेव्हाही तो आपल्याला तसाच कर्ता मानीत राहतो. अशा प्रकारे आपल्याला निरंतर कर्ता मानत राहिल्याने त्याचा कर्तृत्वाभिमान नाहीसा होत नाही तर दृढ होतो. जसे एखादा पुरुष व्याख्यान देताना तर वक्ता (व्याख्यानदाता) असतोच. परंतु जेव्हा दुसऱ्या समयातही तो आपल्याला वक्ता मानत राहतो तेव्हा त्याचा कर्तृत्वाभिमान नष्ट होत नाही. आपल्याला निरंतर व्याख्यानदाता मानल्यानेच त्याच्या मनात हा भाव येतो की, श्रोत्याने माझी सेवा करावी, माझा आदर करावा, माझ्या आवश्यकतेची पूर्ती करावी आणि मी या साधारण मनुष्यांजवळ कसे बसू शकतो? मी हे साधरण काम कसे करू? इत्यादी. अशा प्रकारे त्याचा व्याख्यानरूप कर्माशी निरंतर संबंध कायम राहतो. याचे कारण व्याख्यानरूपी कर्मापासून धन, मान, सन्मान, आराम इत्यादी काही ना काही मिळविण्याचा भाव असणे हे होय. जर आपल्यासाठी काहीही मिळविण्याचा भाव राहीला नाही तर कर्तापण केवळ कर्म करण्यापर्यंतच सीमित राहते आणि कर्म समाप्त होताच कर्तापण आपल्या उद्देश्यामध्ये विलीन होते.

जसे मनुष्य भोजन करतेवेळीच आपल्याला त्याचा भोक्ता अर्थात् भोजन करणारा समजतो, भोजन झाल्यानतंर नव्हे. तसेच कर्मयोगी कोणती एखादी क्रिया करतानाच आपल्याला त्या क्रियेचा कर्ता समजतो इतर वेळी नव्हे. जसे कर्मयोगी व्याख्यानदाता आहे आणि लोकात त्याची फार मोठी प्रतिष्ठा आहे. परंतु एखादेवेळी व्याख्यान ऐकण्याचा प्रसंग आला तर तो कुठेही बसून सुगमतापूर्वक व्याख्यान ऐकू शकतो. त्यावेळी त्याला आदराची अगर उच्च आसनाची आवश्यकता नसते. कारण त्यावेळी तो आपल्याला श्रोता समजतो व्याख्यानदाता नव्हे. एखादेवेळी व्याख्यान दिल्यानंतर खोली साफ करण्याचा प्रसंग पडला तर, तो त्या कामाला तितक्याच तत्परतेने करतो जितक्या तत्परतेने व्याख्यान देण्याचे कार्य करतो. त्याच्या मनात असा थोडाही भाव येत नाही की, मी एवढा मोठा व्याख्यान-दाता असून मी हे खोली साफ करण्याचे तुच्छ काम कसे करू? लोक काय म्हणतील, माझी प्रतिष्ठा धुळीला मिळेल

इत्यादी. तो आपल्याला व्याख्यान देतेवेळी व्याख्यानदाता, कथा-श्रवणाचे वेळी श्रोता आणि खोली साफ करताना, खोली साफ करणारा समजतो. म्हणून त्याचा कर्तृत्वाभिमान निरंतर राहत नाही. जी वस्तू निरंतर राहत नाही, तर बदलत राहते ती वास्तविक नसते आणि तिचा सबंधही निरंतर राहत नाही— हा सिद्धांत आहे. या सिद्धांताकडे दृष्टी जाताच साधकाला वास्तविकतेचा (कर्तृत्वाभिमानाहून रहित असलेल्या स्वरूपाचा) अनुभव होतो.

ज्या भावनेने नाटकामध्ये एक नट काम करतो त्याच भावनेने कर्मयोगी सर्व क्रिया करतो. जसे नाटकामध्ये हरिश्चंद्राची भूमिका नाटकापुरतीच असते, नाटक समाप्त होताच हरिश्चंद्राची भूमिका समाप्त होते. तसेच कर्मयोग्याचे कर्तेपणसुद्धा नाटकाप्रमाणेच केवळ क्रिया करण्यापुरते सीमित असते. जसे नाटकात हरिश्चंद्राची भूमिका वठविणारी व्यक्ती हरिश्चंद्रांच्या सर्व क्रिया वठवीत असूनही ती आपल्याला वास्तविक त्या क्रियांचा कर्ता (वास्तविक हरिश्चंद्र) समजत नाही. तसेच कर्मयोगी शास्त्रविहित संपूर्ण कर्मांना करीत असूनही, वास्तविक त्या क्रियांचा कर्ता आपल्याला समजत नाही. कर्मयोगी शरीरादी सर्व पदार्थांना नाटकाप्रमाणे आपले आणि आपल्यासाठी न समजता, त्यांना संसाराचेच समजून संसाराच्याच सेवेत लावतो. म्हणून कोणत्याही अवस्थेत कर्मयोग्याचे ठिकाणी थोडाही कर्तृत्वाभिमान राहू शकत नाही.

कर्मयोगी जसे कर्तृत्वाला आपल्यात निरंतर मानत नाही तसेच माता-पिता, स्त्री-पुत्र भाऊ-भावजय इत्यादीशी आपला संबंधही निरंतर मानत नाही. केवळ सेवा करते-वेळीच त्यांच्याशी आपला संबंध (सेवा करण्यासाठीच) मानतो. जसे जर एखादा पती आहे तर पत्नीसाठी पती आहे अर्थात् पत्नी कर्कशा असेल, कुरूप असेल, कलह करणारी असेल, परंतु तिला पत्नीरूपाने स्वीकार केल्यावर आपल्या योग्यता आणि सामर्थ्यानुसार तिचे भरण-पोषण करणे पतीचे कर्तव्य आहे. पतीच्या नात्याने तिच्या सुधारणेविषयी तिला सांगून पहावे मग ती ऐको अथवा न ऐको. प्रत्येक वेळी आपल्याला पती समजू नये. कारण या जन्मापूर्वी ती पत्नी होती का? हे कुणाला ठाऊक ?आणि मृत्यूनंतरही ती पत्नी राहील हे तरी काय सांगता येते? तसेच वर्तमानातही ती कोणाची आई असते, कोणाची मुलगी असते, कोणाची बहीण असते, कोणाची वहिनी असते, कोणाची नणन्द असते इत्यादी. ती नित्य पत्नी तर नसतेच. असे मानल्याने तिच्याकडून सुख मिळविण्याची इच्छा सहज संपुष्टात येते आणि "केवळ भरण-पोषण (सेवा) करण्यासाठीच पत्नी आहे" ही मान्यता दृढ होते. या प्रकारे कर्मयोग्याला संसारामध्ये पिता, पुत्र, पती, भाऊ इत्यादींच्या रूपात जी भूमिका मिळाली आहे ती तो योग्य रीतीने वठवतो. दुसरा आपल्या कर्तव्याचे पालन करतो अथवा नाही त्याकडे तो लक्ष देत नाही. आपल्यात कर्तृत्वाभिमान असल्यानेच दुसऱ्याच्या कर्तव्यावर दृष्टी जाते आणि दुसऱ्याच्या कर्तव्यावर दृष्टी जाताच मनुष्य आपल्या कर्तव्यापासून च्युत होतो. कारण दुसऱ्याचे कर्तव्य पाहणे आपले कर्तव्य नाही.

ज्याप्रमाणे कर्मयोगी संसारातील प्राण्यांशी आपला संबंध नित्य मानीत नाही त्याचप्रमाणे वर्ण, आश्रम, जाती, संप्रदाय, घटना, परिस्थिती इत्यादींशीही आपला संबंध निरंतर मानीत नाही. जी वस्तू निरंतर नसते तिचा अभाव स्वाभाविक असतो. म्हणून कर्मयोग्याचा कर्तृत्वाभिमान आपोआप नाहीसा होतो.

### मार्मिक गोष्ट

ज्याच्याठिकाणी कर्तृत्व नाही त्या परमात्म्याशी प्राणी-मात्राची स्वतः सिद्ध एकता आहे. साधकाची भूल ही होते की, तो या वास्तविकतेकडे लक्षच देत नाही.

ज्याप्रमाणे झोका कितीही वेगाने मागे पुढे गेला तरी तो प्रत्येक वेळी समतेत (समस्थितीत) येतोच. अर्थात् जेथे झोक्याची दोरी बांधली आहे त्याच्या सरळ रेषेत (मागे पुढे जात असताना) एक वेळ येतोच. त्याचप्रमाणे प्रत्येक क्रियेच्या शेवटी अक्रिय (समता) अवस्था येतेच. दुसऱ्या शब्दात पहिल्या क्रियेचा अंत आणि दुसऱ्या क्रियेच्या आरंभाच्या मध्यभागी आणि प्रत्येक संकल्प तसेच विकल्प याच्या मध्यभागी समता राहतेच.

दुसरी गोष्ट, जर वास्तविक दृष्टीने पाहिले तर झोका चालू असताना (विषम दिसत असून) ही निरंतर समतेतच राहतो अर्थात् झोका मागे पुढे जातेवेळीही निरंतर (जेथे झोक्याची दोरी बांधलेली आहे त्याच्या) सरळ रेषेतच राहतो. त्याचप्रमाणे जीवही प्रत्येक क्रियेत समतेतच स्थित असतो. परमात्म्याशी त्याची एकता निरंतर असते. क्रिया करते वेळी समतेत स्थिती दिसत नसतानासुद्धा वास्तविक समता असतेच, ज्याचा कोणी अनुभव घेऊ इच्छित असेल तर क्रिया समाप्त होताच (त्या समतेचा) अनुभव होतो. जर साधक या विषयात निरंतर सावधान राहील तर त्याला निरंतर राहणारी समता अथवा परमात्म्याशी आपल्या एकतेचा अनुभव होतो, जेथे कर्तृत्व नाही.

मानलेल्या कर्तृत्वाभिमानाला नाहीसे करण्यासाठी प्रतीती आणि प्राप्ती ह्याचा भेद समजून घेणे आवश्यक आहे.

जे दिसते पण मिळत नाही त्याला प्रतीती म्हणतात आणि जे मिळते पण दिसत नाही त्याला ''प्राप्त'' म्हणतात. पाहणे-ऐकणे इत्यादीमध्ये येणारा, क्षणाक्षणाला बदलणारा संसार ''प्रतीती'' आहे आणि सर्वत्र, नित्य, परिपूर्ण परमात्मतत्त्व ''प्राप्त'' आहे. परमात्मतत्त्व ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत सर्वांना समानरूपाने स्वाभाविक प्राप्त आहे.

इदंतेने दिसणाऱ्या प्रतीतीचा प्रतिक्षण अभाव होत आहे. दृश्यमात्र क्षणाक्षणाला अदृश्याकडे जात आहे. ज्यांच्याकडून प्रतीती होते ते इंद्रिय मन बुद्धी इत्यादीही प्रतीतीच आहेत. नित्य, अचल राहणाऱ्या ''स्व'' ला प्रतीतीची प्राप्ती होत नाही. नित्य, सर्वात राहणारे परमात्मतत्त्व ''स्व'' ला नित्य प्राप्त आहे. म्हणून ''प्रतीती'' अभावरूप आणि ''प्राप्त'' भावरूप असते ''**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः**''। (२।१६)

यावन्मात्र पदार्थ आणि क्रिया ''प्रतीती'' आहेत. सर्व क्रिया अक्रियतेमध्ये लीन होतात. प्रत्येक क्रियेच्या आरंभी आणि शेवटी सहज (स्वतः सिद्ध) अक्रिय तत्त्व विद्यमान राहते. जे आदि आणि अंती असते तेच मध्यातही असते—हा सिद्धांत आहे म्हणून क्रियेचे वेळीही अखंड आणि सहज अक्रिय तत्त्व जसेच्या तसे विद्यमान राहते. ते सहज अक्रिय तत्त्व (चेतनस्वरूप) अथवा (परमात्मतत्त्व) अक्रिय आणि सक्रिय दोन्ही अवस्थांना प्रकाशित करणारे आहे अर्थात् ते प्रवृत्ती आणि निवृत्ती (करणे आणि न करणे) दोन्हीहून वेगळे आहे

प्रतीती (देश, काल, वस्तू, व्यक्ती, क्रिया इत्यादी) ने मानलेल्या संबंधामुळे अर्थात् आसक्तीमुळेच नित्यप्राप्त परमात्मतत्त्वाचा अनुभव येत नाही. आसक्तीचा नाश होताच नित्यप्राप्त परमात्मतत्त्वाचा अनुभव येतो. म्हणून आसक्ति-रहित होऊन प्रतीती (आपले म्हणविले जाणारे शरीरादी पदार्थ) ला प्रतीती (केवळ संसार) च्या सेवेमध्ये लावल्याने प्रतीतीचा (शरीरादी पदार्थांचा) प्रवाह प्रतीती (संसार) कडेच होतो आणि स्वतः प्राप्त परमात्मतत्त्व शिल्लक राहते.

***संबंध*—*आसक्तिरहित होऊन कर्म करण्याने अर्थात् आपल्यासाठी कोणतेही कर्म न करण्याने परमात्मप्राप्ती कोणाला झाली का? याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.***

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः।**
**लोकसङ्ग्रहमेवापि सम्पश्यन्कर्तुमर्हसि॥ २०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **जनकादयः हि** | = राजा जनका-सारखे अनेक महापुरुषसुद्धा | **संसिद्धिम्** | = परमसिद्धीला | **कर्तुम्** | = (निष्कामभावाने कर्म) |
| | | **आस्थिताः** | = प्राप्त झाले होते. (म्हणून) | **एव** | करण्यालाच |
| **कर्मणा, एव** | = कर्माद्वाराच (कर्मयोगाद्वाराच) | **लोकसङ्ग्रहम्** | = लोकसंग्रहाचा | **अर्हसि** | = योग्य आहेस अर्थात् अवश्य करावे. |
| | | **सम्पश्यन्, अपि** | = विचार करूनही (तू) | | |

***व्याख्या*— कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः—** ''आदि'' पद ''प्रभृति'' (आरंभ) तसेच ''प्रकार'' *या* दोन्हीचा वाचक मानला जातो. जर या ठिकाणी आलेल्या ''आदि'' पदाला ''प्रभृति'' चा वाचक मानले तर ''**जनकादयः**'' पदाचा अर्थ, ज्यांचे आदि (आरंभ) राजा जनक आहेत अर्थात् राजा जनक तसेच त्यांचे नंतर होणारे महापुरुष असा होईल. परंतु येथे असा अर्थ घेणे ठीक वाटत नाही कारण राजा जनकाच्या पूर्वीही अनेक महापुरुष निष्काम कर्म करून परम सिद्धीला प्राप्त झाले होते. जसे सूर्य, वैवस्वत मनु, राजा इक्ष्वाकु इत्यादी (४।१-२) म्हणून येथे ''आदि'' पदाला ''प्रकार'' चा वाचक मानणेच योग्य वाटते. ज्यायोगे ''**जनकादयः**'' या पदाचा अर्थ असा होतो—राजा जनका-सारखे गृहस्थाश्रमात राहून निष्कामभावाने सर्व कर्म करून परमसिद्धीला प्राप्त झालेले महापुरुष, जे राजा जनकापूर्वी तसेच नंतर (आजपर्यंत) झाले आहेत.

कर्मयोग फार जुना योग आहे. ज्याद्वारा राजा जनका-सारखे अनेक महापुरुष परमात्म्याला प्राप्त झाले आहेत. म्हणून वर्तमान काळात तसेच भविष्यात जर कोणी कर्मयोग-द्वारा परमात्म्याची प्राप्ती करण्याची इच्छा केली तर त्याने त्याला मिळालेल्या प्राकृत पदार्थांना (शरीरादी) कधीही आपली आणि आपल्यासाठी मानू नये. कारण ते आपले आणि आपल्यासाठी वास्तविक दृष्ट्या नाहीतच तर संसाराचेच आणि संसारासाठीच आहेत. या वास्तविकतेला समजून घेऊन संसारापासून मिळालेल्या वस्तूंना संसाराच्याच सेवेमध्ये लावल्याने सुगमतेने संसाराशी संबध-विच्छेद होऊन परमात्म-प्राप्ती होते. म्हणून कर्मयोग परमात्मप्राप्तीचे सुगम, श्रेष्ठ आणि स्वतंत्र साधन आहे. यात काही संशय नाही.

येथे ''**कर्मणा एव**'' पदांचा संबंध पूर्वश्लोकाच्या

"**असक्तो ह्याचरन्कर्म**" पदाशी अर्थात् आसक्तिरहित होऊन कर्म करण्याशी आहे. कारण आसक्तिरहित होऊन कर्म करण्यानेच मनुष्य कर्मबंधनातून मुक्त होतो केवळ कर्म करण्याने नव्हे. केवळ कर्म करण्याने तर प्राणी बंधनात पडतो—"**कर्मणा बध्यते जन्तुः।**" (महा० शान्ति० २४१।७)

गीतेची ही शैली आहे की, भगवान् मागील श्लोकात वर्णन केलेल्या मुख्य विषयाला (जो साधकासाठी विशेष उपयोगी आहे) संक्षेपाने पुढील श्लोकात पुनः सांगतात. जसे मागील (एकोणीसाव्या) श्लोकात आसक्तिरहित होऊन कर्म करण्याची आज्ञा देऊन या वीसाव्या श्लोकात त्याच विषयाला संक्षेपाने "**कर्मणा एव**" पदांनी म्हणतात. त्याचप्रमाणे पुढे बाराव्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकात वर्णन केलेल्या विषयाच्या मुख्य तत्त्वाला सातव्या श्लोकात संक्षेपाने "**मय्यावेशितचेतसाम्**" (माझ्यात चित्त ठेवणारे भक्त) पदाने पुनः सांगतील.

येथे भगवान् "**कर्मणा एव**" ऐवजी "**योगेन एव**" ही म्हणू शकत होते. परंतु अर्जुनाचा आग्रह कर्मांचा स्वरूपाने त्याग करण्याचा असल्याने तसेच (आसक्तिरहित होऊन केल्या जाणाऱ्या) कर्माचाच प्रसंग चालू असल्याने "**कर्मणा एव**" चा प्रयोग केला गेला आहे. म्हणून या ठिकाणी या पदांचा अभिप्राय (पूर्व श्लोकानुसार) आसक्तिरहित होऊन केल्या गेलेल्या कर्मयोगाशीच आहे.

वास्तविक चिन्मय परमात्म्याची प्राप्ती जड कर्मांनी होत नाही. नित्यप्राप्त परमात्म्याचा अनुभव होण्यात ज्या बाधा आहेत त्या आसक्तिरहित होऊन कर्म करण्याने दूर होतात. मग सर्वत्र परिपूर्ण स्वतः सिद्ध परमात्म्याचा अनुभव होतो. अशा प्रकारे परमात्मतत्त्वाच्या अनुभवामध्ये येणाऱ्या बाधांना दूर केल्यामुळे येथे कर्माद्वारा परमसिद्धी (परमात्मतत्त्व) च्या प्राप्तीविषयी म्हटले गेले आहे.

## परमात्मप्राप्तीसंबंधी मार्मिक संकेत

मनुष्य सांसारिक पदार्थांच्या प्राप्तीप्रमाणे परमात्म्याच्या प्राप्तीलाही कर्मजन्य समजतात. असा विचार करतात की, जर एखाद्या मोठ्या (उच्च पदाधिकारी) व्यक्तीला भेटण्यासाठीही एवढे परिश्रम पडतात तर अनंत कोटी ब्रह्मांड-नायक परमात्म्याच्या भेटीसाठी तर फारच परिश्रम, (तप व्रत इत्यादी) करावे लागतील. वस्तुतः हीच साधकाची सर्वात मोठी चूक आहे.

मनुष्ययोनीचा कर्माशी घनिष्ठ संबंध आहे. म्हणून मनुष्ययोनीला "कर्मसङ्गी" अर्थात् "कर्माशी आसक्ती ठेवणारी" म्हटले आहे. "**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते।**" (१४।१५) म्हणूनच कर्मात मनुष्याची विशेष प्रवृत्ती असते आणि तो कर्माद्वाराच अभीष्ट वस्तूंची प्राप्ती करू इच्छितो. प्रारब्धाची अनुकूलता असल्यास तो कर्माद्वाराच अभीष्ट सांसारिक वस्तूंना प्राप्तही करून घेतो. ज्यामुळे त्याची ही धारणा पुष्ट होते की, प्रत्येक वस्तू कर्म करण्यानेच मिळते आणि मिळू शकते. परमात्माच्या विषयातही त्याचा हाच भाव राहतो आणि तो चेतन परमात्म्यालाही जड कर्माद्वारा प्राप्त करण्याविषयी प्रयत्न करतो. परंतु वास्तविकता ही आहे की, परमात्म्याची प्राप्ती कर्माद्वारा होत नाही. हा विषय फार गंभीरतेने समजून घेतला पाहिजे.

कर्मांनी नाशवान वस्तूंची (संसार) प्राप्ती होते, अविनाशी वस्तूची (परमात्म्याची) नव्हे. कारण संपूर्ण कर्म नाशवान (शरीर, इंद्रिये, मन बुद्धी इत्यादी) पदार्थांच्या संबंधानेच होतात. परंतु परमात्म्याची प्राप्ती नाशवान पदार्थांचा संपूर्ण संबंध-विच्छेद झाल्यावर होते.

प्रत्येक कर्माचा आरंभ आणि अंत होत असतो. म्हणून कर्माच्या फलरूपाने प्राप्त होणारी वस्तूही उत्पन्न आणि नष्ट होणारी असते. कर्माद्वारा त्याच वस्तूची प्राप्ती होते जी देश, काल इत्यादीच्या दृष्टीने दूर (अप्राप्त) आहे. सांसारिक वस्तू एका देशात, एका कालात इत्यादीत राहणारी, उत्पन्न आणि नष्ट होणारी तसेच क्षणाक्षणाला बदलणारी असते. म्हणून त्याची प्राप्ती कर्म-साध्य आहे. परंतु परमात्मा सर्व देश, काल, वस्तू व्यक्ती इत्यादीत परिपूर्ण (नित्यप्राप्त)* तसेच संपूर्णपणे उत्पत्ति-विनाश आणि परिवर्तनरहित आहेत. म्हणून त्यांची प्राप्ती स्वतःसिद्ध आहे, कर्म-साध्य नव्हे. हेच कारण आहे की, सांसारिक पदार्थांची प्राप्ती चिंतनाने होत नाही. परंतु परमात्म्याच्या प्राप्तीत चिंतन मुख्य आहे. चिंतनाने तीच वस्तू प्राप्त होऊ शकते जी वस्तू अतिशय जवळ असते. तसे पाहता परमात्माची प्राप्ती चिंतनरूप क्रियेनेही होत नाही. परमात्म्याचे चिंतन करण्याची सार्थकता दुसऱ्या (संसाराचे) चिंतनाचा त्याग करविण्यातच आहे. संसाराचे चिंतन पूर्णपणे सुटताच नित्यप्राप्त परमात्म्याचा अनुभव होतो.

सर्वव्यापी परमात्मा आपल्यापासून दूर नाहीच आणि असूच शकत नाही. जे आपण आपल्यापासून दूर समजत नाही त्या "मीपणा" पेक्षा ही परमात्मा अत्यंत जवळ आहे. "मीपणा" तर परिच्छिन्न (एकदेशीय) आहे. परंतु परमात्मा

* देस काल दिसि बिदिसिहु माही । कहहु सो कहाँ जहाँ प्रभु नाही। (मानस १।१८५।३)

परिच्छिन्न नाही. अशा अत्यंत समीपस्थ, नित्यप्राप्त, परमात्म्याचा अनुभव करण्यासाठी सांसारिक वस्तूंच्या प्राप्तीप्रमाणे तर्क आणि युक्ती लावणे म्हणजे स्वत:च स्वत:ला धोका देणेच आहे.

सांसारिक वस्तूंची प्राप्ती केवळ इच्छेने होत नाही. परंतु परमात्म्याची प्राप्ती केवळ उत्कट अभिलाषेने होते. ही उत्कट अभिलाषा जागृत होण्यात सांसारिक भोग, आणि संग्रहाची इच्छाच बाधक आहे. दूसरे काही बाधक नाहीच. जर परमात्म्याची उत्कट अभिलाषा आत्ता जागृत झाली तर आत्ताच परमात्म्याचा अनुभव होऊ शकतो.

मनुष्यजीवनाचा उद्देश कर्म करणे आणि त्याचे फल भोगणे नाही. परमात्म्याच्या प्राप्तीची उत्कट अभिलाषा तेव्हाच जागृत होऊ शकते जेव्हा सांसारिक भोग आणि संग्रहाची इच्छा राहत नाही आणि साधकाच्या जीवनाचा एकच उद्देश—परमात्मप्राप्ती करणे असेल. परमात्मप्राप्ती करण्याच्या व्यतिरिक्त कोणत्याही कार्याचे त्याला महत्त्व वाटू नये. वास्तविक परमात्म-प्राप्तीशिवाय मनुष्य जन्माचे अन्य काही प्रयोजनच नाही. आवश्यकता केवळ या प्रयोजन अथवा उद्देशाला ओळखून त्याची पूर्तता करण्याची आहे.

येथे उद्देश आणि फलेच्छा दोन्हीतील भेद समजून घेणे आवश्यक आहे. नित्य परमात्मतत्त्व प्राप्त करण्याचा "उद्देश" असतो आणि अनित्य (उत्पत्ति-विनाशशील) पदार्थांना प्राप्त करण्याची "फलेच्छा" असते. उद्देश तर पूर्ण होतो परंतु फलेच्छा मिटणारी असते. स्वरूपबोध आणि भगवत्प्राप्ती हे दोन्ही उद्देश आहेत, फल नव्हे. उद्देश प्राप्तीसाठी केले गेलेले कर्म सकाम म्हणविले जात नाही. म्हणून निष्काम पुरुषाची (कर्मयोग्याची) सर्व कर्म उद्देशासाठीच असतात, फलेच्छेसाठी नव्हे.

कर्मयोगात कर्माशी (जडतेशी) संबंध विच्छेदाचा उद्देश ठेवून शास्त्रविहित शुभ कर्म केली जातात. सकाम पुरुष फलाची इच्छा ठेवून आपल्यासाठी कर्म करतो आणि कर्मयोगी फलाच्या इच्छेचा त्याग करून दुसऱ्यासाठी कर्म (सेवा) करतो. कर्मच फलरूपाने परिणत होत असते. म्हणून फलाचा संबंध कर्माशी असतो. उद्देशाचा संबंध कर्माशी नसतो. निष्कामभावनेने केवळ, दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करण्याने "परमात्मा दूर आहे" ही धारणा दूर होते.

**लोकसङ्ग्रहमेवापि सम्पश्यन्कर्तुमर्हसि**—"लोक" शब्दाचे तीन अर्थ होतात. (१) मनुष्य लोक इत्यादी लोक (२) त्या लोकांत राहणारे प्राणी आणि (३) शास्त्र (वेदा व्यतिरिक्त सर्वशास्त्र). मनुष्य लोकाच्या, त्यात राहणाऱ्या प्राण्याच्या आणि शास्त्राच्या मर्यादेनुसार संपूर्ण आचरण (केवळ जीवनचर्या) होणे "**लोकसंग्रह**" आहे.

लोकसंग्रहाचे तात्पर्य—लोकमर्यादा सुरक्षित ठेवण्यासाठी, लोकांना असत्पासून विन्मुख करून सत्च्या सन्मुख करण्यासाठी नि:स्वार्थभावनेने कर्म करणे हे आहे. याला गीतेमध्ये "यज्ञार्थ कर्म" नावानेही म्हटले गेले आहे. आपल्या आचरणाने आणि वचनाने लोकांना असत्पासून विन्मुख करून सत्शी सन्मुख करणे ही फार मोठी सेवा आहे. कारण सत्च्या सन्मुख झाल्याने लोकांचा सुधार तसेच उद्धार होतो.

लोकांना दाखविण्यासाठी आपल्या कर्तव्याचे पालन करणे लोकसंग्रह नाही. कोणी पाहो अथवा न पाहो, लोकमर्यादेनुसार आपापल्या (वर्ण, आश्रम, संप्रदायानुसार) कर्तव्याचे पालन केल्याने लोकसंग्रह, आपोआप होतो

कोणतेही कर्तव्यकर्म लहान अथवा मोठे होत नाही. लहानात-लहान आणि मोठ्यात-मोठे कर्म केवळ कर्तव्य समजून (सेवाभावाने) केल्यास समानच होते. देश, काल, परिस्थिती, अवसर, वर्ण, आश्रम, संप्रदाय इत्यादीनुसार जे कर्तव्यकर्म समोर येईल तेच कर्म मोठे होते. कर्माचे स्वरूप आणि फळाच्या दृष्टीनेच कर्म लहान अथवा मोठे, घोर अथवा सौम्य प्रतीत होते*. फलेच्छेचा त्याग झाल्यावर सर्व कर्म उद्देशाची सिद्धी करणारे होतात. म्हणून जडतेशी संबंध-विच्छेद करण्यात लहान-मोठे सर्व कर्म समान असतात.

कोणत्याही मनुष्याचे जीवन दुसऱ्याच्या साहाय्यतेशिवाय चालू शकत नाही. शरीर माता-पित्यापासून मिळते, आणि विद्या, योग्यता, शिक्षण इत्यादी गुरुजनांपासून मिळते. जे अन्न आपण सेवन करतो ते दुसऱ्याकडून उत्पन्न केले गेलेले असते. जे वस्त्र आपण वापरतो ते दुसऱ्याकडून बनविले गेलेले असते, ज्या निवास स्थानात राहत असतो ते दुसऱ्याकडून तयार केले गेलेले असते, ज्या सडकेवर चालतो ती दुसऱ्याकडून बनविली गेली असते इत्यादी. अशा प्रकारे प्रत्येक मनुष्याचा जीवननिर्वाह दुसऱ्यावर अवलंबुन आहे. म्हणून प्रत्येक मनुष्यावर दुसऱ्याचे ऋण आहे, जे फेडण्यासाठी यथाशक्ती दुसऱ्यांची नि:स्वार्थभावाने

* उदाहरणार्थ कर्माच्या स्वरुपाच्या दृष्टीने झाडून काढणे हे कनिष्ठ कर्म आणि व्याख्यान देणे श्रेष्ठ कर्म वाटते तसेच कर्म फलाच्या दृष्टीने कमी दान करण्याचे कमी पुण्य आणि अधिक दान करण्याचे अधिक पुण्य होते असे वाटते.

सेवा (हित) करणे आवश्यक आहे. आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीरादी संपूर्ण सांसारिक पदार्थांना थोडेही आपले आणि आपल्यासाठी न समजल्याने मनुष्य ऋणातून मुक्त होतो.

**परिशिष्ट भाव**—येथे आलेले '**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिताः**' पदांनी सिद्ध होते की, कर्मयोग मुक्तीचे स्वतंत्र साधन आहे. जनकादी राजांनीही कर्मयोगाद्वाराच परमसिद्धी प्राप्त केली, कारण त्यांनी केवळ दुसऱ्यांच्या सेवेसाठी, त्यांना सुख पोहचविण्यासाठीच राज्य केले, आपल्यासाठी राज्य केले नाही.

'**लोकसङ्ग्रहमेवापि सम्पश्यन्कर्तुमर्हसि**' पदांचे तात्पर्य हे आहे की, तू लोकात कर्मयोगाचा हा आदर्श स्थापित केला पाहिजे की, कर्मयोगाचे पालन करण्याने परमसिद्धीची प्राप्ती होते.

***संबंध***—*कर्म करण्याने लोकसंग्रह कसा होतो—याचे विवेचन भगवान् पुढील श्लोकात करीत आहेत.*

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः।**
**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते॥ २१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **श्रेष्ठः** | = श्रेष्ठ मनुष्य | **तत्, तत्, एव** | = ते तेच (आचरण करतात.) | **कुरुते** | = देतो |
| **यत्, यत्** | = जे जे | | | **लोकः** | = दुसरे मनुष्य |
| **आचरति** | = आचरण करतो, | **सः** | = तो | **तत्** | = त्यानुसार |
| **इतरः** | = दुसरे | **यत्** | = जे काही | **अनुवर्तते** | = आचरण करतात. |
| **जनः** | = मनुष्य | **प्रमाणम्** | = प्रमाण | | |

*व्याख्या*— **यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः**— श्रेष्ठ पुरुष तेच आहेत जे संसाराला (शरीरादी पदार्थाला) आणि "स्व" (आपले स्वरूप) ला तत्त्वाने जाणतात. त्यांचा हा स्वाभाविक अनुभव असतो की, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, धन, कुटुंब, जमीन इत्यादी पदार्थ संसाराचे आहेत, आपले नाहीत. एवढेच नव्हे तर ते श्रेष्ठ पुरुष त्याग, वैराग्य, प्रेम, ज्ञान, सद्गुण इत्यादीलाही आपले मानीत नाहीत, कारण त्यांनाही आपले मानल्याने व्यक्तित्व पुष्ट होते जे तत्त्वप्राप्तीत बाधक आहे. "मी त्यागी आहे," मी वैरागी आहे, "मी सेवक आहे," मी भक्त आहे" इत्यादी भावसुद्धा व्यक्तित्वाला पुष्ट करणारे असल्याने तत्त्वप्राप्तीत बाधक असतात. श्रेष्ठ पुरुषाचे ठिकाणी (जडतेच्या संबधाने होणारा) "व्यष्टी अहंकार" तर नसतोच आणि "समष्टी अहंकार" केवळ व्यवहारासाठी असतो, जो संसाराच्या सेवेत लावलेला असतो, कारण अहंकारसुद्धा संसाराचाच आहे (७।४, १३।५)

संसारापासून मिळालेले शरीर, धन, परिवार, पद, योग्यता, अधिकार इत्यादी सर्व पदार्थ सदुपयोग करण्यासाठी अर्थात् दुसऱ्यांच्या सेवेमध्ये लावण्यासाठीच मिळालेले आहेत, उपभोग करण्यासाठी अथवा आपला अधिकार गाजविण्यासाठी नव्हे. जो यांना आपले आणि आपल्यासाठी मानून यांचा उपभोग करतो त्याला भगवान् चोर म्हणतात "**यो भुङ्क्ते स्तेन एव सः।**" (३।१२). हे सर्व पदार्थ समष्टीचेच आहेत, व्यष्टीचे केव्हाही नव्हेत. वास्तविक या पदार्थांशी आपला काहीही संबंध नाही. श्रेष्ठ पुरुषाचे आपले म्हणविले जाणारे शरीरादी पदार्थ (संसाराचे असल्यामुळे) स्वतः स्वाभाविक संसाराच्या सेवेमध्ये लागतात. संपूर्ण प्राण्यांच्या हिताविषयी त्यांची स्वाभाविक प्रवृत्ती असते.

"देण्या" च्या भावाने समाजात एकता, प्रेम निर्माण होते आणि "घेण्या" च्या भावाने संघर्ष उत्पन्न होतो. "देणे" हा भाव उद्धार करणारा आणि "घेणे" हा भाव पतन करणारा असतो. शरीराला "मी" "माझे" अथवा "माझ्यासाठी" मानल्यानेच "घेणे" हा भाव उत्पन्न होतो. शरीराशी आपला काहीही संबंध न मानल्याने श्रेष्ठ पुरुषामध्ये "घेणे" चा भाव थोडासुद्धा राहत नाही. म्हणून त्यांची प्रत्येक क्रिया दुसऱ्यांचे हित करणारी असते. अशा श्रेष्ठ पुरुषाचे दर्शन, स्पर्श, वार्तालाप, चिंतन इत्यादीपासून आपोआप लोकांचे हित होत असते. एवढेच नव्हे तर त्यांच्या शरीराचा स्पर्श करून वाहणाऱ्या वायूनेसुद्धा लोकांचे हित होते.

असे श्रेष्ठ पुरुष दोन प्रकारचे असतात. (१) अवधूत कोटीचे (२) आचार्य कोटीचे. अवधूत कोटीचे श्रेष्ठ पुरुष अवधूतांसाठीच आदर्श असतात, सामान्य जनतेसाठी नव्हे. परंतु आचार्य कोटीचे श्रेष्ठ पुरुष सर्व मानवासाठी आदर्श असतात.याठिकाणी आचार्य कोटीच्या श्रेष्ठ पुरुषाचे वर्णन केले गेले आहे. ज्यांचे आचरण सदा शास्त्रमर्यादेनुकूलच असते. कोणी पाहो अथवा न पाहो अहंता, ममता नसल्याकारणाने त्यांच्याद्वारा स्वाभाविकच कर्तव्याचे पालन

होत असते. जसे अरण्यात एखादे फूल खुलले, थोड्या वेळाने ते सुकले आणि खाली पडले. त्याला कोणी पाहिले नाही तरीपण त्याने आपला सुगंध (चहूकडे) पसरवून दुर्गंधाचा नाश केलाच आहे. त्याचप्रमाणे श्रेष्ठ पुरुषाकडून (पराहिताचा अतूट भाव असल्याकारणाने) संपूर्ण संसारावर स्वाभाविकच पुष्कळ उपकार होत असतात. मग ते कोणी समजून घेवोत अथवा न घेवोत. कारण हे आहे की, व्यक्तित्व (अहंता-ममता) नष्ट झाल्याकारणाने भगवंताच्या त्या पालन शक्तीशी त्याची एकता होते, जिच्याकडून सर्व संसाराचे हित होत असते.

जसे एकाच शरीराचे सर्व अवयव वेगवेगळे असूनही एकच आहेत (जसे एखाद्याही अवयवास पीडा झाल्यास मनुष्य त्याला आपली पीडा मानतो) तसेच संसारातील सर्वप्राणी भिन्न-भिन्न असूनही एकच आहेत. जसे शरीराचे कोणतेही पीडित अवयव (रोगी) दुरुस्त झाल्यास संपूर्ण शरीराचे हित होत असते, तसेच मर्यादेत राहून प्राप्त वस्तू, समय, परिस्थिती इत्यादीनुसार आपल्या कर्तव्याचे पालन करणाऱ्या मनुष्याकडून संपूर्ण संसाराचे आपोआप हित होत असते.

श्रेष्ठ पुरुषांचे आचरण आणि वचनांचा प्रभाव (स्थूल शरीराकडून झाल्याने) स्थूल रीतीने पडतो, तो मर्यादित असतो. परंतु त्यांच्या भावांचा प्रभाव सूक्ष्म रीतीने पडतो तो अमर्याद असतो. कारण ''क्रिया'' सीमित असते आणि ''भाव'' असीम असतो.

श्रेष्ठ पुरुष ज्या भावांना आपल्या आचरणात आणतो त्या भावांचा दुसऱ्या मनुष्यावर फार प्रभाव पडतो. आपल्या वर्ण, आश्रम, संप्रदाय इत्यादीच्या आचरणांचे चांगल्या तऱ्हेने पालन केले असल्याने त्यांच्याकडून बाहेर पडलेल्या वचनांचा दुसऱ्या वर्ण, आश्रम, संप्रदाय इत्यादींच्या लोकांवरही भयंकर प्रभाव पडतो.

जरी श्रेष्ठ पुरुष आपल्यासाठी कोणतेही आचरण करीत नाही आणि त्याचे ठिकाणी कर्तृत्वाभिमानही नसतो, तरीपण लोकांच्या दृष्टिने तो आचरण करीत असलेला दिसल्यामुळे येथे ''**आचरति**'' क्रियेचा प्रयोग झाला आहे. त्यांच्याकडून सर्वांच्या उपकारासाठी स्वत: स्वाभाविक क्रिया होत असतात. आपला कोणताच स्वार्थ नसल्याने त्याची लहान-मोठी प्रत्येक क्रिया लोकांचे आपोआप हित करणारी असते. जरी त्यांच्यासाठी, कोणतेच कर्तव्य नाही ''**तस्य कार्यं न विद्यते।**'' (३।१७) आणि त्याच्या ठिकाणी करण्याचा अभिमानही नसतो ''**निर्ममो निरहङ्कारः**'' (२।७१) तरीपण त्यांच्याकडून सहज स्वाभाविक सावधगिरीने कर्तव्याचे पालन होते. अशा प्रकारे त्यांच्याकडून स्वत: स्वाभाविक लोकसंग्रह होत असतो.

## विशेष गोष्ट

बहुतकरुन असे दिसून येते की, ज्या, समाज, जाती, वर्ण, आश्रम, इत्यादीत जे श्रेष्ठ मनुष्य म्हणविले जातात आणि ज्यांना लोक श्रेष्ठ मानून आदराच्या दृष्टीने पाहतात ते जसे आचरण करतात, त्या समाज, संप्रदाय, जाती इत्यादींचे लोकही तसेच आचरण करू लागतात.

अंत:करणात धन आणि पदाचे महत्त्व तसेच लोभ असल्याकारणाने लोक अधिक धन असणाऱ्या (लखपती, करोडपती) तसेच उच्च पदस्थ (नेता, मंत्री इत्यादी) पुरुषांना श्रेष्ठ मानतात आणि त्यांना फार आदराच्या दृष्टीने पाहतात. ज्यांच्या अंत:करणात जड वस्तूंचे (धन, पद इत्यादी) महत्त्व आहे ते मनुष्य स्वत: वास्तविक श्रेष्ठही नसतात आणि श्रेष्ठ व्यक्तीला समजूही शकत नाहीत. ज्याला ते श्रेष्ठ समजतात तोही वास्तविक श्रेष्ठ नसतो. जर त्यांच्या अंत:करणात धनाचा अधिक आदर असेल, तर त्यांचेवर अधिक धन असणाऱ्यांचाच प्रभाव पडतो. जसे चोरावर, चोरांच्या सरदाराचाच प्रभाव पडतो. वास्तविक श्रेष्ठ नसूनसुद्धा लोका- कडून श्रेष्ठ मानले गेल्याकारणाने त्या धनी तसेच उच्च पदस्थ पुरुषाच्या आचरणाचा समाजात आपोआप प्रचार होतो. जसे धनामुळे जे श्रेष्ठ मानले जातात ते पुरुष ज्या ज्या उपायांनी धन कमवितात आणि संग्रह करतात, त्या त्या उपायांचा लोकामध्ये प्रचार होतो मग ते उपाय कितीही गुप्त का असेनात! ह्यामुळेच, सध्या खोटेपणा, कपट, बेईमानी, धोकाबाजी, चोरी इत्यादी अनिष्ट वृत्तींचा, समाजात कोणत्याही पाठशाळेत शिकविल्याशिवायच आपोआप प्रचार होत चालला आहे.

या ठिकाणी दु:खाची आणि आश्चर्याची गोष्ट अशी आहे की, वर्तमानकाळात लोक लखपतीला तर श्रेष्ठ मानतात. परंतु दररोज एक लाख जप करणाऱ्याला श्रेष्ठ मानीत नाहीत ते विचारच करीत नाहीत की, लखपती मृत्यू पावला तर एक कवडीही त्याच्याबरोबर जाणारी नाही, परंतु भगवन्नामाचा जप करणारा मृत्यू पावला तर संपूर्ण भगवन्नामरूपी धन त्याच्या सोबत जाते. एकही भगवन्नाम मागे राहत नाही.

आपापल्या स्थानात अथवा क्षेत्रात जे पुरुष मुख्य म्हणविले जातात त्या अध्यापक, व्याख्यानदाता, आचार्य, गुरू, नेता, शासक, महन्त, कथावाचक, पुजारी इत्यादी सर्वांनी आपल्या आचरणात विशेष सावधानी ठेवण्याची फार मोठी आवश्यकता आहे. ज्यामुळे दुसऱ्यावर त्यांचा चांगला प्रभाव पडेल. याच प्रकारे परिवारातील मुख्य व्यक्तीला (प्रमुख) ही आपल्या आचरणात पूर्ण सावधगिरी ठेवण्याची

आवश्यकता आहे. कारण मुख्य व्यक्तीकडे सर्वांची नजर असते. आगगाडीच्या चालकाप्रमाणे मुख्य व्यक्तीवर विशेष जिम्मेदारी असते. आगगाडीत बसलेले इतर लोक झोपूही शकतात परंतु चालकाला सदा जागृत रहावे लागते. त्याच्या थोड्याही असावधानीने दुर्घटना होण्याची शक्यता असते. म्हणून संसारात आपापल्या क्षेत्रामध्ये श्रेष्ठ मानल्या जाणाऱ्या सर्व पुरुषांनी आपल्या आचरणावर विशेष लक्ष ठेवण्याची फार मोठी आवश्यकता आहे.

**स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते**—ज्याच्या अंत:करणात, कामना, ममता, आसक्ती, स्वार्थ, पक्षपात इत्यादी दोष नसतात आणि नाशवान् पदार्थांचे महत्त्व अथवा काहीही मिळविण्याचा भाव नसतो अशा माणसांकडून निघालेल्या वचनांचा प्रभाव दुसऱ्यावर आपोआप पडतो आणि ते त्याच्या वचनानुसार स्वत: आचरणसुद्धा करू लागतात.

याठिकाणी एक शंका येऊ शकते की, जर आचरणाविषयी सांगितले तर मग वचनाबद्दल सांगण्याची काय आवश्यकता आहे आणि वचनाबद्दल सांगितल्यावर आचरणाविषयी सांगण्याची काय आवश्यकता आहे ? याचे समाधान असे आहे की, जरी आचरण मुख्य असले तरीपण एकाच मनुष्याकडून सर्व वर्ण, आश्रम, संप्रदाय इत्यादींच्या भावांचे आचरण करणे शक्य नाही. म्हणून श्रेष्ठ मनुष्य स्वत: ज्या वर्ण, आश्रम इत्यादीचा आहे त्यानुसार तो संगोपांग आचरण करतोच आणि इतर वर्ण आश्रम, संप्रदाय इत्यादींच्या लोकांसाठीही तो आपल्या वचनांनी शास्त्र, इतिहास इत्यादींच्या प्रमाणांनी तो उपदेश करतो की, आपल्यासाठी काहीही न करता संपूर्ण प्राण्यांच्या हिताच्या भावाने आपापल्या ( वर्ण, आश्रम, संप्रदाय इत्यादीनुसार) कर्तव्याचे पालन करणे कल्याणाचे सुगम आणि श्रेष्ठ साधन आहे (१८।४५). त्याच्या वचनांनी प्रभावित होऊन दुसरे वर्ण, आश्रम, संप्रदाय इत्यादीचे लोक त्याच्या उपदेशानुसार आपापल्या कर्तव्याचे पालन करू लागतात. जरी आचरणाचे क्षेत्र सीमित आणि वचनाचे क्षेत्र विस्तृत असते तरीपण भगवंताकडून श्रेष्ठ पुरुषांच्या आचरणाच्या विषयात पाच पद "**यत्**" "**यत्**" "**तत्**" "**तत्**" आणि (विशेषरूपाने) "**एव**" वापरले गेले आहेत. त्याचा अभिप्राय असा आहे की, त्यांच्या आचरणांचा प्रभाव समाजावर पाच पट अधिक पडतो आणि प्रमाणाविषयी दोन पद "**यत्**" आणि "**तत्**" देण्याचा अभिप्राय असा आहे की, प्रमाणांचा (वचनांचा) प्रभाव समाजावर केवळ दोन पट (सापेक्षात कमी) पडतो. म्हणूनच भगवंतांनी वीसाव्या श्लोकात लोकसंग्रहासाठी आपल्या कर्तव्यकर्माचे पालन करण्यावरच विशेष भर दिला आहे.

जर श्रेष्ठ मनुष्याने स्वत: आपल्या वर्ण, आश्रम इत्यादींच्या अनुसार आचरण न करता केवळ प्रमाण दिले तर, त्याचा लोकांवर विशेष प्रभाव पडणार नाही. त्यावेळी लोकांचा असा भाव होऊ शकतो की, ह्यागोष्टी तर केवळ ऐकावयाच्या आणि सांगावयाच्या आहेत कारण सांगणारा सुद्धा स्वत: आपल्या कर्तव्यकर्माचे पालन करीत नाही. असा भाव निर्माण झाल्यास लोकांमध्ये आपल्या कर्तव्याविषयी अश्रद्धा आणि अरुची होण्याची शक्यता अहे. म्हणून. श्रेष्ठ पुरुष स्वत: आचरण करून आणि प्रमाण देऊन दोन्हीही प्रकारांनी लोकांना आपापल्या कर्तव्यकर्माच्या पालनात प्रवृत्त करून त्यांचे हित करतो.

श्रेष्ठ पुरुषाच्या आचरणांचे अनुकरण त्यांना श्रेष्ठ मानणारे लोकच करतात. म्हणून वास्तविक श्रेष्ठ असूनही जर कोणी मनुष्य त्याला श्रेष्ठ मानीत नसेल तर तो त्या श्रेष्ठ पुरुषाच्या आचरण आणि वचनानुसार आचरण करू शकणार नाही.

वर्तमानकाळात पारमार्थिक (भगवत्संबंधी) भावांचा प्रचार करणारे अनेक पुरुष असूनही लोकावर त्या भावांचा प्रभाव फारच कमी प्रमाणात दिसून येतो. याचे कारण हेच आहे की, बहुतकरून वक्ता जसा ज्या विषयाचे प्रतिपादन करतो तसा स्वत: काटेकोरपणे आचरण करीत नाही. स्वत: आचरण करून सांगितलेले वचन गोळी टाकून भरलेल्या बंदुकीप्रमाणे असते की, बंदुकीच्या आवाजाबरोबर गोळीचा मारही बसतो. या विरुद्ध स्वत: आचरण न करता सांगितलेले वचन केवळ दारूने भरलेल्या बंदुकीप्रमाणे असते की, जी केवळ आवाज करून शांत होते. हां, हेही खरे आहे की, पारमार्थिक श्रवण अशा रीतीने व्यर्थ जात नाही तर काही ना काही प्रमाणात आपला प्रभाव टाकते. भगवच्चर्चा, कथा-कीर्तन इत्यादींचा काही ना काही प्रभाव सर्वांवर पडतच असतो.जर ऐकणारांच्या ठिकाणी श्रद्धा असेल आणि ते साधन करीत असतील अथवा करू इच्छित असतील तर त्यांचेवर (स्वत: ची श्रद्धा आणि साधनाची रुची असल्यामुळे) वचनांचा प्रभाव अधिक पडतो.

***संबंध**—आता भगवान् पुढील तीन श्लोकांत आपले स्वत:चे उदाहरण देऊन लोकसंग्रहाविषयी पुष्टी करतात.*

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किञ्चन।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि॥ २२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पार्थ** | = हे पार्थ! | **कर्तव्यम्** | = कर्तव्य | | (वस्तू) |
| **मे** | = मला | **अस्ति** | = आहे | **अनवाप्तम्** | = अप्राप्त आहे, |
| **त्रिषु** | = तिन्ही | **च** | = आणि | **कर्मणि,** | = (तरीही मी) |
| **लोकेषु** | = लोकांत | **न** | = न (कोणती) | **एव** | कर्तव्य |
| **न** | = न तर | **अवाप्तव्यम्** | = प्राप्त करण्या- | | कर्मातच |
| **किञ्चन** | = काही | | योग्य | **वर्ते** | = लागून राहतो. |

*व्याख्या*— **न मे पार्थास्ति.......नानवाप्तमवाप्तव्यम्**— भगवंत कोणत्याही लोकांपुरते (स्वर्ग, मृत्यू, पाताळ) मर्यादित नाहीत. म्हणून ते तिन्ही लोकांमध्ये आपले काहीही कर्तव्य नसल्याचे सांगत आहेत.

भगवंतासाठी तिन्ही लोकांत कोणतेही कर्तव्य शिल्लक नाही. कारण त्यांच्यासाठी काहीही मिळवावयाचे शिल्लक नसते. काही ना काही मिळविण्याच्या उद्देशानेच सर्व (मनुष्य, पशू, पक्षी इत्यादी) कर्म करीत असतात. भगवंत उपर्युक्त पदातून फारच विलक्षण अशी गोष्ट सांगत आहेत की, काहीही करावयाचे व मिळवावयाचे शिल्लक नसतानासुद्धा मी कर्म करीत असतो.

आपल्यासाठी काहीही कर्तव्य नसतानासुद्धा भगवान् केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच अवतार घेतात आणि साधू पुरुषांचा उद्धार, पापी पुरुषांच्या विनाशासाठी तसेच धर्माच्या स्थापनेसाठी कर्म करतात. (४।८) अवताराव्यतिरिक्त भगवंताची सृष्टिरचनासुद्धा संपूर्ण प्राणीमात्राच्या उद्धारासाठीच असते. स्वर्गलोक पुण्यकर्मांचे फल भोगण्यासाठी आहे आणि चौऱ्यांशी लाख योनी तसेच नरक पाप कर्मांचे फळ भोगण्यासाठी आहे. मनुष्ययोनी पुण्य आणि पाप—दोन्हीच्या पलीकडे जाऊन आपले कल्याण करून घेण्यासाठी आहे. हे तेव्हाच शक्य होते जेव्हा मनुष्य आपल्यासाठी काहीही करणार नाही. त्यांने संपूर्ण कर्म—स्थूलशरीराकडून होणाऱ्या ''क्रिया'' सूक्ष्मशरीराकडून होणारे ''चिंतन'' आणि कारण शरीराद्वारे होणारी ''स्थिरता'' केवळ दुसऱ्याच्या हितासाठीच कराव्यात, आपल्यासाठी नव्हे. कारण ज्यांच्याद्वारे सर्व कर्म केले जातात ते स्थूल, सूक्ष्म आणि कारण, ही तिन्हीही शरीरे संसाराची आहेत आपली नव्हेत. म्हणून कर्मयोगी शरीर, इंद्रिय, मन बुद्धी पदार्थ इत्यादी संपूर्ण सामुग्रीला (जी वास्तविक संसाराचीच आहे) संसाराचीच समजतो आणि संसाराच्या सेवेमध्ये लावतो. जर मनुष्याने संसाराच्या वस्तू संसाराच्या सेवेत न लावता आपल्या सुखभोगासाठी वापरल्या, तर ती फार मोठी चूक होईल. संसाराच्या वस्तूला आपली समजल्यानेच फलाची इच्छा होते आणि फलप्राप्तीसाठी कर्म होते. अशा प्रकारे जोपर्यंत मनुष्य काही मिळविण्याच्या इच्छेने कर्म करतो तोपर्यंत त्याच्यासाठी कर्तव्य अर्थात् ''करणे'' शिल्लक राहते.

गांभिर्याने विचार केला तर असे दिसून येते की, सर्व मनुष्यांना आपल्यासाठी कोणतेही कर्तव्य नाहीच. कारण प्राप्त केले जाणारे तत्त्व (परमात्मतत्व) नित्यप्राप्त आहे आणि ''स्व'' (स्वरूप) ही नित्य आहे. परंतु कर्म आणि कर्मफल अनित्य आहे अर्थात् उत्पन्न आणि नष्ट होणारे आहे. अनित्या-(कर्म आणि फल) चा संबंध नित्याशी (स्वशी) कसा होऊ शकेल? कर्माचा संबंध ''पराशी'' (शरीर आणि संसाराशी) आहे, ''स्व'' शी नाही. कर्म नेहमी ''परा'' कडून आणि ''परासाठीच'' होत असते. म्हणून आपल्यासाठी काहीही करावयाचेच नाही. जर मनुष्यमात्रासाठी काहीही कर्तव्य नाही तर भगवंतासाठी कोणते कर्तव्यकर्म, कसे असू शकते?

कर्मयोगाने सिद्ध झालेल्या महापुरुषासाठी भगवंतांनी याच अध्यायाच्या सतराव्या-अठराव्या श्लोकात म्हटले आहे की, त्या महापुरुषासाठी कोणतेही कर्तव्य राहत नाही. कारण त्यांची रती, तृप्ती आणि तुष्टी आपली आपणातच होत असते. म्हणून त्यांना संसारामध्ये करणे अथवा न करणे ह्या दोन्हीविषयीही कोणतेच प्रयोजन राहत नाही. तसेच त्यांचा कोणत्याही प्राण्याशी थोडासुद्धा स्वार्थाचा संबंध राहत नाही. असे असूनही ते महापुरुष लोकसंग्रहार्थ कर्म करत असतात. त्याप्रमाणेच या ठिकाणी भगवंत आपल्यासाठी म्हणत आहेत की, कोणतेही कर्तव्य नसताना तसेच काहीही मिळविण्याचे शिल्लक नसतानासुद्धा मी लोकसंग्रहार्थ कर्म करतो. तात्पर्य तत्त्वज्ञ महापुरुषाची भगवंताशी एकता असते—''**मम साधर्म्यमागताः**'' (१४।२) जसे भगवंत त्रैलोक्यात आदर्श पुरुष आहेत (गीता ३।२३, ४।११) तसेच संसारामध्ये तत्त्वज्ञ पुरुषसुद्धा आदर्श आहेत.(३।२५)

**वर्त एव च कर्मणि**—या ठिकाणी ''**एव**'' पदाद्वारे भगवंताना हे म्हणावयाचे आहे की, मी उत्साह आणि तत्परतेने आळसरहित होऊन, सावधपणे, यथासांग कर्तव्यकर्म करतो. कर्माचा त्यागही करीत नाही आणि उपेक्षाही करीत नाही.

जसे इंजिनाची चाके चालू (फिरू) लागली असता इंजिनाला जोडलेल्या डब्यांची चाकेसुद्धा फिरू लागतात, तसेच भगवंत आणि संत पुरुष (ज्यांच्या ठिकाणी

करण्याची आणि मिळविण्याची इच्छा नसते) इंजिना-प्रमाणे कर्तव्यकर्म करीत असतात ज्यामुळे इतर माणसे-सुद्धा त्यांचेच अनुकरण करतात. इतर माणसांच्या ठिकाणी करण्याची आणि मिळविण्याची इच्छा असते. ह्या इच्छा निष्कामभावनेने कर्तव्यकर्म केल्यानेच नष्ट होतात. जर भगवंतांनी आणि संत महापुरुषांनी कर्तव्यकर्म केली नाहीत तर इतर मनुष्यसुद्धा कर्तव्यकर्म करणार नाहीत. ज्यामुळे त्यांचे ठिकाणी प्रमाद-आळस उत्पन्न होइल आणि ते अकर्तव्य करू लागतील. मग त्या माणसांच्या इच्छा कशा नष्ट होतील? म्हणून सर्व माणसांच्या हितासाठी भगवंत आणि संत महापुरुषांकडून स्वाभाविकच कर्तव्य-कर्म होतात.

भगवंत नेहमी कर्तव्य परायण असतात. कधीही कर्तव्यच्युत होत नाहीत. म्हणून भगवत्परायण साधकाने-सुद्धा कधीही कर्तव्यच्युत होऊ नये. कर्तव्यच्युत झाल्यानेच तो भगवत्तत्त्वाच्या अनुभवापासून वंचित राहतो. नित्य कर्तव्यपरायण राहिल्यास साधकाला भगवत्तत्त्वाचा अनुभव सुगमतेने होऊ शकतो.

**परिशिष्ट भाव**—महाभारतात भगवंताने उतङ्क ऋषिंनाही तिन्ही लोकांत आपले कर्तव्य सांगितले आहे—

**धर्मसंरक्षणार्थाय धर्मसंस्थापनाय च॥**
**तैस्तैर्वेषैश्च रूपैश्च त्रिषु लोकेषु भार्गव।** (महा० आश्व० ५४।१३-१४)

'मी धर्माचे रक्षण आणि स्थापनेसाठी तिन्ही लोकात अनेक योनीत अवतार धारण करून त्या त्या रूप आणि वेष यांच्याद्वारा तदनुरूप आचरण करतो.'

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः॥ २३॥**
**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्।**
**सङ्करस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः॥ २४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **हि** | = कारण | **मनुष्याः** | = मनुष्य | **इमे** | = हे |
| **पार्थ** | = हे पार्थ! | **सर्वशः** | = सर्व प्रकाराने | **लोकाः** | = सर्व मनुष्य |
| **यदि** | = जर | **मम** | = माझ्या (च) | **उत्सीदेयुः** | = नष्ट-भ्रष्ट होतील |
| **अहम्** | = मी | **वर्त्म** | = मार्गाचे | **च** | = आणि (मी) |
| **जातु** | = एखाद्या वेळी | **अनुवर्तन्ते** | = अनुसरण करतात. | **सङ्करस्य** | = वर्णसंकरतेला |
| **अतन्द्रितः** | = सावधान होऊन | **चेत्** | = जर | **कर्ता** | = करणारा |
| **कर्मणि** | = कर्तव्यकर्म | **अहम्** | = मी | **स्याम्** | = होईल (तसेच) |
| **वर्तेयम्** | = केले | **कर्म** | = कर्म | **इमाः** | = या |
| **न** | = नाही (तर मग फार मोठी हानी होईल, कारण) | **कुर्याम्** | = करणार | **प्रजाः** | = सर्व प्रजेला |
| | | **न** | = नाही (तर) | **उपहन्याम्** | = नष्ट करणारा होईल. |

***व्याख्या***— [बावीसाव्या श्लोकात भगवंतांनी अन्वय पद्धतीने कर्तव्य पालनाच्या आवश्यकतेचे प्रतिपादन केले आणि या श्लोकात भगवंत व्यतिरेक-पद्धतीने कर्तव्य पालन न केल्यास होणाऱ्या हानीचे प्रतिपादन करीत आहेत]

**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः**—पूर्व श्लोकात आलेले "**वर्त एव च कर्मणि**" पदाच्या पुष्टीसाठी या ठिकाणी "**हि**" पद आले आहे.

भगवान् म्हणतात की, मी सावधपणे कर्म केले नाही, असे होऊच शकत नाही. परंतु जर असे मानले की, मी कर्म केले नाही—या अर्थाने भगवंतांनी या ठिकाणी "**यदि जातु**" या पदांचा प्रयोग केला आहे.

**अतन्द्रितः**—पदाचे तात्पर्य हे आहे की, कर्तव्यकर्म करण्यात आळस आणि प्रमाद करू नये किंबहुना कर्तव्यकर्म अत्यंत सावधपणे आणि तत्परतेने करावीत. सावधपणे कर्तव्यकर्म न केल्याने मनुष्य आळस आणि प्रमादाच्या आहारी जाऊन आपले अमूल्य जीवन नष्ट करतो.

कर्मामध्ये शिथिलता (आळस-प्रमाद) येऊ न देता त्यांना सावधपणे आणि तत्परतेने केल्यानेच कर्माशी संबंध-

विच्छेद होतो. ज्याप्रमाणे झाडाची कडक फांदी लवकर तुटते पण अर्धवट तुटल्यामुळे लटकत असलेली (शिथिल) फांदी लवकर तुटत नाही. त्याप्रमाणे सावधपणे आणि तत्परतेने कर्म करण्याने कर्माशी संबंध-विच्छेद होतो. परंतु आळस आणि प्रमादाने (शिथिलतेने) कर्म करण्याने कर्माशी संबंध-विच्छेद होत नाही. म्हणूनच भगवंतांनी एकोणीसाव्या श्लोकात "**समाचर**" पदाचा तसेच या श्लोकात "**अतन्द्रितः**" पदाचा प्रयोग केला आहे.

जर एखाद्या कर्माविषयी वारंवार आठवण येत असेल तर हेच समजावे की, कर्म करण्यात काही उणिव (कामना, आसक्ती, अपूर्णता, आळस,प्रमाद, उपेक्षा इत्यादी)राहिली आहे. ज्यामुळे त्या कर्माशी संबंध-विच्छेद झाला नाही. कर्माशी संबंध-विच्छेद न झाल्यानेच पूर्वी केलेल्या कर्माची आठवण येते.

**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः**—या पदांनी भगवान् जणू हे म्हणू इच्छितात की, माझ्या मार्गाचे अनुसरण करणारी वास्तविक माणसे म्हणविण्यायोग्य आहेत. जे माझा आदर्श न मानता आळस-प्रमादवश कर्तव्यकर्म करीत नाहीत आणि अधिकार इच्छितात ती आकृतीने माणसे असली तरी वास्तविक माणसे म्हणविण्यास पात्र नाहीत.

याच अध्यायाच्या एकविसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले होते की, श्रेष्ठ पुरुषांच्या आचरणानुसार आणि प्रमाणानुसार सर्व माणसे त्यांचे अनुसरण करतात आणि या श्लोकात भगवान् म्हणतात की, माणसे सर्व प्रकारांनी माझे अनुसरण करतात. याचे तात्पर्य श्रेष्ठ पुरुष तर एकाच लोकात (मनुष्यलोक) आदर्श पुरुष असतात परंतु मी तिन्ही लोकांमध्ये आदर्श पुरुष आहे.

मनुष्याने संसारात कसे रहावे—हे दाखविण्यासाठी भगवंत मनुष्यलोकामध्ये अवतरित होतात. संसारात आपल्यासाठी रहावयाचेच नाही—हीच संसारामध्ये राहण्याची विद्या आहे. संसार वास्तविक पाहिले तर एक विद्यालय आहे, ज्याठिकाणी आम्हाला कामना, ममता, स्वार्थ इत्यादींचा त्याग करून दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करणे शिकावयाचे आहे आणि त्यानुसार कर्म करून आपला उद्धार करावयाचा आहे. संसारातील सर्व संबंधी एकमेकांची सेवा करण्यासाठीच आहेत. म्हणूनच पिता, पुत्र, पती पत्नी, बन्धु-भगिनी इत्यादी या सर्वांनी एकमेकांच्या अधिकारांचे रक्षण करून आपापल्या कर्तव्याचे पालन करावे आणि एकमेकांच्या कल्याणासाठी प्रयत्नशील रहावे.

**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्**—भगवंतांनी तेवीसाव्या श्लोकात "**यदि ह्ययं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः।**" पदांतून सावधपणे कर्म न केल्यास होणाऱ्या हानीचे वर्णन केले आणि आता या चोवीसाव्या श्लोकात उपर्युक्त पदाने कर्म न करण्यापासून होणाऱ्या हानीचे वर्णन करीत आहेत.

जरी असे होऊच शकत नाही की, मी कर्तव्यकर्म करणार नाही तरी पण जर असे मानले—या अर्थाने भगवंतांनी या ठिकाणी "**चेत्**" पदाचा प्रयोग केला आहे.

या पदांचे तात्पर्य आहे की, मनुष्याची कर्म न करण्यात सुद्धा आसक्ती असावयास नको. "**मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि।**" (गीता २।४७) म्हणूनच भगवान् आपले स्वतः चे उदाहरण देऊन म्हणत आहेत की, मला काहीही मिळवावयाचे नसताना सुद्धा मी कर्म करीत असतो. जर मी (ज्या वर्ण, आश्रम, इत्यादीमध्ये अवतार घेतला आहे त्यानुसार) आपल्या कर्तव्याचे पालन केले नाही तर सर्व माणसे नष्ट-भ्रष्ट होतील अर्थात् त्यांचे पतन होईल. कारण आपल्या कर्तव्याचा त्याग झाल्यास मनुष्यामध्ये तामसभाव उत्पन्न होतो ज्यामुळे त्यांची अधोगती होते. "**अधो गच्छन्ति तामसाः।**" (गीता १४।१८)

भगवान् त्रैलोक्यात आदर्श पुरुष आहेत आणि संपूर्ण प्राणी त्यांच्याच मार्गाचे अनुसरण करतात. म्हणून जर भगवंताने कर्तव्याचे पालन केले नाही तर मग तिन्ही लोकांतही कोणीही आपल्या कर्तव्याचे पालन करणार नाही. आपल्या कर्तव्याचे पालन न झाल्याने त्यांचे आपोआप पतन होईल.

**सङ्करस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः**—जर मी कर्तव्यकर्म केले नाही तर सर्व लोक नष्ट-भ्रष्ट होतील आणि त्यांच्या नष्ट होण्याला मी कारण होईल पण हे संभवत नाही. परस्पर विरोधी दोन धर्म (भाव) एकरूप झाले तर त्यास "**संकर**" म्हणतात.

पहिल्या अध्यायाच्या चाळीसाव्या आणि एक्केचाळीसाव्या श्लोकात अर्जुनाने म्हटले होते की, "जर मी युद्ध केले तर कुलाचा नाश होईल. कुलाचा नाश झाल्याने सनातन कुलधर्म नष्ट होतात. धर्म नष्ट झाल्याने संपूर्ण कुलात पापाचा प्रादुर्भाव होतो. पाप अधिक झाल्यास कुलस्त्रिया दूषित होतात आणि स्त्रीया दूषित झाल्यास वर्णसंकर उत्पन्न होतो. अशा प्रकारे अर्जुनाचा भाव असा होता की, युद्ध करण्याने वर्णसंकरता उत्पन्न होईल.* परंतु या ठिकाणी भगवान् त्या विरुद्ध

* अर्जुनाच्या युक्तिवादानुसारसुद्धा जरी विचार केला तरी वास्तविक कर्तव्याचे पालन न करणेच वर्ण संकरतेला कारण आहे. युद्धामध्ये कुलाचा नाश झाल्यास स्त्रीयांचे दूषित होणे हे त्यांचे कर्तव्यच्युत होणेच आहे आणि कर्तव्यच्युत झाल्यानेच वर्णसंकरता उत्पन्न होते. जर स्त्रीयामध्ये असा

म्हणतात की, युद्धरूप कर्तव्यकर्म न केल्यास वर्ण-संकरता उत्पन्न होईल. या विषयात भगवान् स्वतः आपले उदाहरण देत आहेत की, जर मी कर्तव्यकर्म केले नाही तर कर्म, धर्म, उपासना, वर्ण आश्रम, जाती इत्यादी सर्वांत आपोआप संकरता निर्माण होईल. तात्पर्य कर्तव्यकर्म न करण्यानेच संकरता उत्पन्न होते. म्हणून या ठिकाणी भगवान् अर्जुनाला जणू हे म्हणत आहेत की, तू युद्धरूप कर्तव्यकर्म केले नाहीस तरच वर्णसंकरता उत्पन्न होण्याला कारणीभूत होशील, युद्ध करण्याने नव्हे (जसे तू समजत आहेस)

**विशेष गोष्ट**

अर्जुनाच्या मूळ प्रश्नाचे (मला घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात) उत्तर भगवान् बावीसाव्या तेवीसाव्या आणि चोवीसाव्या तीन श्लोकात आपल्या स्वतःच्या उदाहरणाने देत आहेत की, मी तुलाच कर्मामध्ये प्रवृत्त करीत आहे असे नाही तर जरी मला वास्तविक दृष्ट्या त्रैलोक्यात काहीही कर्तव्य आणि प्राप्तव्य नाही, तरीही मी स्वतःसुद्धा कर्मामध्येच रत असतो.

भगवान् अर्जुनाला या विषयाविषयी इशारा देतात की, आता ह्या अवतारामध्ये तूही स्वीकार केला आहे आणि मीही स्वीकार केला आहे की, तू रथी व्हावे आणि मी सारथी बनावे. तर बघ क्षत्रिय असूनसुद्धा आज मी तुझा सारथी झालो आहे आणि अशा प्रकारे स्वीकार केलेल्या आपल्या कर्तव्याचे सावधपणे आणि तत्परतेने पालन करीत आहे. माझ्या ह्या कर्तव्य पालनाचासुद्धा त्रैलोक्यावर प्रभाव पडेल. कारण तिन्ही लोकात मी आदर्श पुरुष आहे. संपूर्ण प्राणी माझ्याच मार्गाचे अनुसरण करतात. अशा प्रकारे तूसुद्धा आपल्या कर्तव्यकर्माची उपेक्षा न करता माझ्याप्रमाणे त्याचे सावधपणे आणि तत्परतेने पालन केले पाहिजे.

*संबंध—मागील तीन श्लोकात भगवंतांनी ज्याप्रमाणे स्वतः कर्म करीत असताना सावध असण्याचे वर्णन केले, त्याचप्रमाणे पुढील दोन श्लोकांत ज्ञानी महापुरुषांना कर्म सावधपणे करण्याची प्रेरणा देत आहेत.*

**सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत।**
**कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसङ्ग्रहम् ॥ २५ ॥**
**न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम्।**
**जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन्॥ २६ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशोद्भव अर्जुन! | | (सुद्धा) | **अज्ञानाम्** | = अज्ञानी मनुष्यांच्या |
| **कर्मणि** | = कर्मात | **लोकसङ्ग्रहम्** | = लोकसंग्रहाच्या | **बुद्धिभेदम्** | = बुद्धीत भ्रम |
| **सक्ताः** | = आसक्त झालेले | **चिकीर्षुः** | = अपेक्षेने | **न, जनयेत्** | = उत्पन्न करू नये, (तर स्वतः) |
| **अविद्वांसः** | = अज्ञानी लोक | **तथा** | = त्याचप्रमाणे | | |
| **यथा** | = ज्याप्रमाणे | **कुर्यात्** | = (कर्म) करावे. | **सर्वकर्माणि** | = संपूर्ण कर्म |
| **कुर्वन्ति** | = (कर्म) करतात, | **युक्तः** | = सावधान (असलेल्या) | **समाचरन्** | = योग्यरीतीने करून |
| **असक्तः** | = आसक्तिरहित | **विद्वान्** | = तत्त्वज्ञ महापुरुषांनी | | |
| **विद्वान्** | = तत्त्वज्ञ महापुरुषाने | **कर्मसङ्गिनाम्** | = कर्मांत आसक्त असलेल्या | **जोषयेत्** | = (त्यांच्याकडूनही तसेच) करवावे. |

*व्याख्या*— **सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत**—ज्या मनुष्यांची शास्त्र, शास्त्रपद्धती आणि शास्त्रविहित शुभ कर्मावर पूर्ण श्रद्धा आहे तसेच शास्त्रविहित कर्माचे फळ अवश्य मिळते—यावर पूर्ण विश्वास आहे, जे तत्त्वज्ञही नाहीत आणि दुराचारीही नाहीत परंतु कर्माविषयी, भोगाविषयी आणि पदार्थाविषयी आसक्त आहेत, अशा माणसांसाठी येथे "**सक्ताः**" "**अविद्वांसः**" पदे आली आहेत. शास्त्रज्ञ असूनही केवळ कामना असल्याकारणाने अशा माणसांना अविद्वान (अज्ञानी) म्हटले गेले आहे. असे पुरुष शास्त्रज्ञ तर असतात पण तत्त्वज्ञ नसतात हे केवळ आपल्यासाठीच कर्म करतात म्हणूनच अज्ञानी म्हणविले जातात.

भाव राहील की, आमच्या पतीनी युद्धरूपी कर्तव्याचे पालन करीत असताना आपला प्राणत्याग केला परंतु आपल्या कर्तव्याचा त्याग केला नाही, तर मग आम्ही आपल्या कर्तव्याचा त्याग का करावा? तर मग ते कर्तव्यच्युत होणार नाहीत. कर्तव्यच्युत न झाल्याने त्यांचे सतीत्व सुरक्षित राहील, त्यामुळे वर्णसंकरता उत्पन्न होणारच नाही.

असे अज्ञानी पुरुष कर्मामध्ये कधीही प्रमाद-आळस इत्यादी न करता, सावधपणे आणि तत्परतेने यथासांग विधीपूर्वक कर्म करतात, कारण त्यांचा असा समज असतो की, कर्म करण्यात एखादी उणीव राहिल्यास त्यापासून मिळणाऱ्या फलात देखील उणीव राहील. भगवान् त्यांच्या अशा प्रकारच्या कर्म करण्याच्या रीतीला आदर्श मानून संपूर्णपणे आसक्तिरहित झालेल्या विद्वानांनासुद्धा याच विधीने लोकसंग्रहार्थ कर्म करण्याविषयी प्रेरणा देत आहेत.

**कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसङ्ग्रहम्**—ज्याच्या ठिकाणी कामना, ममता, आसक्ती, वासना, पक्षपात, स्वार्थ इत्यादींचा संपूर्णपणे अभाव झाला आहे आणि शरीरादी पदार्थांविषयी यत्किंचित्सुद्धा आकर्षण राहिले नाही, अशा तत्त्वज्ञ महापुरुषासाठी येथे ''**असक्तः, विद्वान**'' पदे आली आहेत.*

वीसाव्या श्लोकात''**लोकसङ्ग्रहमेवापिसम्पश्यन्**''म्हणून पुनः एकवीसाव्या श्लोकात ज्याची व्याख्या केली गेली आहे त्यालाच येथे''**लोकसङ्ग्रहं चिकीर्षुः**''पदांनी म्हटले गेले आहे.

श्रेष्ठ पुरुषांचे (आसक्तिरहित विद्वान) सर्व आचरण स्वाभावकिच यज्ञासाठी, मर्यादा सुरक्षित ठेवण्यासाठीच असतात. ज्याप्रमाणे भोगी मनुष्याची भोगामध्ये, मोहग्रस्त मनुष्याची कुटुंबामध्ये आणि लोभी मनुष्याची धनाविषयी प्रीती असते त्याप्रमाणे श्रेष्ठ पुरुषांची प्राणीमात्राच्या हिताविषयी प्रीती असते. त्याच्या अंतःकरणात ''मी लोकहित करीत आहे ''असा भावसुद्धा राहत नाही तर त्याच्याकडून आपोआप लोकहित होत असते. प्राकृत पदार्थांशी संपूर्णपणे संबंध विच्छेद झाल्याकारणाने त्या ज्ञानी महापुरुषाचे म्हणविले जाणारे शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीसुद्धा लोकसंग्रह पदात आलेल्या ''**लोक**'' शब्दाच्या अंतर्गत येतात.

इतर लोकांना असे ज्ञानी महापुरुष लोकसंग्रहाची इच्छा असणारे दिसतात परंतु वास्तविक पाहिले तर त्यांच्या ठिकाणी लोकसंग्रहाचीसुद्धा इच्छा नसते. कारण ते संसारापासून मिळालेल्या शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ, पद, अधिकार, धन, योग्यता, सामर्थ्य इत्यादींना साधनावस्थेपासूनच कधीही यत्किंचितही आपले आणि आपल्यासाठी समजत नाहीत तर त्यांना संसाराचे आणि संसाराच्या सेवेसाठीच समजतात, जे वास्तविक त्यासाठीच आहेत. हीच विचारधारा प्रवाहित असल्यामुळे सिद्धावस्थेतसुद्धा त्यांचे म्हणविले जाणारे शरीरादी पदार्थ आपोआपच कोणतीही इच्छा न बाळगता संसाराच्या सेवेत व्यस्त राहतात.

या श्लोकात ''**यथा**'' आणि ''**तथा**'' पदे कर्म करण्याच्या प्रकाराच्या अर्थाने आले आहेत. तात्पर्य, ज्याप्रमाणे अज्ञानी (सकाम) पुरुष आपल्या स्वार्थ सिद्धीसाठी सावधपणे आणि तत्परतेने कर्म करतात त्याचप्रमाणे ज्ञानी पुरुषांनीही लोकसंग्रहार्थ अर्थात् दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करावे. ज्ञानी महापुरुषांनी प्राणीमात्राच्या हिताचा भाव ठेवून संपूर्ण लौकिक आणि वैदिक कर्तव्यकर्मांचे आचरण केले पाहिजे. सर्वांचे कल्याण कसे होईल ? या भावनेने कर्तव्यकर्म केल्याने लोकांमध्ये सद्भावनेचा प्रचार आपोआप होतो.

अज्ञानी पुरुष तर फळाच्या प्राप्तीसाठी सावधपणे आणि तत्परतेने विधीपूर्वक कर्तव्यकर्म करतो. परंतु ज्ञानी पुरुषाची फलामध्ये आसक्ती नसते आणि त्यांच्यासाठी कोणते कर्तव्यही नसते. म्हणून त्यांच्याकडून कर्माची उपेक्षा होणे संभव आहे. म्हणूनच भगवान् कर्म करण्याच्या विषयात ज्ञानी पुरुषाससुद्धा अज्ञानी (सकाम) पुरुषाप्रमाणे कर्म करण्याविषयी आज्ञा देत आहेत.

एकवीसाव्या श्लोकात तर विद्वानाला ''**आदर्श**'' म्हटले गेले होते पण येथे त्याना ''**अनुयायी**'' म्हटले आहे. तात्पर्य विद्वान आदर्श असो अथवा अनुयायी असो त्याच्याकडून आपोआप लोकसंग्रह होत असतो. ज्याप्रमाणे भगवान् श्रीरामचंद्र प्रभू प्रजेला उपदेशही करतात आणि वडिलांच्या आज्ञेचे पालन करण्यासाठी वनवासालाही जातात. दोन्हीही परिस्थितीत त्यांच्याकडून लोकसंग्रह होतो. कारण त्यांचे कर्म करण्याशी अथवा न करण्याशी कोणतेच प्रयोजन नव्हते.

जेव्हा विद्वान आसक्तिरहित होऊन कर्तव्यकर्म करत असतो, तेव्हा आसक्तियुक्त चित्त असलेल्या पुरुषांच्या अंतःकरणावरसुद्धा विद्वानांच्या कर्मांचा आपोआप प्रभाव पडतो. मग त्या सकामी पुरुषांना ''हा महापुरुष निष्कामभावनेने कर्म करीत आहे'' असे प्रत्यक्ष दिसो अथवा न दिसो! मनुष्याच्या निष्कामभावांचा दुसऱ्यावर स्वाभाविक प्रभाव पडत असतो—हा सिद्धांत आहे. म्हणून आसक्तिरहित विद्वानाच्या भावांचा, आचरणांचा प्रभाव मनुष्यावरच नव्हे तर पशु-पक्षी इत्यादीं- वरही पडत असतो.

* जरी परमात्मतत्त्वाची प्राप्ती झाल्यावर सांख्ययोगी आणि कर्मयोगी—दोन्हीही एक होतात (५।४-५) तरीपण साधन अवस्थेमध्ये दोघांच्या साधनप्रणालीमध्ये फरक असल्याने सिद्धावस्थेतही त्यांच्या लक्षणात, स्वभावात थोडा फरक असतो. सांख्ययोग्याची तर कर्मापासून विशेष उपरती असते. परंतु कर्मयोग्याची कर्मामध्ये विशेष तत्परता असते. कारण पूर्वीपासून कर्म करण्याचा स्वभाव जडलेला असतो. हा फरक सुद्धा कोठे कोठे दिसून येतो.

## विशेष गोष्ट

मनुष्य जोपर्यंत निष्कामभावनेने विहित कर्म करत नाही तोपर्यंत त्याचे जन्म-मरण टळत नाही. तो जोपर्यंत आपल्यासाठी कर्म करीत असतो तोपर्यंत तो कृतकृत्य होत नाही अर्थात् त्याचे ''करणे'' समाप्त होत नाही. कारण ''स्व'' नित्य राहणारा आहे आणि कर्म तसेच त्याचे फळ नष्ट होणारे आहे. म्हणून प्रत्येक मनुष्यासाठी स्वार्थत्यागपूर्वक (आपल्यासाठी न करता केवळ दुसऱ्याच्या हितासाठी) कर्तव्यकर्म करण्याची फार मोठी आवश्यकता आहे.

सांसारिक पदार्थांना मूल्यवान समजल्यानेच कर्मयोगाचे (निष्कामभावनेने कर्तव्यकर्म करणे) अनुष्ठान कठीण वाटते. ''दुसऱ्याकडून कशाचीही इच्छा न ठेवता केवळ दुसऱ्यांच्या हितासाठीच सर्व कर्म करावयाचे आहेत'' ही गोष्ट जर स्वीकार केली तर आजही कर्मयोगाचे अनुष्ठान सुगम होते.

वास्तविक पाहिले तर पदार्थाचे महत्त्व नाही तर त्याच्या उपयोगाचे आहे. पदार्थाच्या उपयोगाचे महत्त्वसुद्धा जेव्हा अंत:करणात पदार्थांचे महत्त्व नसते तेव्हाच असते. कोणताही पदार्थ व्यक्तिगत नाही केवळ उपयोगासाठीच व्यक्तिगत आहे. पदार्थाला व्यक्तिगत समजल्यानेच परहितासाठी त्याचा त्याग करणे जड जाते. कोणताही पदार्थ किंवा क्रिया बंधनकारक नाही, त्यांचा संबंधच बंधनकारक आहे.

विद्वान् पुरुषाकडूनसुद्धा लोकसंग्रहास्तव सर्व कर्म होतात. परंतु असे असतानासुद्धा त्यांच्या ठिकाणी'' मी लोकसंग्रह करीत आहे'' असा अभिमान राहत नाही. कारण हे आहे की, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, विद्या, योग्यता, पद इत्यादी सर्व संसाराचे आहेत आणि संसाराकडून मिळाले आहेत. संसाराकडून मिळालेल्या सामुग्रीला संसाराच्याच सेवेत लावणे ईमानदारी आहे. त्या सामुग्रीला सत्यपणाने आणि ईमानदारीने संसारार्पण करावयाचे आहे. अशाप्रकारे अर्पण करणे म्हणजे फार मोठे काम नाही. जसे एखाद्याने आपल्याजवळ धरोहर (सांभाळण्याकरिता) म्हणून काही रुपये ठेवले आणि काही काळानंतर त्याच्या मागणीनुसार आपण ते रुपये त्याला परत केले तर कोणते मोठे काम केले ? मात्र, आमचे दायित्व संपले आणि आम्ही ऋणमुक्त झालो. त्याचप्रमाणे संसाराची वस्तू संसाराला अर्पण केल्याने आमचे दायित्व समाप्त होते, आम्ही ऋणमुक्त होतो. जन्म-मरणाच्या बंधनातून कायमचे सुटून जातो. म्हणून सांसारिक पदार्थांना संसाराच्या सेवेत वापरून कोणते दान पुण्य करावयाचे नाही तर त्या पदार्थाशी आपला संबंध-विच्छेद करावयाचा आहे.

**न बुद्धिभेदं......विद्वान्युक्तः समाचरन्**—पंचवीसाव्या श्लोकात ''**असक्तः**'', ''**विद्वान्**'' पदांने ज्याचे वर्णन झाले आहे त्याच आसक्तिरहित असलेल्या विद्वानाला येथे ''**युक्तः, विद्वान्**'' पदांनी म्हटले गेले आहे.

ज्याच्या अंत: करणात स्वत: स्वाभाविक समता आहे, ज्याची स्थिती निर्विकार आहे, ज्याची संपूर्ण इंद्रिये योग्य रीतीने वश झाली आहेत आणि जो माती, दगड आणि सोने यांना समान समजतो अशा तत्त्वज्ञ महापुरुषासच ''**युक्तः, विद्वान्**'' (६।८) म्हणतात.

मागील पंचवीसाव्या श्लोकात ''**सक्ताः, अविद्वांसः**'' पदांनी ज्याचे वर्णन झाले आहे त्याच शास्त्रविहित शुभकर्मामध्ये आसक्त असणाऱ्या अज्ञानी पुरुषांना येथे ''**कर्मसङ्गिनाम्, अज्ञानाम्**'' पदांनी म्हटले गेले आहे.

शास्त्रविहित कर्मांना आपल्यासाठी (सुख, भोग, मान, प्रतिष्ठा इत्यादींच्या प्राप्तीसाठी) केल्यामुळेच या पुरुषांना ''कर्मसङ्गी'' आणि ''अज्ञानी'' म्हटले गेले आहे.

श्रेष्ठ पुरुषांवर विशेष जबाबदारी असते. कारण दुसरे लोक स्वाभाविकच त्यांचे अनुसरण करतात. म्हणून भगवान् उपर्युक्त पदाने विद्वानांना आज्ञा करतात की, त्यांनी असे कोणतेही आचरण करू नये आणि अशी कोणतीही भाषा वापरू नये ज्यामुळे अज्ञानी (कामना ठेवणारे) पुरुषांचे वर्तमान स्थितीपासून पतन होईल. अज्ञानी पुरुष आता ज्या स्थितीत आहेत त्या स्थितीपासून त्यांना विचलित करणे (खाली ओढणे) हेच त्यांच्यात ''बुद्धिभेद'' निर्माण करणे होय. म्हणून विद्वानांनी सर्वांच्या हिताचा भाव ठेवून आपल्या वर्णाश्रम धर्मानुसार शास्त्रविहित शुभ कर्मांचे आचरण करीत रहावे. ज्यामुळे दुसऱ्या पुरुषांनासुद्धा निष्कामभावनेने कर्तव्य-कर्म करण्याची प्रेरणा मिळत राहील. समाज आणि परिवारातील मुख्य व्यक्तीसाठीसुद्धा हीच गोष्ट लागू पडते. त्यांनीदेखील सावधपणे आपल्या कर्तव्यकर्माचे योग्य रीतीने आचरण करीत रहावे. ज्यामुळे समाज आणि परिवारावर चांगला प्रभाव पडेल.

बुद्धिभेद उत्पन्न करणारी काही उदाहरणे पुढील प्रमाणे आहेत.

(१) ''कर्मात काय पडले (ठेवले) आहे ? कर्माने तर जीव बंधनात पडतो, कर्म निकृष्ट आहे, कर्माचा त्याग करून ज्ञान संपादन केले पाहिजे'' इत्यादी उपदेश करणे अथवा अशा प्रकारचे आपले आचरण आणि वचनांनी दुसऱ्याच्या ठिकाणी कर्तव्यकर्म करण्याविषयी अश्रद्धा,- अविश्वास उत्पन्न करणे.

(२) "जिथे पहावे तिथे स्वार्थ आहे, स्वार्थावाचून कोणीही राहू शकत नाही, सर्वचजण स्वार्थासाठी कर्म करतात, मनुष्याने कोणते कर्म केले तर फलाची इच्छा असणारच, फलाची इच्छा नसेल तर तो कर्म करीलच कशासाठी?" इत्यादी उपदेश करणे.

(३) "फलाची इच्छा ठेवून (आपल्यासाठी) कर्म केल्याने (फलाचा भोग घेण्यासाठी) वारंवार जन्म घ्यावा लागतो" इत्यादी उपदेश करणे. अशा प्रकारच्या उपदेशाने कामना असणाऱ्या पुरुषांचा कर्मफलावर विश्वास राहत नाही. परिणामी त्यांची (फलाविषयी) आसक्ती तर सुटत नाही. पण शुभ कर्माचा मात्र अवश्य त्याग होतो. बंधनाचे कारण आसक्तीच आहे, कर्म नव्हे. अशा प्रकारे लोकांमध्ये बुद्धिभेद उत्पन्न होऊ न देता तत्त्वज्ञ महापुरुषांनी स्वत: आपल्या वर्णाश्रम धर्मानुसार कर्तव्यकर्म करावे आणि दुसऱ्याकडून-सुद्धा तसेच करवावे. त्यांनी आपले आचरण आणि वचनांनी अज्ञानी लोकांच्या बुद्धीत भ्रम उत्पन्न होऊ न देता त्यांना (अज्ञान्यांना) वर्तमान स्थितीपासून क्रमाक्रमाने उन्नतीकडे वळवावे. ज्या शास्त्रविहित शुभ कर्मांना अज्ञानी पुरुष आता करीत आहेत त्यांची तत्त्वज्ञ महापुरुषांनी विशेष प्रकाराने प्रशंसा करावी आणि त्यांच्या कर्मामध्ये होणाऱ्या उणीवेविषयी त्यांना जाणीव करून द्यावी ज्यामुळे ते त्या उणीवेची पूर्तता करून यथासांग विधीने कर्म करू शकतील. या बरोबरच ज्ञानी पुरुषांनी त्यांना असा उपदेश करावा की, यज्ञ, दान, पूजा, पाठ इत्यादी शुभ कर्म करणे तर फारच उत्तम आहे. परंतु त्या कर्माच्या फलाची इच्छा करणे अनुचित आहे. कारण हिऱ्याला दगड-धोंड्याच्या मोबदल्यात विकणे हा शहाणपणा नव्हे. म्हणून सकामभावनेचा त्याग करून शुभ कर्म केल्यास फारच लवकर लाभ होतो. अशा प्रकारे सकामभावनेतून निष्कामभावनेकडे नेणे बुद्धिभेद नव्हे तर वास्तविकता आहे.

याचप्रकारे उपासनेच्या विषयातसुद्धा तत्त्वज्ञ पुरुषांनी बुद्धिभेद उत्पन्न करू नये. जसे बहुतेक लोक असे म्हणतात की, नाम-जप करते वेळी भगवंतात मन नाही लागले तर नाम-जप करणे व्यर्थ आहे. परंतु तत्त्वज्ञ पुरुषांनी असे न म्हणता, असा उपदेश करावा की, नाम-जप कधी व्यर्थ होऊच शकत नाही कारण भगवंताविषयी काही ना काही भाव असला तरच नाम-जप होतो. भावावाचून नाम-जपात प्रवृत्तीच होत नाही. म्हणून कोणत्याही अवस्थेत नाम-जपाचा त्याग केला जाऊ नये. जसे म्हटले गेले आहे की, **"मनुवाँ तो चहुँ दिसी फिरे, यह तो सुमिरन नाहिं"** याचा देखील असाच अर्थ आहे की, मन न लागल्याने हे "सुमिरन" (स्मरण) नाही, "जप" तर आहेच. मात्र मन लावून ध्यानपूर्वक जप केल्याने फारच लवकर लाभ होतो.

कोणताही मनुष्य संपूर्णपणे गुणरहित नसतो. त्याच्या ठिकाणी काही ना काही गुण राहतच असतो. म्हणून तत्त्वज्ञ महापुरुषांनी कोणत्याही व्यक्तीला (त्याच्या उन्नतीसाठी) एखादी शिकवण द्यावयाची असेल, कोणती गोष्ट समजून सांगावयाची असेल तर त्या व्यक्तीची निंदा अथवा अपमान न करता त्याच्या गुणांची प्रशंसा करावी. गुणांची प्रशंसा करीत असताना आदराने त्याला जी शिकवण दिली जाईल, त्या शिकवणीचा त्याच्यावर विशेष परिणाम होईल. समाज आणि परिवाराच्या मुख्य व्यक्तींनी देखील याच पद्धतीने दुसऱ्यांना शिकवण दिली पाहिजे.

**समाचरन्** आणि **जोषयेत्**—या पदांनी भगवंत विद्वानांना दोन आज्ञा देतात—

(१) स्वत: सावधपणे शास्त्रविहित कर्तव्यकर्माचे उत्तम प्रकारे आचरण करावे आणि

(२) कर्मामध्ये आसक्त असलेल्या अज्ञानी पुरुषां-कडूनसुद्धा तसेच कर्म करवावे. लोकांना दाखविण्यासाठी कर्म करणे "दंभ" आहे, जे पतन करणाऱ्या आसुरी संपत्तीचे लक्षण आहे (१६।४). म्हणून भगवान् लोकांना दाखविण्यासाठी नव्हे तर लोकसंग्रहासाठीच कर्तव्यकर्म करण्याची आज्ञा देत आहेत.

तत्त्वज्ञ पुरुषांनी, कर्म करण्याशी त्यांचे कसलेही प्रयोजन नसतानासुद्धा, संपूर्ण कर्तव्यकर्मांना काळजीपूर्वक करीत रहावे. ज्यामुळे कर्मामध्ये आसक्त असलेल्या पुरुषांची निष्काम कर्माविषयी महत्त्वबुद्धी जागृत होईल आणि तेसुद्धा निष्कामभावनेने कर्म करू लागतील. तात्पर्य त्या महापुरुषांच्या आसक्तिरहित आचरणाला पाहून इतर पुरुषसुद्धा तसेच आचरण करण्याच्या प्रयत्नास लागतील.

अशा प्रकारे ज्ञानी पुरुषांनी कर्मामध्ये आसक्त असलेल्या पुरुषांना आदराने समजावून त्यांच्याकडून निषिद्ध कर्मांचा संपूर्णपणे त्याग करवावा आणि विहितकर्मांतून सकाम भावनेचा त्याग करण्याविषयी प्रेरणा करावी.

**परिशिष्ट भाव**—तत्त्वज्ञ महापुरुष आणि भगवान्—दोघातही कर्तृत्वाभिमान नसतो. म्हणून ते केवळ लोकसंग्रहासाठीच कर्तव्यकर्म करतात, स्वत:साठी नव्हे.साधकानेही आपल्यासाठी काहीही करू नये, कारण स्वरूपात कर्तृत्व नाही. लोकांना वाईट मार्गातून परावृत्त करून सन्मार्गात लावणे लोकसंग्रह आहे. लोकसंग्रहाचा उपाय आहे शास्त्रानुसार योग्य आचरण करणे, परंतु

अंत:करणात साधकाने हा भाव ठेवावा की, आपल्यासाठी काही करावयाचे नाही. त्याने लोकात कसे सांगू नये की, मी आपल्यासाठी काही करीत नाही.

*संबंध*—*ज्ञानी आणि अज्ञानी यात काय अंतर आहे. याविषयी भगवान् पुढील श्लोकांत सांगत आहेत.*

## प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः।
## अहङ्कारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते॥ २७॥

**कर्माणि** = संपूर्ण कर्म
**सर्वशः** = सर्व प्रकारे
**प्रकृतेः** = प्रकृतीच्या
**गुणैः** = गुणांद्वारा
**क्रियमाणानि** = केली जातात,
(परंतु)
**अहङ्कार** = अहंकाराने
**विमूढात्मा** मोहित झालेल्या
अंत:करणाचा
अज्ञानी मनुष्य
**अहम्** = मी
**कर्ता** = कर्ता आहे—
**इति** = असे
**मन्यते** = मानतो.

*व्याख्या*— **प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः**:—ज्या समष्टी शक्तीने शरीर, वृक्षादी उत्पन्न होतात, वाढतात आणि नाश पावतात, गंगादी नद्या प्रवाहित होतात, घर इत्यादी पदार्थात परिवर्तन होते, त्याच समष्टी शक्तीने मनुष्याच्या पाहणे, ऐकणे, खाणे-पीणे इत्यादी सर्व क्रिया होतात. परंतु मनुष्य अहंकाराने मोहित होऊन अज्ञानाने एकाच समष्टी शक्तीपासून होणाऱ्या क्रियांचे दोन विभाग करतो— एकतर आपोआप होणाऱ्या क्रिया जसे शरीर तयार होणे, भोजन पचणे इत्यादी आणि दुसऱ्या ज्ञानपूर्वक होणाऱ्या क्रिया जसे पाहणे, बोलणे, जेवण करणे इत्यादी. ज्ञानपूर्वक होणाऱ्या क्रियांना मनुष्य अज्ञानाने आपल्याकडून होणाऱ्या क्रिया मानतो.

प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या गुणांचे (सत्त्व, रज आणि तम) कार्य असल्यामुळे बुद्धी, अहंकार, मन, पंचमहाभूत, दहा इंद्रिये आणि इंद्रियांचे शब्दादी पाच विषय— हे देखील प्रकृतीचे गुण म्हटले जातात. उपरोक्त पदांतून भगवान् स्पष्ट करतात की, संपूर्ण क्रिया (मग त्या समष्टीच्या असोत अथवा व्यष्टीच्या असोत) प्रकृती गुणांद्वारेच केल्या जातात, स्वरूपाकडून नव्हे.

**अहङ्कारविमूढात्मा**—''अहङ्कार'' ही अंतः करणाची एक वृत्ती आहे. ''स्व'' (स्वरूप) त्या वृत्तीचा ज्ञाता आहे. परंतु अज्ञानाने ''स्व'' शी त्या वृत्तीचा संबंध जोडणे अर्थात् त्या वृत्तीलाच आपले स्वरूप मानल्याने हा मनुष्य विमूढात्मा म्हणविला जातो.

ज्याप्रमाणे शरीर ''**इदम्**'' (हे) आहे तसेच अहंकारही ''**इदम्**'' (हे) आहे. ''**इदम्**'' (हे) कधीही ''**अहम्**'' (मी) होऊ शकत नाही—असा सिद्धांत आहे. जेव्हा मनुष्य अज्ञानाने ''**इदम्**'' ला ''**अहम्**'' अर्थात् ''**हे**'' ला ''**मी**'' मानतो तेव्हा तो ''**अहङ्कार विमूढात्मा**'' म्हणविला जातो. हा मानलेला अहंकार क्रिया केल्याने नाहीसा होत नाही. कारण क्रिया करण्याविषयी देखील अहंकार राहतो. मानलेला अहंकार नष्ट होऊ शकतो—अस्वीकृतीमुळे अर्थात् ''न मानल्याने''!

**विशेष गोष्ट**

''**अहम्**'' दोन प्रकारचा असतो.

(१) वास्तविक (आधाररूप) ''**अहम्**''* जसे ''मी आहे'' (आपली केवळ सत्ता)

(२) अवास्तविक (मानलेला) ''**अहम्**'' जसे ''मी शरीर आहे.''

''वास्तविक अहम्'' स्वाभाविक तसेच नित्य आणि ''अवास्तविक अहम्'' अस्वाभाविक तसेच अनित्य असतो. म्हणून ''वास्तविक अहम्'' चे विस्मरण होऊ शकते पण नष्ट होऊ शकत नाही आणि ''अवास्तविक अहम्'' प्रतीतीस तर येऊ शकतो परंतु टिकू शकत नाही. मनुष्याकडून अशी चूक होत असते की, तो ''वास्तविक अहम्'' (आपले स्वरूप) ला विसरून जाऊन ''अवास्तविक अहम्'' (मी शरीर आहे) लाच सत्य मानतो.

**कर्ताहमिति मन्यते**—जरी संपूर्ण कर्म सर्व प्रकारे प्रकृतिजन्य गुणांकडूनच केले जातात तरीही अहंकाराने मोहित झालेला अज्ञानी मनुष्य काही कर्मांचा कर्ता स्वतःला

* ज्याला या ठिकाणी ''वास्तविक अहम्'' म्हटले आहे तो वास्तविक ''अहम्'' नाही तर सत्रूप, चित्रूप तत्त्व आहे. त्याला ''वास्तविक अहम्'' यासाठी म्हटले आहे की, तो कधी बदलत नाही पण ''अवास्तविक अहम्'' बदलत असतो. जसे एखादी अशिक्षित व्यक्ती म्हणते की, ''मी मूर्ख आहे, अशिक्षित आहे'' आणि तीच व्यक्ती सुशिक्षित झाल्यावर म्हणते की, ''मी विद्वान आहे, सुशिक्षित आहे.'' अशा प्रकारे ''अहम्'' च्या बदलण्याने सुद्धा आपली सत्ता (मी आहे) बदलली नाही. मानलेल्या ''अहम्'' बरोबर सदा राहिल्यानेच त्या सत्तेला ''वास्तविक अहम्'' म्हणतात. मानलेल्या ''अहम्'' चा त्याग झाल्याबरोबर अर्थात् तेथून दृष्टी बाजूला होताच तो ''वास्तविक अहम्'' सच्चिदानन्द स्वरूप होतो.

समजतो. कारण त्याने अहंकारालाच आपले स्वरूप समजले आहे. अहंकारामुळेच मनुष्य शरीर, इंद्रिय, मन इत्यादींच्या ठिकाणी "मीपणा" चा अनुभव करतो आणि त्यांच्या (शरीरादी) क्रियांचा कर्ता स्वतः ला समजतो. ही विपरीत समजूत मनुष्याने स्वतःच करून घेतली आहे. म्हणून ह्या समजूतीला तोच नष्ट करू शकतो. याला नष्ट करण्याचा उपाय आहे—ह्याला विवेक विचाराने न मानणे, कारण मान्यतेनेच मान्यता नष्ट होते.

एक "करणे" असते आणि एक "न करणे" असते. ज्याप्रमाणे "करणे" क्रिया आहे त्याप्रमाणेच "न करणे" सुद्धा क्रिया आहे. झोपणे, जागणे, बसणे, चालणे, समाधिस्थ होणे इत्यादी सर्व क्रिया आहेत. सर्व क्रिया प्रकृतीत होतात. "स्व" (चेतनस्वरूप) मध्ये "करणे" आणि "न करणे" दोन्हीही होत नाहीत. कारण ते दोन्हीच्या पलीकडील आहे. ते अक्रिय आणि सर्वांचे प्रकाशक आहे. जर "स्व" मध्ये सुद्धा क्रिया असती तर तो क्रियांचा (शरीरादीत परिवर्तनरूप क्रियांचा) ज्ञाता कसा झाला असता? करणे आणि न करणे त्याच ठिकाणी होत असते ज्या ठिकाणी "अहम्" (मी) असतो. "अहम्" नसल्यास क्रियेशी कोणताही संबंध राहत नाही. करणे आणि न करणे—दोन्ही ज्याच्या द्वारा प्रकाशित होतात त्या अक्रिय तत्त्वात (आपले स्वरूप) सर्व माणसांची स्वाभाविक स्थिती असते. परंतु "अहम्" मुळे मनुष्य प्रकृतीमध्ये होणाऱ्या क्रियेशी आपला संबंध मानतो. प्रकृती (जड) शी मानलेला संबंधच "अहम्" म्हणविला जातो.

## विशेष गोष्ट

ज्याप्रमाणे समुद्राचाच एक अंश असल्याने लाटा आणि समुद्राची जातीय एकता आहे अर्थात् ज्या जातीची लाट आहे त्याच जातीचा समुद्र आहे. त्याचप्रमाणे संसाराचाच एक अंश असल्याकारणाने शरीराची संसाराशी जातीय एकता आहे. मनुष्य संसाराला तर "मी" मानत नाही पण चुकीने शरीराला "मी" मानतो.

ज्याप्रमाणे समुद्रावाचून लाटेचे स्वतःचे कोणतेच स्वतंत्र अस्तित्व नसते, त्याचप्रमाणे संसारावाचून शरीराचे स्वतःचे कोणतेच आस्तित्व नाही. परंतु अहंकाराने मोहित झालेला मनुष्य जेव्हा शरीराला "मी" मानतो (आपले स्वरूप). तेव्हा त्याचे ठिकाणी अनेक प्रकारच्या कामना उत्पन्न होऊ लागतात. ज्याप्रमाणे मला स्त्री, पुत्र, धन इत्यादी पदार्थ मिळावेत, लोकांनी मला चांगले समजावे, माझा मान-सन्मान करावा, इतरांनी माझ्या म्हणण्यानुसार वागावे इत्यादी. त्याचे याकडे लक्षच जात नाही की, शरीराला आपले स्वरूप समजून मी अगोदरच बांधला गेलो आहे. आता कामना करून अधिक बंधन वाढवीत आहे—स्वतःला भयंकर अशा संकटात लोटीत आहे.

साधन काळात "मी (स्व) प्रकृतिजन्य गुणांपासून संपूर्णपणे वेगळा आहे" असा अनुभव नसतानासुद्धा जेव्हा साधक असे मानतो तेव्हा त्याला तसाच अनुभव येतो. अशा प्रकारे जसे तो चुकीच्या मान्यतेने बांधला गेला होता तसेच योग्य मान्यता करून मुक्त होतो. कारण मानलेली गोष्ट न मानल्यामुळेच नाहीशी होते—हा सिद्धांत आहे. हीच गोष्ट भगवंतांनी पाचव्या अध्यायाच्या आठव्या श्लोकात "**नैव किञ्चित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित्।**" या पदांतून "**मन्येत**" या पदाने प्रगट केले आहे की, "मी कर्ता आहे" या अवास्तविक मान्यतेला नाहीशी करण्यासाठी "मी काहीही करीत नाही" अशी वास्तविक मान्यता करावी लागेल.

"मी शरीर आहे," मी कर्ता आहे" इत्यादी असत्य मान्यतासुद्धा इतक्या दृढ होतात की, त्यांचा त्याग करणे कठीण जाते तर मग "मी शरीर नाही," मी अकर्ता आहे" इत्यादी सत्य मान्यता का बरे दृढ होणार नाहीत? आणि एक वेळ दृढ झाल्या तर त्यांचा त्याग कसा होईल?

**परिशिष्ट भाव**—संपूर्ण क्रिया जड विभागातच होत असतात. चेतन-विभागात कधी किंचिन्मात्रही कोणती क्रिया होत नाही. अहंकाराने अंतःकरण मोहित झाल्यामुळे अज्ञानी मनुष्य 'मी कर्ता आहे'—असे मानतो. अहंकाराने अंतःकरण मोहित होण्याचे तात्पर्य आहे—अपरा प्रकृतीचा अंश अहम्शी आपला संबंध मानणे अर्थात् अहम् आपले स्वरूप मानणे की, हाच मी आहे. यालाच तादात्म्य म्हणतात.

स्वतःला कर्ता मानणारा तर चेतन आहे, परंतु जो जड अहम्ला आपले स्वरूप मानतो. तात्पर्य हे आहे की, अहम्ला आपले स्वरूप मानणारा, आपणाला एकदेशीय मानणारा स्वयं परमात्म्याचा अंश आहे. त्या स्वयंमध्ये कर्तेपणा संभवतच नाही (गीता तेराव्या अध्यायाचा एकोणतीसावा श्लोक). वास्तविक स्वयं शरीराशी मिळू शकतच नाही—'**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते**' (गीता १३।३१), परंतु मनुष्य मिळालेला मानतो—'**कर्ताहमिति मन्यते।**' वास्तविक तादात्म्य होत नाही, तर तादात्म्य मानले जाते. तात्पर्य हे आहे की, स्वयं कर्ता बनत नाही, केवळ अविवेकपूर्वक आपल्यात कर्तेपणाची मान्यता करून घेतो—'**मन्यते।**' आपल्याला कर्ता मानताच त्याच्यावर शास्त्रीय विधि-निषेध लागू होतात आणि त्याला कर्मफलाचा भोक्ता व्हावे लागते.

स्वरूप (स्वयं) यात कोणती क्रिया नाही. जेथे कुठे रिकामी जागा असेल तेथेच क्रिया होते. सर्वथा ठोस असलेल्या स्वरूपात क्रिया कधी होऊ शकेल? परंतु आपल्याला कर्ता मानल्याने तो प्रकृतीच्या ज्या क्रियेशी संबंध जोडतो, ती क्रिया त्याच्यासाठी फलजनक 'कर्म' बनते, ज्याचे फल त्याला भोगावेच लागते. कारण जो कर्ता असतो, तोच भोक्ता होतो.

स्वरूपाचा संपूर्ण कारकाशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद आहे. म्हणून स्वरूपात लेशमात्रही कर्तृत्व नाही. कर्तृत्वाचा विभागच वेगळा आहे. आजपर्यंत देवता, मनुष्य, पशू, पक्षी, यक्ष, राक्षस इत्यादी अनेक शरीरांत (योनींत) जे काही कर्म केले गेलेले आहेत, त्यापैकी कोणतेही कर्म स्वरूपापर्यंत पोहचले नाही आणि कोणतेही शरीर स्वरूपापर्यंत पोहचले नाही. कारण कर्म आणि पदार्थ (शरीर) यांचा विभागच वेगळा आहे आणि स्वरूपाचा विभागच वेगळा आहे. परंतु या विवेकाला महत्त्व न दिल्यामुळे मनुष्य कर्म आणि फलात बांधला जातो.

जोपर्यंत 'करणे' आहे तोपर्यंत अहंकाराशी संबंध आहे. कारण अहंकाराविना (कर्तेपणा विना) 'करणे' सिद्ध होत नाही. करण्याचा भाव असल्यावर कर्तृत्वाभिमान होतोच. कर्तृत्वाभिमान झाल्याने 'करणे' होते आणि करण्याने कर्तृत्वाभिमान पुष्ट होतो. म्हणून केलेल्या साधनेने साधक कधीही अहंकाररहित होऊच शकत नाही. अहंकारपूर्वक केले गेलेले कर्म कधीही कल्याण करू शकत नाही, कारण सर्व अनर्थांचे, जन्म-मरणाचे मूळ अहंकारच आहे. आपल्यासाठी काही न करण्याने अहंकाराशी संबंध राहत नाही अर्थात् संपूर्ण प्रकृतीशी संबंध-विच्छेद होतो. म्हणून साधकाने क्रियेला महत्त्व न देता आपल्या विवेकाला महत्त्व द्यावे. विवेकाला महत्त्व दिल्याने विवेक आपोआप स्पष्ट होत राहतो आणि साधकाचे मार्गदर्शन करीत राहतो. पुढे चालून हा विवेकच तत्त्वज्ञानात परिणत होतो. (बदलतो)

**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः।**
**गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते॥ २८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = परंतु | **तत्त्ववित्** | = तत्त्वाने जाणणारा महापुरुष | **वर्तन्ते** | = वर्तत आहेत'— |
| **महाबाहो** | = हे महाबाहो! | | | **इति** | = असे |
| **गुणकर्म-** | = गुण-विभाग आणि | **गुणाः** | = 'संपूर्ण गुण (च) | **मत्वा** | = मानून (त्यात) |
| **विभागयोः** | = कर्म-विभाग यांना | **गुणेषु** | = गुणांत | **न, सज्जते** | = आसक्त होत नाही. |

*व्याख्या*—**तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः—** पूर्वीच्या श्लोकात वर्णन केलेल्या "**अहङ्कारविमूढात्मा**" (अहंकाराने मोहित झालेल्या अंतः करणाचे पुरुष) पेक्षा तत्त्वज्ञ महापुरुषांना संपूर्णपणे भिन्न आणि विलक्षण दर्शविण्यासाठी या ठिकाणी "तु" पदाचा प्रयोग झाला आहे.

सत्त्व, रज आणि तम—हे तिन्ही गुण प्रकृतिजन्य आहेत. या तिन्ही गुणांचे सृष्टी हे कार्य असल्याने संपूर्ण सृष्टी त्रिगुणात्मक म्हटली जाते. म्हणून शरीर , इंद्रिय, मन, बुद्धी, प्राणी पदार्थ इत्यादी सर्व गुणमयच आहेत. ह्यालाच "गुणविभाग" म्हणतात. या (शरीरादी) पासून होणाऱ्या क्रियांना "कर्मविभाग" म्हणतात.

गुण आणि कर्म अर्थात् पदार्थ आणि क्रिया निरंतर परिवर्तनशील आहेत पदार्थ उत्पन्न आणि नष्ट होणारे आहेत तसेच क्रिया आरंभ आणि समाप्त होणाऱ्या आहेत. असा योग्य अनुभव करणे हेच गुण आणि कर्म-विभाग यांना तत्त्वाने जाणणे आहे. चेतनात (स्वरूप) कधीही कोणती क्रिया होत नाही. ते सदा निर्लिप्त, निर्विकार असते अर्थात् त्याचा कोणत्याही प्राकृत पदार्थ आणि क्रियेशी संबंध नसतो. असा योग्य अनुभव करणेच चेतनाला तत्त्वाने जाणणे आहे.

अज्ञानी पुरुष जेव्हा या गुण-विभाग आणि कर्म-विभागाशी आपला संबंध प्रस्थापित करतो तेव्हा तो बांधला जातो. शास्त्रीय दृष्टिकोनातून तर या बंधनाचे मुख्य कारण "अज्ञान" आहे परंतु साधकीय दृष्टीने "राग" (आसक्ती) हेच मुख्य कारण आहे. "राग" अविवेकाने उत्पन्न होतो. विवेक जागृत झाल्यास "राग" नष्ट होतो. हा विवेक मनुष्याचे ठिकाणी विशेषरूपाने आहे. आवश्यकता केवळ या विवेकाला महत्त्व देऊन जागृत करण्याची आहे. म्हणून साधकानी (विवेकाला जागृत करून) विशेषत्वाने रागास (आसक्तीस) नष्ट केले पाहिजे.

तत्त्वाला जाणू इच्छिणारा साधकसुद्धा जर गुण (पदार्थ) आणि कर्माशी (क्रिया) आपला कोणताही संबंध ठेवीत नसेल तर तोही गुण-विभागाला आणि कर्म-विभागाला तत्त्वाने जाणतो. मग तो गुण-विभाग आणि कर्म-विभाग याना तत्त्वाने जाणून घेवो अथवा "स्व" ला (चेतन स्वरूपाला) तत्त्वाने जाणून घेवो, दोन्हीचाही

परिणाम एकच असेल.

## गुण-कर्म-विभागाला तत्त्वाने जाणण्याचे उपाय

(१) शरीरात राहत असूनसुद्धा चेतन तत्त्व (स्वरूप) संपूर्णपणे अक्रिय आणि निर्लिप्त असते (१३।३१). प्रकृतीचे कार्य (शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी) "**इदम्**" (हे) म्हटले जाते. "**इदम्**" (हे) कधीही "**अहम्**" (मी) होत नाही. जर "हे" (शरीरादी) "मी" नाहीत तर "हे" मध्ये होणाऱ्या क्रिया "माझ्या" कशा होतील? तात्पर्य शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादी सर्व प्रकृतीची कार्य आहेत आणि "स्व" यापासून संपूर्णपणे संबंधहीन आणि निर्लिप्त आहे. म्हणून यांच्या ठिकाणी होणाऱ्या क्रियांचा कर्ता "स्व" कसा होऊ शकतो? अशा प्रकारे स्वत: ला पदार्थ आणि क्रियेपासून भिन्न अनुभव करणारा बंधनात पडत नाही. सर्व अवस्थांमध्ये "**नैव किञ्चित्करोमीति**" (५।८) मी काहीही करत नाही" असा अनुभव करणेच आपणाला क्रियेहून वेगळे जाणणे अर्थात् अनुभव करणे आहे.

(२) पाहणे, ऐकणे, खाणे-पिणे इत्यादी सर्व "क्रिया" आहेत आणि पाहणे-ऐकणे इत्यादींचे विषय, खाण्या-पिण्याची सामुग्री इत्यादी सर्व "पदार्थ" आहेत. या क्रियांना आणि पदार्थांना इंद्रियांनी (डोळे-कान-मुख इत्यादी) जाणतो. इंद्रियांना "मनाने", मनाला "बुद्धी" ने आणि बुद्धीला मानलेल्या "अहम्" (मीपणा) ने जाणतो. हा "अहम्" ही एका सामान्य प्रकाशाने (चेतन) प्रकाशित होतो. तो सामान्य प्रकाशच सर्वांचा ज्ञाता, सर्वांचा प्रकाशक आणि सर्वांचा आधार आहे.

"**अहम्**" च्या पलीकडे असलेल्या आपल्या स्वरूपाला (चेतन) कसे जाणावे? गाढ निद्रेत जरी बुद्धी आविद्येमध्ये लीन होते तरीपण मनुष्य जागे झाल्यावर म्हणतो की, "मी फार गाढ झोपलो होतो." अशा प्रकारे जागे झाल्यावर "मी आहे" चा अनुभव सर्वांना होतो. यावरुन सिद्ध होते की, सुषुप्ती काळातही आपली सत्ता होती. जर असे नसते तर "मी फार गाढ झोपलो होतो, मला कशाचेही भान नव्हते" अशी स्मृती अथवा ज्ञान झाले नसते. स्मृती अनुभवजन्य असते.* म्हणून सर्वांना प्रत्येक अवस्थेमध्ये आपल्या सत्तेचा अखंड अनुभव असतो. कोणत्याही अवस्थेत आपल्या अभावाचा (मी नाही असा) अनुभव येत नाही. ज्यांनी मानलेल्या "अहम्" (मीपणा) शी सुद्धा संबंध-विच्छेद करून आपल्या स्वरूपाचा (आहे) बोध करून घेतला आहे ते "तत्त्ववित्" म्हटले जातात.

अपरिवर्तनशील परमात्मततत्त्वाशी आपला स्वत: सिद्ध नित्य संबंध आहे. परिवर्तनशील प्रकृतीशी आपला वस्तुत: संबंध नाहीच, केवळ मानलेला आहे. प्रकृतीशी मानलेल्या संबंधाला जर विवेकाने नष्ट केले तर त्याला "ज्ञानयोग" म्हणतात आणि जर तोच संबंध दुसऱ्याच्या हितासाठीच कर्म करून नष्ट केला तर त्याला "कर्मयोग" म्हणतात. प्रकृतीशी संबंध विच्छेद झाल्यावरच "योग" (परमात्म्याशी नित्य संबंधाचा अनुभव) होतो, नाही तर केवळ "ज्ञान" आणि "कर्म" च होत असते. म्हणून प्रकृतीशी संबंध विच्छेदपूर्वक परमात्म्याशी असलेल्या आपल्या नित्य संबंधाला ओळखणाराच "तत्त्ववित्" असतो.

**गुणा गुणेषु वर्तन्ते**—प्रकृतिजन्य गुणांपासून उत्पन्न झाल्याकारणाने शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीसुद्धा "गुण" च म्हटले जातात आणि यांच्याद्वारा संपूर्ण कर्म होतात. अविवेकामुळे अज्ञानी पुरुष या गुणांशी आपला संबंध मानून यांच्याकडून होणाऱ्या क्रियांचा स्वत:ला कर्ता मानतो.† परंतु "स्व" (सामान्य प्रकाश-चेतन) मध्ये आपल्या स्वत:सिद्ध स्थितीचा अनुभव झाल्यास "मी कर्ता आहे" असा भाव येऊच शकत नाही.

आगगाडीचे इंजिन चालू असते अर्थात् त्यामध्ये क्रिया होत असते. परंतु ओढण्याची शक्ती इंजिन आणि चालकाच्या संयोगाने येत असते. वास्तविक ओढण्याची शक्ती तर इंजिनाचीच आहे. परंतु चालकाकडून संचालन झाले तरच ते गंतव्य स्थानावर पोहचते. कारण इंजिनामध्ये मन, बुद्धी, इंद्रिये नाहीत म्हणून त्याला इंद्रिये, मन बुद्धी असणाऱ्या चालकाची (मनुष्याची) आवश्यकता असते. परंतु मनुष्याजवळ शरीररूपी इंजिनही आहे आणि संचालन करण्यासाठी इंद्रिये, मन, बुद्धीही आहेत. शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी—हे चारीही एका सामान्य प्रकाशा (चेतन) पासून सत्ता-स्फूर्ती मिळवूनच कार्य करण्यास समर्थ होत असतात. सामान्य प्रकाशा (ज्ञान) चे प्रतिबिंब बुद्धीमध्ये पडत असते. बुद्धीच्या ज्ञानाला मन ग्रहण करते, मनाच्या ज्ञानाला इंद्रिये ग्रहण करतात आणि मग शरीररूपी इंजिनाचे संचालन होत असते. बुद्धी, मन, इंद्रिये, शरीर हे सर्वचे सर्व गुण आहेत आणि यांना प्रकाशित करणारा अर्थात्

* अनुभूतविषयासम्प्रमोषः स्मृतिः। (योगदर्शन १।११)

† उदाहरणार्थ वाणी "पदार्थ" आहे, बोलण्याची प्रवृत्ती "क्रिया" आहे आणि बोलणे समष्टी शक्तीने होत आहे अर्थात् गुणच गुणांमध्ये वर्तन करीत आहेत, परंतु मनुष्य अज्ञानाने पदार्थ आणि क्रियांना आपले समजून स्वत: कर्ता होतो.

यांना सत्ता स्फूर्ती देणारा "स्व" या गुणांनी संबंधहीन, निर्लिप्त असतो. म्हणून वास्तविक संपूर्ण गुणच गुणांमध्ये वर्तन करीत असतात.

श्रेष्ठ पुरुषाच्या आचरणाचे अनुकरण सर्व लोक करीत असतात म्हणूनच भगवंत ज्ञानी महापुरुषाकडून लोकसंग्रह कसा होतो याचे वर्णन करीत असताना म्हणतात की, ज्या-प्रमाणे तो महापुरुष "संपूर्ण गुणच गुणांमध्ये वर्तन करीत आहेत" असा अनुभव करून त्यात आसक्त होत नाही, त्याप्रमाणे साधकांनीही तसेच मानून त्यांच्या ठिकाणी आसक्त होऊ नये.

## प्रकृती-पुरुषसंबंधी मार्मिक गोष्ट

आकर्षण नेहमी सजातीयतेमध्येच होत असते, जसे कानाचे शब्दामध्ये, त्वचेचे स्पर्शामध्ये, डोळ्याचे रूपामध्ये, जिव्हेचे रसामध्ये आणि नाकाचे गंधामध्ये आकर्षण होत असते. अशा प्रकारे पाचही इंद्रियांचे आपापल्या विषया-मध्येच आकर्षण होत असते. एका इंद्रियाचे दुसऱ्या इंद्रियाच्या विषयामध्ये आकर्षण होत नाही. तात्पर्य एका वस्तूचे दुसऱ्या वस्तूच्या ठिकाणी आकर्षण होण्यात मूळ कारण त्या दोघांची सजातीयताच आहे.

आकर्षण, प्रवृत्ती तसेच प्रवृतीची सिद्धी सजातीयते-मध्येच होत असते. विजातीय वस्तूविषयी आकर्षणही होत नाही, प्रवृत्तीही होत नाही आणि प्रवृत्तीची सिद्धीही होत नाही. म्हणून आकर्षण, प्रवृत्ती आणि प्रवृतीची सिद्धी सजातीयतेमुळे "प्रकृती" मध्येच होत असते. परंतु पुरुषा (चेतन) मध्ये विजातीय प्रकृती (जड) चे जे आकर्षण प्रतीत होते त्यातही वास्तविक प्रकृतीचा अंशच प्रकृतीकडे आकर्षित होतो. करणे आणि भोगणेची क्रिया प्रकृतीतच असते पुरुषात नव्हे. पुरुष तर सदा निर्विकार, नित्य, अचल तथा एकरस असतो.

तेराव्या अध्यायाच्या एकतीसाव्या श्लोकात भगवंतांनी म्हटले आहे की, शरीरामध्ये स्थित असूनही पुरुष वास्तविक काहीही करीत नाही आणि लिप्तही होत नही—"**शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते।**" पुरुष तर केवळ "प्रकृतिस्थ" होण्याने अर्थात् प्रकृतीशी तादात्म्य मानण्याच्या कारणाने सुख-दुःखाच्या भोक्तृत्वाला कारण होतो. "**पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते।**" (१३।२०) आणि "**पुरूषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान्।**" (१३।२१) तात्पर्य जरी संपूर्ण क्रिया, क्रियांची सिद्धी आणि आकर्षण प्रकृतीतच होत असते तरी प्रकृतीशी तादात्म्यामुळे पुरुष "मी सुखी आहे", "मी दुःखी आहे" असे समजून भोक्तृत्वाला कारण होतो. कारण सुखी दुःखी होण्याचा अनुभव प्रकृतीमध्ये (जड) होऊच शकत नाही आणि प्रकृती (जड) वाचून केवळ पुरुष (चेतन) सुखदुःखाचा भोक्ता होऊच शकत नाही.

पुरुषामध्ये प्रकृतीची परिवर्तनरूप क्रिया अथवा विकार नसतो. परंतु त्याच्या ठिकाणी संबंध मानणे अथवा न मानणे या विषयी योग्यता तर आहेच. पुरुष दगडाप्रमाणे जड नसून ज्ञानस्वरूप आहे. जर पुरुषाच्या ठिकाणी संबंध मानण्याची अथवा न मानण्याची योग्यता नसती तर तो प्रकृतीशी आपला संबंध कसा मानतो? प्रकृतीशी संबंध मानून त्याच्या क्रियेला आपल्यात कसे मानतो? संबंध मानणे अथवा न मानणे भाव आहे क्रिया नव्हे.

पुरुषामध्ये संबंध जोडणे अथवा न जोडणे याची योग्यता तर आहे पण त्याच्यामध्ये क्रिया करण्याची योग्यता नाही. क्रिया करण्याची योग्यता त्याच्यातच असते ज्याच्या ठिकाणी परिवर्तन (विकार) होत असते. पुरुषात परिवर्तनाचा स्वभाव नसतो. परंतु प्रकृतीमध्ये परिवर्तनाचा स्वभाव असतो. अर्थात् प्रकृतीच्या ठिकाणी क्रियाशीलता स्वाभाविक आहे. म्हणून प्रकृतीशी संबंध जोडूनच पुरुष आपल्या ठिकाणी क्रिया समजतो "**कर्ताहमिति मन्यते।**" (३।२७)

पुरुषामध्ये कोणतेही परिवर्तन होत नाही. ही (परिवर्तनाचे न होणे) त्याची कोणती अशक्तता अथवा उणीव नाही तर त्याची ही महतीच आहे. तो निरंतर एकरस, एकरूप राहणारा अहे.परिवर्तन होणे त्याचा स्वभावच नाही. जसे बर्फाचे ठिकाणी गरम होण्याचा स्वभाव अथवा योग्यता नाही. परिवर्तनरूप क्रिया होणे हा प्रकृतीचा स्वभाव आहे पुरुषाचा नव्हे. परंतु प्रकृतीशी आपला संबंध न मानण्या-विषयी याच्या ठिकाणी पूर्ण योग्यता, सामर्थ्य, स्वतंत्रता आहे. कारण वास्तविक याचा प्रकृतीशी मूलतः संबंध नाही.

प्रकृतीचा अंश शरीराला पुरुष जेव्हा आपले स्वरूप समजतो तेव्हा प्रकृतीच्या त्या अंशामध्ये (सजातीय प्रकृतीचे) आकर्षण, क्रिया आणि त्याच्या फलाची प्राप्ती होत राहते. याचाच संकेत या ठिकाणी "**गुणाः गुणेषु वर्तन्ते।**" पदाने केला गेला आहे. गुणांत आपली स्थिती समजून पुरुष (चेतन) सुखी दुःखी होत राहतो. वास्तविक पाहता सुखदुःखाची वेगळी सत्ता नाही. म्हणून भगवान् गुणाशी मानलेल्या संबंधाचा विच्छेद करण्यावर विशेष भर देत आहेत.

तात्त्विक दृष्टिने पाहिले असता संबंध-विच्छेद पूर्वी-पासूनच (कायमचा) आहे. केवळ अज्ञानाने संबंध मानलेला आहे. म्हणून मानलेल्या संबंधाचा अस्विकार करून केवळ "गुणच गुणांत वर्तन करीत आहेत" या वास्तविकतेला

ओळखावयाचे आहे.

**इति मत्वा न सज्जते**—या ठिकाणी "**मत्वा**" पद "जाणणे" च्या अर्थाने आलेले आहे. तत्त्वज्ञ महापुरुष प्रकृती (जड) आणि पुरुष (चेतन) यांना स्वाभाविकपणे निरनिराळे आहेत असे जाणतात. म्हणून ते प्रकृतिजन्य गुणांमध्ये आसक्त होत नाहीत.

भगवान् "**मत्वा**" पदाचा प्रयोग करून जणू साधकांना ही आज्ञा करतात की, त्यांनीसुद्धा प्रकृतिजन्य गुणांना निराळे समजून त्यांच्या ठिकाणी आसक्त होऊ नये.

## विशेष गोष्ट

कर्मयोगी आणि सांख्ययोगी यांची साधन प्रणाली एक नसते. कर्मयोगी गुणांशी (शरीरादी) मानलेल्या ऐक्याला नाहीसे करण्याचा प्रयत्न करीत असतो. म्हणून श्रीमद्भागवतामध्ये "**कर्मयोगस्तु कामिनाम्**" (११।२०।७) म्हटले गेले आहे. म्हणूनच भगवंतांनीसुद्धा कर्मयोग्यासाठी कर्म करण्याच्या आवश्यकतेवर विशेष भर दिला आहे. जसे "कर्माचा आरंभ केल्याशिवाय मनुष्य नैष्कर्म्यतेला प्राप्त होत नाही" (३।४). योगारूढ होऊ इच्छिणाऱ्या मननशील पुरुषासाठी कर्म करणेच कारण म्हटले जाते. (६।३) कर्मयोगी तर कर्म करीत असतो. परंतु ते आपल्यासाठी नव्हे तर दुसऱ्याच्या हितासाठीच करीत असतो. म्हणून तो त्या कर्माचा भोक्ता होत नाही. भोक्ता न झाल्याने अर्थात् भोक्तृत्व नष्ट झाल्याने कर्तृत्वाचा नाश आपोआप होतो. तात्पर्य कर्तृत्वामध्ये जो कर्तेपणा आहे तो फलासाठीच आहे. फलाचा उद्देश नसेल तर कर्तृत्व राहत नाही. म्हणून वास्तविक कर्मयोगीसुद्धा कर्ता होत नाही.

सांख्ययोग्याच्या ठिकाणी विवेक-विचाराचे प्राधान्य असते. तो "प्रकृतिजन्य गुणच गुणांत वर्तन करीत आहेत" असे समजून स्वत:ला त्या क्रियांचा कर्ता मानत नाही. हीच गोष्ट भगवान् पुढे तेराव्या अध्यायाच्या एकोणतीसाव्या श्लोकात सांगतील की, जो पुरुष संपूर्ण कर्मांना सर्व प्रकारे प्रकृतीद्वाराच केली जात आहेत असे पाहतो आणि "स्व" (आत्मा) ला अकर्ता समजतो, तोच यथार्थपणे पाहत असतो. अशा प्रकारे सांख्ययोगी कर्तृत्वाचा नाश करतो. कर्तृत्वाचा नाश झाल्याने भोक्तृत्वाचा नाश आपोआप होतो.

तीसऱ्या अध्यायाच्या आरंभीच भगवंतांनी अनेक उदाहरणातून आणि दृष्टिकोनातून कर्म करण्यावरच भर दिला आहे. जसे—जनकादी महापुरुषसुद्धा निष्कामभावाने कर्म करूनच परम सिद्धीला प्राप्त झाले आहेत (३।२०), "मी-सुद्धा कर्म करीत असतो" (३।२२), "ज्ञानी पुरुषसुद्धा अज्ञानी पुरुषाप्रमाणे लोक संग्रहास्तव कर्म करीत असतात" (३।२५-२६). यावरुन सिद्ध होते की, प्रत्येक दृष्टिकोनातून कर्म करणेच श्रेयस्कर (कल्याणप्रद) आहे.

**परिशिष्ट भाव**—जो अहंकाराने मोहित होत नाही, तो 'तत्त्ववित्' असतो. या तत्त्ववित्तालाच दुसऱ्या अध्यायाच्या सोळाव्या श्लोकात 'तत्त्वदर्शी' म्हटले आहे. तत्त्ववित् गुणविभाग आणि कर्मविभाग यापासून अर्थात् पदार्थ आणि क्रिया यापासून सर्वथा अतीत होतो.

जोपर्यंत साधकाचा संसाराशी संबंध राहील तोपर्यंत तो 'तत्त्ववित्' होऊ शकत नाही. कारण संसाराशी संबंध ठेवून कोणी संसाराला जाणूच शकत नाही. संसारापासून वेगळे झाल्यावरच संसाराला जाणू शकतात—हा नियम आहे. त्याचप्रमाणे परमात्म्याशी वेगळे होऊन कोणी परमात्म्याला जाणूच शकत नाही. परमात्म्याशी एक होऊन च परमात्म्याला जाणू शकतात—हा नियम आहे. कारण असे आहे की, वास्तविक आपण संसारापासून वेगळे आहोत आणि परमात्म्याशी एक आहोत. शरीराचे संसाराशी ऐक्य आहे, आपले (स्वयंचे) परमात्म्याशी ऐक्य आहे.

**प्रकृतेर्गुणसम्मूढाः सज्जन्ते गुणकर्मसु।**
**तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥२९॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **प्रकृतेः** | = प्रकृतिजन्य | **सज्जन्ते** | = आसक्त राहतात. | | अज्ञान्यांना |
| **गुणसम्मूढाः** | = गुणांनी अत्यंत मोहित झालेले अज्ञानी मनुष्य | **तान्** | = त्या | **कृत्स्नवित्** | = पूर्णत्वाने जाणणाऱ्या ज्ञानी मनुष्याने |
| | | **अकृत्स्नविदः** | = पूर्णत्वाने न समजणाऱ्या | **न, विचालयेत्** | = विचलित करू नये. |
| **गुणकर्मसु** | = गुण आणि कर्म यांत | **मन्दान्** | = मंदबुद्धी | | |

*व्याख्या*—**प्रकृतेर्गुणसम्मूढाः सज्जन्ते गुणकर्मसु**—सत्त्व, रज आणि तम हे तिन्ही प्रकृतिजन्य गुण मनुष्याला बांधणारे आहेत. सत्त्वगुण सुख आणि ज्ञानाच्या आसक्तीने, रजोगुण कर्माच्या आसक्तीने आणि तमोगुण प्रमाद, आळस

तसेच निद्रा यांनी मनुष्याला बांधत असतात. (१४। ६-८) उपर्युक्त पदांमध्ये त्या अज्ञानी लोकांचे वर्णन आले आहे की, जे प्रकृतिजन्य गुणांनी अत्यंत मोहित अर्थात् बांधलेले आहेत परंतु ज्यांचा शास्त्राविषयी, शास्त्रविहित शुभ कर्माविषयी तसेच कर्माच्या फलाविषयी श्रद्धा-विश्वास आहे. याच अध्यायाच्या पंचवीसाव्या-सव्वीसाव्या श्लोकात अशा अज्ञानी पुरुषांचे ''**सक्ताः, अविद्वांसः**'' आणि ''**कर्मसङ्गिनाम्, अज्ञानाम्**'' या पदांनी वर्णन केले आहे. लौकिक आणि पारलौकिक भोगांच्या कामनेमुळे हे पुरुष पदार्थ आणि कर्माविषयी आसक्त राहतात. या कारणाने ते याहून उन्नत होण्याविषयी समजू शकत नाहीत. म्हणूनच भगवंतांनी यांना अज्ञानी म्हटले आहे.

**तानकृत्स्नविदो मन्दान्**—अज्ञानी मनुष्य शुभकर्म तर करतात. परंतु नित्य निरंतर न राहणाऱ्या नाशवान् पदार्थांच्या प्राप्तीसाठी करतात. धनादी पदार्थांविषयी ते ममता ठेवतात आणि अप्राप्त पदार्थांची कामना करतात. अशाप्रकारे ममता आणि कामनेच्या बंधनात सापडल्यामुळे ते गुण (पदार्थ) आणि कर्माच्या तत्त्वाला पूर्णत्वाने जाणू शकत नाहीत.

अज्ञानी मनुष्य शास्त्रविहित कर्म आणि त्याची विधी यांना तर चांगल्या प्रकारे जाणतात. पण गुण आणि कर्माचे तत्त्व योग्य प्रकारे न जाणल्यामुळे त्यांना ''**अकृत्स्नविदः**'' (पूर्णत्वाने न जाणणारे) म्हटले गेले आहे आणि सांसारिक भोग आणि संग्रहाविषयी रुची असल्याकारणाने त्यांना ''**मन्दान्**'' (मन्दबुद्धी) म्हटले गेले आहे.

**कृत्स्नविन्न विचालयेत्**—गुण आणि कर्म-विभाग यांना पूर्णत्वाने जाणणारे तसेच कामना-ममतारहित ज्ञानी पुरुषांनी पूर्वी वर्णन केलेल्या (सकामभावनेने शुभ-कर्माविषयी रत असलेल्या) अज्ञानी पुरुषांना शुभ-कर्मापासून विचलित करू नये की, ज्यामुळे ते मंदबुद्धी अज्ञानी पुरुष त्यांच्या वर्तमान स्थितीहून खाली येऊ नयेत. याच अध्यायाच्या पंचवीसाव्या आणि सव्वीसाव्या श्लोकामध्ये अशा प्रकारच्या ज्ञानी पुरुषांचे ''**असक्तः, विद्वान्**'' आणि ''**युक्तः, विद्वान्**'' अशा पदांनी वर्णन झाले आहे.

भगवंतांनी तत्त्वज्ञ महापुरुषांना पंचवीसाव्या श्लोकात ''**कुर्यात्**'' पदाने स्वतः कर्म करण्याविषयी तसेच सव्वीसाव्या श्लोकात ''**जोषयेत्**'' पदाने अज्ञानी पुरुषाकडून-सुद्धा तसेच कर्म करवून घेण्याविषयी आज्ञा केली होती. परंतु या ठिकाणी भगवंतांनी ''**न विचालयेत्**'' पदांनी तशी आज्ञा न देता जणू त्यामध्ये थोडी शिथिलता दिली आहे की, ज्ञानी पुरुषांनी जास्त नाही झाले तर कमीत कमी आपले संकेत, वचन आणि क्रियेने अज्ञानी पुरुषांना विचलित करू नये. कारण जीवन्मुक्त महापुरुषावर भगवंत आणि शास्त्र आपले शासन ठेवीत नाहीत. त्यांच्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीराकडून आपोआप स्वाभाविकच लोकसंग्रहार्थ क्रिया होत राहतात.*

तत्त्वज्ञ महापुरुष कर्मयोगी असो अथवा ज्ञानयोगी—संपूर्ण कर्म करीत असतानासुद्धा त्याचा कर्माशी आणि पदार्थाशी कोणत्याही प्रकारचा संबंध सहज राहत नाही, जो वास्तविक पूर्वीपासूनच नव्हता.

अज्ञानी मनुष्य स्वर्गप्राप्तीसाठी शुभ कर्म करीत असतात. म्हणून भगवंतांनी अशा मनुष्यांना विचलित न करण्याविषयी आज्ञा दिली आहे अर्थात् त्या महापुरुषांनी आपले संकेत, वचन आणि क्रियेतून अशी कोणतीही गोष्ट प्रकट करू नये ज्यामुळे त्या सकामी पुरुषांची शास्त्रविहित शुभ कर्माविषयी अश्रद्धा, अविश्वास, अथवा नावड उत्पन्न होईल आणि ते त्या शुभ कर्माचा त्याग करतील. कारण असे केल्याने त्यांचे पतन होऊ शकते. म्हणून अशा पुरुषांना सकामभावनेपासून विचलित करावे. परंतु शास्त्रीय कर्मापासून नव्हे. जन्म-मरणरूपी बंधनातून सोडविण्यासाठी त्यांना सकामभावनेतून विचलित करणे उचितही आहे आणि आवश्यक सुद्धा आहे.

**परिशिष्ट भाव**—अर्जुनाचा प्रश्न होता की, मला घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात? त्या प्रश्नाचे उत्तर भगवान् अनेक प्रकाराने देतात, ज्याचे तात्पर्य असे आहे की, माझा उद्देश घोर कर्मात प्रवृत्त करण्याचा नाही, तर कर्मांशी संबंध-विच्छेद करण्याचा आहे. कर्मांशी संबंध-विच्छेद करण्यासाठीच कर्मयोग आहे.

***संबंध**—ज्यामुळे मनुष्य कर्मामध्ये फसतो त्या कर्म आणि कर्मफलाच्या आसक्तीपासून सुटका होण्यासाठी काय केले पाहिजे—याचे विवेचन भगवान् पुढील श्लोकात करतात.*

---

* क्रिया आणि कर्म—या दोन्हीमध्ये देखील फरक आहे. क्रियेबरोबर जेव्हा ''मी कर्ता आहे'' असा अहंभाव राहतो तेव्हा ती क्रिया ''कर्म'' होत असते आणि त्याचे इष्ट, अनिष्ट आणि मिश्रित—तीन प्रकारचे फळ मिळत असते (१८। १२). परंतु जेव्हा ''मी कर्ता नाही'' असा भाव राहतो तेव्हा ती क्रिया कर्म होत नाही. अर्थात् फलदायक होत नाही. तत्त्वज्ञ महापुरुषाकडून फलदायक कर्म होत नाहीत तर केवळ क्रिया (प्रयत्न) होत असतात (३। ३३)

# मयि सर्वाणि कर्माणि सन्न्यस्याध्यात्मचेतसा।
# निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः॥ ३०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अध्यात्मचेतसा** | = (तू) विवेकयुक्त बुद्धिद्वारा | **मयि** | = मला | **विगतज्वरः** | = संतापरहित |
| **सर्वाणि** | = संपूर्ण | **सन्न्यस्य** | = अर्पण करून | **भूत्वा** | = होऊन |
| **कर्माणि** | = कर्तव्यकर्मांना | **निराशीः** | = कामनारहित, | **युध्यस्व** | = युद्धरूपी कर्तव्य-कर्म कर. |
| | | **निर्ममः** | = ममतारहित (आणि) | | |

*व्याख्या*— **मयि सर्वाणि कर्माणि सन्न्यस्याध्यात्मचेतसा**—बहुतेक साधकांची अशी धारणा असते की, कर्मापासून बंधन होते आणि कर्मावाचून कोणी राहू शकत नाही. म्हणून कर्म करण्याने तर मी बांधला जाईल. तर मग कर्म कसे केले पाहिजे की, ज्यामुळे कर्म बंधनकारक होणार नाही तर मुक्तिदायक होईल. यासाठी भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तू अध्यात्मचित्ताने (विवेक-विचारयुक्त अंतः-करणाने) संपूर्ण कर्तव्यकर्मांना मला अर्पण कर अर्थात् त्यांच्याशी आपला कोणताच संबंध मानू नको. कारण वास्तविक पाहता संपूर्ण संसाराच्या क्रियेमध्ये केवळ माझी शक्तीच काम करीत आहे. शरीर, इंद्रिये, पदार्थ इत्यादीसुद्धा माझे आहेत आणि शक्तीसुद्धा माझी आहे. म्हणून ''सर्व काही भगवंताचे आहे आणि भगवान् आपले आहेत'' असा गंभीरतापूर्वक विचार करून जेव्हा तू कर्तव्यकर्म करशील तेव्हा ते कर्म तुला बंधनकारक होणार नाहीत, उलट उद्धार करणारे होतील.

शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ इत्यादीवर आपला कोणताच अधिकार चालत नाही—हा सर्व माणसांचा अनुभव आहे. हे सर्व प्रकृतीचे आहेत. ''**प्रकृतिस्थानि**'' आणि ''स्व'' परमात्म्याचा अंश आहे—''**ममैवांशो जीवलोके**'' (१५।७) म्हणून शरीरादी पदार्थांमध्ये अज्ञानाने मानलेल्या आपलेपणाला दूर करून त्यांना भगवंताचेच समजणे (जे वास्तविक भगवंताचेच आहेत) त्याला ''अर्पण'' म्हणतात. म्हणून आपल्या विवेकाला महत्त्व देऊन पदार्थ आणि कर्म ह्याच्याशी मूर्खपणाने मानलेल्या संबंधाचा त्याग करणे हेच अर्पण करण्याचे तात्पर्य आहे.

**अध्यात्मचेतसा**—या पदातून भगवंताचे हे तात्पर्य आहे की, कोणत्याही मार्गाचा साधक असो त्याचा उद्देश अध्यात्मिक असावा, लौकिक नव्हे. वास्तविक उद्देश अथवा आवश्यकता नेहमी नित्यतत्त्वाची (अध्यात्मिक) असते आणि कामना नेहमी अनित्य तत्त्वाची (उत्पत्ति-विनाशशील वस्तू) असते. साधकात उद्देश असला पाहिजे कामना नव्हे. उद्देशयुक्त अंतःकरण विवेक-विचारयुक्तच असते.

दार्शनिक अथवा वैज्ञानिक, कोणत्याही दृष्टिकोनातून पाहिले असता शरीरादी भौतिक पदार्थ आपले आहेत असे सिद्ध होऊ शकत नाहीत. वास्तविक हे पदार्थ आपले आणि आपल्यासाठी नाहीतच तर केवळ सदुपयोग करण्यासाठीच मिळालेले आहेत. आपले नसल्यानेच यांच्यावर कोणाचेही अधिपत्य चालत नाही.

संपूर्ण संसार परमात्म्याचा आहे परंतु जीव अज्ञानाने परमात्म्याच्या वस्तूला आपली समजतो आणि म्हणूनच बंधनात सापडतो. म्हणून विवेक-विचाराने या अज्ञानाला नाहीसे करून संपूर्ण पदार्थांना आणि कर्मांना अध्यात्मतत्त्वाचे (परमात्म्याचे) समजून स्वीकार करणे हेच अध्यात्मचित्ताच्या योगाने पदार्थ व कर्माचे अर्पण करणे होय.

या श्लोकात ''**अध्यात्मचेतसा**'' पद प्रामुख्याने आले आहे. तात्पर्य अविवेकानेच उत्पत्ति-विनाशशील शरीर (संसार) आपले वाटते. जर विवेक-विचारपूर्वक पाहिले तर शरीर अथवा संसार आपले वाटणार नाही. उलट एक अविनाशी परमात्मतत्त्वच आपले वाटेल. संसाराला आपले समजणेच पतन आहे आणि आपले न समजणेच उत्थान आहे.

**द्व्यक्षरस्तु भवेन्मृत्युस्त्र्यक्षरं ब्रह्म शाश्वतम्।**
**ममेति च भवेन्मृत्युर्न ममेति च शाश्वतम्॥**

(महा० शांति १३।४ आश्वमेधिक० ५१।२९)

दोन अक्षरांचे ''**मम**'' (हे माझे आहे असा भाव) मृत्यू आहे आणि तीन अक्षरांचे ''**न मम**'' (हे माझे नाही असा भाव) अमृत-सनातन ब्रह्म आहे.

## अर्पणसंबंधी विशेष संकेत

भगवंतांनी ''**मयि सर्वाणि कर्माणि सन्न्यस्य**'' पदांनी संपूर्ण कर्मांना अर्पण करण्याविषयी यासाठी म्हटले आहे की, मनुष्याने करण (शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण), उपकरण (कर्म करण्यात उपयोगी सामुग्री) तसेच क्रियांना अज्ञानाने आपले आणि आपल्यासाठी समजले, जे केव्हाही त्याचे नव्हते, नाहीत, होणार नाहीत आणि होऊही शकत नाहीत. उत्पत्ति-विनाश पावणाऱ्या वस्तूशी आविनाशीचा

काय संबंध? म्हणून कर्मांना, मग संसाराला अर्पण करा अथवा प्रकृतीला अर्पण करा अथवा भगवंताला अर्पण करा. तिन्हींचा परिणाम एकच होईल. कारण संसार प्रकृतीचे कार्य आहे आणि भगवान् प्रकृतीचे स्वामी आहेत. या दृष्टीने संसार आणि प्रकृती दोन्ही भगवंताचे आहेत. म्हणून ''मी भगवंताचा आहे आणि माझ्या म्हणविल्या जाणाऱ्या सर्व वस्तू भगवंताच्या आहेत'' अशा प्रकारे सर्व काही भगवंताला अर्पण केले पाहिजे अर्थात् आपली ममता काढून घेतली पाहिजे. असे केल्याने मग साधकाला संसार अथवा भगवंतापासून काही अपेक्षाच राहत नाही. कारण जे त्याला पाहिजे असते त्याची व्यवस्था भगवान् स्वत: करीत असतात. अर्पण केल्यानंतर मग शरीरादी पदार्थ आपले वाटावयास नको. जर ते आपले वाटत असतील तर वास्तविक दृष्टीने ते अर्पण झालेच नाहीत. म्हणूनच भगवंतांनी विवेक-विचारयुक्त चित्ताने अर्पण करण्यासाठी म्हटले आहे ज्यामुळे ही वास्तविकता योग्य प्रकारे समजली जावी की, हे पदार्थ भगवंताचेच आहेत आपले मुळीच नाहीत.

भगवंताला अर्पण करण्याची गोष्ट अशी विलक्षण आहे की, कोणत्याही प्रकारे (वैतागूनसुद्धा) अर्पण केले गेले तरीही लाभच लाभ आहे. कारण कर्म आणि वस्तू आपले नाहीतच. कर्मांना केल्यानंतर देखील त्यांचे अर्पण केले जाऊ शकते, परंतु वास्तविक अर्पण, पदार्थ आणि कर्माशी संबंध-विच्छेद झाल्यावरच होते. जेव्हा ही गोष्ट योग्य प्रकाराने अनुभवामध्ये उतरेल की, करण (शरीरादी) उपकरण (सांसरिक पदार्थ) कर्म आणि ''स्व''—हे सर्व भगवंताचेच आहेत तेव्हाच पदार्थ आणि कर्माशी संबंध-विच्छेद होतो. साधकाकडून बहुतेक अशी चूक होत असते की, तो उपकरणांना तर भगवंताचे समजण्याविषयी प्रयत्नशील असतो परंतु ''करण'' तसेच ''स्व'' सुद्धा भगवंताचेच आहेत याकडे लक्ष देत नाही. म्हणूनच त्याचे अर्पण अर्धवट होते. म्हणून साधकांनी करण, उपकरण, क्रिया आणि ''स्व'' सर्वांना एकमात्र भगवंताचेच समजले पाहिजे, जे वास्तविक त्यांचेच आहेत.

कर्म आणि पदार्थांचा स्वरूपाने त्याग करणे अर्पण नव्हे. भगवंताच्या वस्तूला भगवंताचीच समजणे वास्तविक अर्पण आहे. जो मनुष्य वस्तूंना आपली समजून भगवंताना अर्पण करतो त्याच्या मोबदल्यात भगवान् पुष्कळ वस्तू देतात. जसे पृथ्वीत जितके बी पेरले जाईल त्याच्या कितीतरी पटीने अधिक अन्न पृथ्वी देते. परंतु अधिक पटीने मिळूनही ते सीमितच मिळत असते. परंतु जो वस्तूला आपली न समजता (भगवंताचीच समजून) भगवंताला अर्पण करतो, भगवंत त्याला स्वत:ला देऊन टाकतात आणि ऋणीही होतात. तात्पर्य वस्तूला आपली समजून देण्याने (अंत:करणात वस्तूचे महत्त्व असल्याने) त्या वस्तूचे मूल्य वस्तूतच मिळते आणि आपली न समजता देण्याने स्वत: भगवान् मिळतात.

वास्तविक अर्पणाने भगवंत अत्यंत प्रसन्न होतात. याचा अर्थ असा नाही की, अर्पण केल्याने भगवंताला काही मदत होते. परंतु अर्पण करणारा कर्म-बंधनातून मुक्त होतो आणि यातच भगवंताची प्रसन्नता आहे. जसे एखादा लहान बालक अंगणामध्ये पडलेली चावी (किल्ली) पित्याला देतो तेव्हा पिता प्रसन्न होतो पण वास्तविक पाहता लहान बालकही पित्याचा आहे, अंगणसुद्धा पित्याचे आहे आणि किल्लीही पित्याचीच आहे परंतु वास्तविक पिता किल्ली मिळाल्याने प्रसन्न होत नाहीत तर बालकाचा (देण्याचा) भाव पाहून प्रसन्न होतात आणि हात उंचावून बालकाला म्हणतात की, तू खूप मोठा होवोस अर्थात् आपल्याहून मोठा होण्याची आशिर्वादात्मक अपेक्षा करतात. त्याचप्रमाणे संपूर्ण पदार्थ, शरीर तसेच शरीरी (स्व) भगवंताचेच आहेत म्हणून त्यांच्याविषयी असलेला आपलेपणा काढून घेऊन ते भगवंतांना अर्पण करण्याचा भाव पाहूनच भगवान् प्रसन्न होतात आणि त्याचे ऋणी होतात.

## कामनासंबंधी विशेष संकेत

परमात्म्याने मनुष्याच्या शरीराची रचना मोठ्या विलक्षण रीतीने केली आहे. मनुष्याच्या जीवननिर्वाह आणि साधनासाठी जी जी आवश्यक साधन सामुग्री आहे ती त्याला भरपूर प्रमाणात उपलब्ध झालेली आहे. त्यामध्ये भगवत्प्रदत्त विवेकसुद्धा विद्यमान आहे. त्या विवेकाला महत्त्व न देता जेव्हा मनुष्य प्राप्त वस्तूंचा योग्य तो उपयोग करीत नाही, उलट त्यांना आपले समजून आपल्यासाठीच त्यांचा उपयोग करतो तसेच प्राप्त वस्तूविषयी ममता आणि अप्राप्त वस्तूविषयी कामना करू लागतो तेव्हा तो जन्म-मरणाच्या बंधनात बांधला जातो. वर्तमानसमयी ज्या वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, घटना, योग्यता, शक्ती, शरीर, इंद्रिये, मन, प्राण, बुद्धी इत्यादी मिळालेले दिसतात, त्या पूर्वीही आपल्याजवळ नव्हत्या आणि नंतरही नेहमी आपल्याजवळ राहणार नाहीत. कारण त्या कधीही एकरूप राहत नाहीत, क्षणाक्षणाला बदलत राहतात, या वास्तविकतेला मनुष्य जाणतो. जर मनुष्याने जसे जाणले तसेच मानले आणि तसेच आचरण केले तर त्याचा उद्धार होईल यात किंचित देखील संशय नाही. जसे जाणतो तसे मानण्याचे तात्पर्य असे आहे की, शरीरादी पदार्थांना आपले व आपल्यासाठी न मानणे, त्यांच्या आश्रित न राहणे आणि त्यांना महत्त्व देऊन त्यांची पराधीनता न स्वीकारणे. पदार्थांना महत्त्व

देणे ही फार मोठी चूक आहे. त्यांच्या प्राप्तीत आपणास कृतार्थ समजणे फार मोठे बंधन आहे. नाशवान पदार्थांना महत्त्व दिल्यामुळेच त्याविषयी नव-नवीन कामना उत्पन्न होतात. कामना संपूर्ण पाप, ताप, दुःख, अनर्थ, नरक इत्यादींचे मूळ आहे. कामनेने पदार्थ मिळत नाहीत आणि प्रारब्धवशात मिळाले तरी ते टिकत नाहीत. कारण पदार्थ येणारे जाणारे आहेत आणि ''स्व'' नेहमी राहणारा आहे. म्हणून कामनेचा त्याग करून मनुष्याने कर्तव्यकर्माचे पालन केले पाहिजे.

या ठिकाणी अशी शंका होऊ शकते की, कामने-शिवाय कर्मामध्ये प्रवृत्ती कशी होईल? याचे समाधान असे आहे की, कामनेची पूर्ती आणि निवृत्ती—दोन्हीसाठी कर्मामध्ये प्रवृत्ती होत असते. साधारण मनुष्य कामनेच्या पूर्तीसाठी कर्मामध्ये प्रवृत्त होतात आणि साधक आत्मशुद्धीच्या हेतूने कामनेच्या निवृत्तीसाठी कर्मात प्रवृत्त होतात. (५।११) वास्तविक पाहिले तर कर्मामध्ये प्रवृत्ती कामनेच्या निवृत्तीसाठीच आहे, कामनेच्या पूर्तीसाठी नव्हे.

मनुष्यशरीर उद्देश पूर्तीसाठीच मिळालेले आहे. उद्देशाची पूर्ती झाल्यास मग काहीही करावयाचे शिल्लक राहत नाही. जी माणसें आपल्या वास्तविक उद्देशाला विसरली आहेत (नित्यतत्त्व परमात्म्याची प्राप्ती) तीच कामना पूर्तीसाठी कर्मामध्ये प्रवृत्त होतात. अशा माणसांना भगवंतांनी ''कृपण'' (दीन अथवा दयेचा पात्र) म्हटले आहे—''**कृपणाः फलहेतवः**'' (२।४९) या उलट जी माणसे उद्देशाला समोर ठेवून (कामनेच्या निवृत्तीसाठी) कर्मामध्ये प्रवृत्त होतात त्यांना भगवंतांनी ''मनीषी'' (बुद्धिमान अथवा ज्ञानी) म्हटले आहे—''**फलं त्यक्त्वा मनीषिणः**'' (२।५१) सेवा, स्वरूप-बोध आणि भगवत्प्राप्तीचा भाव उद्देश आहे, कामना नव्हे. नाशवान पदार्थाच्या प्राप्तीचा भावच कामना आहे. म्हणून कामनेवाचून कर्मामध्ये प्रवृत्ती होत नाही असे समजणे चूक आहे. उद्देशाच्या पूर्तीसाठीही कर्म सुयोग्य रीतीने होत असतात.

आपल्या अंशी परमात्म्यापासून विमुख होऊन संसाराशी (जडता) आपला संबंध समजल्यानेच आवश्यकता आणि कामना—दोन्हींची उत्पत्ती होत असते. संसाराशी मानलेल्या संबंधाचा संपूर्णपणे त्याग झाल्यास आवश्यकतेची पूर्ती आणि कामनेची निवृत्ती होत असते.

**निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः**—संपूर्ण कर्म आणि पदार्थांना (कर्मसामुग्री) भगवदर्पण केल्यानंतरही कामना, ममता आणि संताप यांचा काही अंश शिल्लक राहू शकतो. उदाहरणार्थ—आम्ही एखाद्याला पुस्तक दिले. तो ते पुस्तक वाचत असताना त्याला पाहून आमच्या मनात असा भाव येतो की, तो माझे पुस्तक वाचत आहे. हीच अंशिक ममता आहे. जी पुस्तक अर्पण केल्यावरही शिल्लक राहते. या अंशाचा त्याग करण्यासाठी भगवान् अर्जुनाला म्हणतात की, तू नवीन वस्तूची ''कामना'' करू नको, प्राप्त वस्तूविषयी ''ममता'' करू नको आणि नष्ट झालेल्या वस्तूविषयी ''संताप'' करू नको. सर्व काही मला अर्पण करण्याची कसोटी ही आहे की, कामना, ममता आणि संतापाचा अंशसुद्धा राहू नये.

ज्या साधकांचे ठिकाणी सर्व काही भगवदर्पण केल्यानंतर सुद्धा पूर्व संस्कारामुळे शरीरादी पदार्थाविषयी कामना, ममता तथा संताप दिसून येतात, त्यांनी कधीही निराश होऊ नये. कारण ज्याचे ठिकाणी कामना दिसते तोच कामनारहित होतो ज्याचे ठिकाणी ममता दिसते तोच ममतारहित होतो आणि ज्याचे ठिकाणी संताप दिसून येतो तोच संतापरहित होतो. त्याचप्रमाणे जो देहाला ''अहम्'' (मी) समजतो तोच विदेही (अहंतारहित) होतो. म्हणून मनुष्यच कामना, ममता आणि संताप-रहित होण्याचा पूर्ण अधिकारी आहे.

गीतेत ''**ज्वर**'' शब्द केवळ याच ठिकाणी आला आहे. युद्धात कौटुंबिक स्नेह इत्यादीने संताप होण्याची शक्यता असते. म्हणून युद्धरूप कर्तव्यकर्म करीत असताना विशेष सावधान राहण्याविषयी भगवान् ''**विगतज्वरः**'' पद देऊन अर्जुनाला म्हणतात की, तू संतापरहित होऊन युद्धरूप कर्तव्यकर्म कर.

अर्जुनाच्या समोर युद्धाच्या रूपात कर्तव्यकर्म होते. म्हणून भगवान् ''**युध्यस्व**'' पदाने त्यांना युद्ध करण्याची आज्ञा देतात. यात भगवंताचे तात्पर्य युद्ध करण्याशी नाही तर कर्तव्य-कर्म करण्याशी आहे. म्हणून वेळोवेळी जे कर्तव्यकर्म प्राप्त होईल त्याला साधकाने निष्काम, निर्मम, तसेच निःसंताप होऊन भगवदर्पण बुद्धीने करावे. त्याच्या परिणामाकडे (सिद्धी अथवा असिद्धी) लक्ष देऊ नये. सिद्धी-असिद्धी, अनुकूलता, प्रतिकूलता इत्यादीमध्ये सम राहणे ''विगतज्वर'' होणे होय. कारण अनुकूलतेने होणारी प्रसन्नता आणि प्रतिकूलतेने होणारी उद्विग्नता—दोन्हीही ज्वर (संताप) आहेत. राग-द्वेष, हर्ष-शोक, काम-क्रोध इत्यादी विकारसुद्धा ज्वर आहेत. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे राग-द्वेष, चिंता, उद्वेग, चलबिचल इत्यादी जेवढ्या काही मानसिक विकृती (विकार) आहेत त्या सर्व ज्वर आहेत आणि त्यांच्यापासून रहित होणेच ''विगतज्वरः'' पदाचे तात्पर्य आहे.

## विशेष गोष्ट

जेव्हा साधकाचा एकमेव उद्देश परमात्मप्राप्तीचा होतो तेव्हा त्याच्याजवळ जी काही सामुग्री (वस्तू, परिस्थिती

इत्यादी) असते ती सर्व साधनरूप (साधन सामुग्री) होत असते. मग त्या सामुग्रीमध्ये उत्कृष्ट आणि निकृष्ट असे दोन भाग नसतात. म्हणूनच सामुग्री जी आहे जशी आहे, तीच आणि तशीच भगवंताला अर्पण करावयाची आहे. भगवंतांनी जसे दिले आहे तसेच त्यांना परत करावयाचे आहे.

संपूर्ण कर्मांना भगवंताला अर्पण केल्यावरसुद्धा आपल्यात जी कामना, ममता आणि संताप दिसून येतो त्यांनाही भगवंताला अर्पण करावयाचे आहे. भगवंताला अर्पण केल्याने तो भगवन्निष्ठ होतो.

योगारूढ होण्यामध्ये कर्म करणेच कारण म्हटले जाते—''**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते**'' (६।३) कारण कर्तव्यकर्म करण्यानेच साधकाला आपल्यामध्ये कोणत्या गोष्टीची आणि कोठे कमी आहे (कामना, ममता इत्यादी)* याचा पत्ता लागतो. म्हणूनच बाराव्या अध्यायाच्या बाराव्या श्लोकात ध्यानापेक्षा कर्मफलत्यागा (कर्मयोग) ला श्रेष्ठ म्हटले गेले आहे. कारण ध्यानात साधकाची दृष्टी विशेषत्वेने मनाच्या चंचलतेकडेच असते आणि तो केवळ ध्येयामध्ये मन लागल्यावरुन ध्यानाची सफलता मानतो. परंतु मनाच्या चंचलतेव्यतिरिक्त दुसऱ्या उणीवांकडे (कामना, ममता इत्यादी) त्याची दृष्टी जेव्हा तो कर्म करतो तेव्हाच जाते. म्हणून भगवान् प्रस्तुत श्लोकात ''**युध्यस्व**'' पदाने कर्तव्य- कर्म करण्याची आज्ञा देत आहेत.

ज्याप्रमाणे दुसऱ्या अध्यायाच्या अठ्ठेचाळीसाव्या श्लोकामध्ये भगवंतांनी सिद्धी-असिद्धीत सम राहून कर्तव्य कर्म करण्याची आज्ञा दिली होती त्याप्रमाणे या ठिकाणी (तीसाव्या श्लोकात) निष्काम, निर्मम आणि नि:संताप होऊन युद्ध अर्थात् कर्तव्यकर्म करण्याची आज्ञा देत आहेत. जर युद्धासारखे घोर (क्रूर) कर्मसुद्धा समभावाने केले जाऊ शकते तर असे दुसरे कोणते कर्म आहे जे समभावाने केले जाऊ शकणार नाही? जेव्हा ''शरीर मी नाही, माझे नाही आणि माझ्यासाठी नाही'' असा भाव होतो तेव्हाच समभाव होतो जो वास्तविक असतो.

जेव्हा साधकाचा उद्देश संसाराविषयी न राहता केवळ परमात्मप्राप्तीचा होतो तेव्हाच कर्तव्यकर्माचे पालन होणे शक्य आहे. परमात्मप्राप्तीच्या उद्देशाने साधक जसा जसा कर्तव्य परायण होत जातो तसे तसे त्याच्या ठिकाणी असलेले कामना, ममता, असक्ती इत्यादी दोष आपोआप नाहीसे होत जातात आणि त्याला समतेत आपल्या स्वाभाविक स्थितीचा अनुभव होत जातो. समतेत आपल्या स्थितीचा पूर्ण अनुभव झाल्यास कर्तेपणा संपूर्णपणे नष्ट होतो आणि उद्देशाशी एकता होते. आपल्यासाठी काहीही मिळविण्याची अथवा करण्याची इच्छा न राहिल्यास ''अहम्'' (व्यक्तित्व) आपोआप नष्ट होतो.

अर्जुन युद्धरूपी कर्तव्यकर्माला टाळून कल्याणाची इच्छा करत होते. म्हणून अर्जुनाने आपल्या कल्याणाविषयी विचारले असता भगवान् त्यांना युद्धरूपी कर्तव्यकर्म करण्याची आज्ञा देतात. कारण भगवंताचे मतानुसार कर्तव्यकर्म करण्याने अर्थात् कर्मयोगानेसुद्धा कल्याणाची प्राप्ती होते आणि ज्ञानयोग तसेच भक्तियोगानेही होते.

**परिशिष्ट भाव**—आत्तापर्यंत तर भगवंताने अर्जुनाच्या प्रश्नाचेच (मला घोर कर्मात का प्रवृत्त करीत आहात?) अनेक प्रकाराने उत्तर दिले. आता या श्लोकात भगवन्निष्ठेनुसार कर्म करण्याची विधी सांगतात.

संपूर्ण कर्म मला अर्पण कर—असे म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, क्रिया आणि पदार्थ यांना आपले आणि आपल्यासाठी न मानता माझे आणि माझ्यासाठीच मान. कारण भगवान् समग्र आहेत आणि संपूर्ण कर्म आणि पदार्थ (अधिभूत) समग्र भगवंताच्याच अंतर्गत आहेत (गीता—सातव्या अध्यायाचा एकोणतीसावा-तीसावा श्लोक). त्या समग्र भगवंतासाठीच येथे 'मयि' पद आले आहे.

या श्लोकात '**मयि सर्वाणि कर्माणि सन्न्यस्य**' पदांत भक्तियोगाचा, '**अध्यात्मचेतसा**' पदात ज्ञानयोगाचा आणि '**निराशीर्निर्ममो भूत्वा युद्धस्व विगतज्वर:**' पदांत कर्मयोगाचा विषय आला आहे.

***संबंध***—*पूर्व श्लोकात आपले मत (सिद्धांत) सांगून आता भगवान् पुढील दोन श्लोकात आपल्या मताची पुष्टी करतात.*

**ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवा:।**
**श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभि:॥ ३१॥**

---

* उदाहरणार्थ—एक व्यक्ती एखाद्या सेवा संस्थेमध्ये मन लावून सेवा कार्य करते. परंतु जेव्हा तिचा कोणी आदर केला अथवा तिला कोणी बक्षिस दिले तर तिला त्या सेवा कार्यात गोडी उत्पन्न होऊ शकते—हीच तिच्या मधील उणीव झाली. अशा उणीवांची जाणीव कर्म केल्यानंतरच होत असते.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **ये** | = जे | **मे** | = माझ्या | **अनुतिष्ठन्ति** | = अनुसरण करतात |
| **मानवाः** | = मनुष्य | **इदम्** | = या (पूर्व श्लोकात वर्णित) | **ते, अपि** | = तेही |
| **अनसूयन्तः** | = दोषदृष्टिरहित होऊन | **मतम्** | = मताचे | **कर्मभिः** | = कर्मबंधनातून |
| **श्रद्धावन्तः** | = श्रद्धेने | **नित्यम्** | = सदा | **मुच्यन्ते** | = मुक्त होतात. |

*व्याख्या*— **ये मे मतमिदं....श्रद्धावन्तोऽनसूयन्तो**— कोणत्याही वर्ण, आश्रम, धर्म, संप्रदाय, इत्यादींचा कोणताही मनुष्य जर कर्मबंधनातून मुक्त होऊ इच्छित असेल तर त्याने ह्या सिद्धांताला मानून त्याचे अनुकरण करावे. शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ, कर्म, इत्यादी आपले काहीही नाही या वास्तविकतेला समजून घेणारी सर्व माणसे कर्मबंधनातून मुक्त होतात.

भगवंत आणि त्यांच्या मतामध्ये प्रत्यक्षाप्रमाणे निःसंशय, दृढ विश्वास आणि पूज्य भावनेने युक्त असलेल्या मनुष्याला ''**श्रद्धावंतः**'' पदाने म्हटले आहे.

शरीरादी जड पदार्थांना आपले आणि आपल्यासाठी न समजल्यास मनुष्य मुक्त होतो. या वास्तविकतेवर श्रद्धा झाल्यास जडतेशी मानलेल्या संबंधाचा त्याग करणे सुलभ होते.

श्रद्धावान साधकच सत्-शास्त्र, सत्चर्चा आणि पारमार्थिक विषयाचे श्रवण करतो आणि त्यानुसार आचरण करतो.

मनुष्यशरीर परमात्मप्राप्तीसाठीच मिळाले आहे. म्हणून परमात्म्याच्या प्राप्तीची एकमात्र उत्कट अभिलाषा झाल्यास साधकाच्या ठिकाणी श्रद्धा, तत्परता इंद्रियांचा संयम इत्यादी गुण आपोआप येतात. म्हणून साधकाने प्रामुख्याने परमात्म-प्राप्तीची अभिलाषा तीव्र करावी.

मागील तीसाव्या श्लोकात भगवंतांनी आपले जे मत सांगितले आहे त्यात दोषदृष्टी न करण्याविषयी या ठिकाणी ''**अनसूयन्तः**'' पद दिले गेले आहे. गुणामध्ये दोष पाहण्याला ''असूया'' म्हणतात. असूयारहित मनुष्याला या ठिकाणी ''**अनसूयन्तः**'' म्हटले गेले आहे

ज्या ठिकाणी श्रद्धा असते त्या ठिकाणीही काही अंशात दोषदृष्टी राहू शकते. म्हणून भगवंतांनी ''**श्रद्धावन्तः**'' पदा-सोबत ''**अनसूयन्तः**'' पदसुद्धा देऊन मनुष्याला दोषदृष्टी यापासून संपूर्णपणे रहित (पूर्ण श्रद्धावान) होण्यास सांगितले आहे. अशा प्रकारे गीता श्रवणाचे माहात्म्य सांगतानासुद्धा भगवंतांनी ''**श्रद्धावाननसूयश्च**'' (१८।७१) पद देऊन श्रोत्यास श्रद्धायुक्त आणि दोषदृष्टिरहित होण्यास सांगितले आहे.

भगवंताचे मत तर उत्तम आहे. परंतु भगवान् किती आत्मस्तुतीची आणि अभिमानाची गोष्ट सांगत आहेत की, ''सर्व काही मलाच अर्पण करून टाका'' अथवा ''हे मत तर चांगले आहे परंतु कर्माद्वारे भगवत्प्राप्ती कशी होऊ शकते? कर्म तर जड आणि बंधनकारक असतात'' इत्यादी इत्यादी भाव येणे हेच भगवंताच्या मतात दोषदृष्टी करणे आहे. साधकांनी भगवान् आणि त्यांचे मत या दोन्ही विषयीही दोषदृष्टी ठेवता कामा नये.

वास्तविक पाहिले तर सर्व काही भगवंताचेच आहे. परंतु मनुष्य अज्ञानाने भगवंताच्या वस्तूंना आपल्या समजून बांधला जातो आणि ममता-कामनेला वश होऊन दुःख भोगत राहतो. म्हणून ह्या आपलेपणाचा त्याग करवून मनुष्याचा उद्धार करण्यासाठी (तो कायमचा सुखी व्हावा) भगवंत आपल्या सहज करुणेने सर्व काही आपल्याला अर्पण करण्याविषयी म्हणत आहेत. म्हणून या विषयात दोषदृष्टी ठेवणे अनुचित आहे. हे तर भगवंताचे परम सौहार्द, कारुण्य, वात्सल्यच आहे की, त्यांच्याठिकाणी कोणतीही अपूर्णता (उणीव) आणि आवश्यकता नसतानाही केवळ मनुष्याच्या कल्याणासाठी ते संपूर्ण कर्मांना त्यांना अर्पण करण्याविषयी म्हणत आहेत.

भगवंताचे मतच ह्या लोकात ''सिद्धांत'' म्हटले जाते. सर्वतोपरी सिद्धांतालाच या ठिकाणी ''**मतम्**'' पदाने म्हटले गेले आहे. भगवंताने आपल्या सरळतेमुळे व निरभिमानतेमुळे आपल्या सर्व श्रेष्ठ सिद्धांतास 'मत' म्हटले आहे. हे मत अथवा सिद्धांत त्रिकालाबाधित आहे अर्थात् यामध्ये कधीही, केव्हाही परिवर्तन होत नाही मग कोणी श्रद्धा करो अथवा न करो.

येथे ''**नित्यम्**'' पद ''**मतम्**'' चे विशेषण नाही तर ''**अनुतिष्ठन्ति**'' पदाचेच विशेषण आहे. कारण भगवान् नित्य आहेत. म्हणून त्यांच्याशी संबंधित असलेल्या संपूर्ण वस्तू सुद्धा नित्यच आहेत. भगवंताचे मतसुद्धा नित्य आहे. भगवंताचे मत सर्वतोपरी सिद्धांत आहे आणि सिद्धांत तोच असतो जो कधीही नष्ट होत नाही. म्हणून भगवंताचे मत तर नित्य आहेच, त्याचे अनुष्ठान नेहमी करावयास पाहिजे. म्हणून या ठिकाणी क्रियाविशेषण ''**नित्यम्**'' पद देण्याचे तात्पर्य आहे—भगवंताच्या मताचे ठिकाणी नित्य निरंतर (सदा) स्थित राहणे तसेच त्यानुसार अनुष्ठान करणे.

**प्रश्न**—भगवंताचे मत कोणते आहे आणि त्याचे सदा-सर्वकाळ अनुष्ठान कसे करावे ?

**उत्तर**—मिळालेली कोणतीही वस्तू आपली नाही—हे भगवंताचे मत आहे. शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण, धन, संपत्ती, पदार्थ इत्यादी सर्व प्रकृतीची कार्य आहेत आणि संसारही प्रकृतीचे कार्य आहे. म्हणून या वस्तूंची संसाराशी एकता आहे तसेच परमात्म्याचा अंश असल्याने "स्व" ची परमात्म्याशी एकता आहे. म्हणून ह्या वस्तू व्यक्तिगत (आपल्या) नाहीत तर त्यांच्या (वस्तूंच्या) उपयोगाविषयी अधिकार व्यक्तिगत आहे. याशिवाय सद्‌गुण, सदाचार, त्याग, वैराग्य, दया, क्षमा इत्यादीसुद्धा व्यक्तिगत नाहीत तर भगवंताचेच आहेत. ही दैवी संपत्ती अर्थात् भगवत्प्राप्तीची संपत्ती (धन) असल्याने भगवंताचीच आहे. जर हे सद्‌गुण, सदाचार इत्यादी आपले असते तर यावर आमचा पूर्ण अधिकार राहिला असता आणि आमच्या सम्मतीवाचून कोणा दुसऱ्याला याची प्राप्ती झाली नसती. यांना आपले मानण्याने तर अभिमानच होत असतो जे आसुरी संपत्तीचे मूळ आहे.

जी वस्तू आपली नाही त्याला आपली समजल्याने आणि त्याच्या प्राप्तीसाठी कर्म करण्यानेच बंधन होते. शरीरादी वस्तू "आपल्या" तर नाहीतच, "आपल्यासाठी" ही नाहीत. जर त्या आपल्यासाठी असत्या तर त्यांच्या प्राप्तीने आम्हाला पूर्ण तृप्ती अथवा संतोष झाला असता, पूर्णतेचा अनुभव झाला असता. परंतु सांसारिक वस्तू कितीही का मिळेनात कधीही तृप्ती होत नाही. तृप्ती अथवा पूर्णतेचा अनुभव जी वस्तू आपली आहे त्या वस्तूच्या (भगवान्) मिळण्याने होतो. आपली वास्तविक वस्तू प्राप्त झाल्यास मग स्वप्नामध्येसुद्धा काही मिळविण्याची इच्छा राहत नाही. ज्याप्रमाणे संसारात सर्व पुत्रवती स्त्रीया माता आहेत. परंतु बालकाला त्या सर्व मातांच्या भेटीने संतोष होत नाही तर स्वत: च्या मातेची भेट झाल्यानंतरच संतोष होतो. त्याच-प्रमाणे जोपर्यंत आणखी काही मिळविण्याची इच्छा राहते, तोपर्यंत हेच समजावे की, आपली वस्तू मिळालीच नाही. मिळालेल्या वस्तूंना जरी अज्ञानाने आपल्या समजले. परंतु वास्तविक पाहता त्या आपल्या नाहीतच आणि म्हणूनच त्यापासून आपली तृप्तीही होत नाही. म्हणून मिळालेली कोणतीही वस्तू आपली आणि आपल्यासाठी नाही.

शरीरादी प्राप्त वस्तूंना आम्ही आपल्यासोबत आणले नाही आणि आपल्यासोबत त्यांना घेऊनही जाऊ शकत नाही. तसेच वर्तमानकाळातही त्या आमच्यापासून क्षणाक्षणाला वियुक्त होत आहेत. वर्तमानकाळी ज्या वस्तू आपणाला आपल्या दिसतात त्या देखील सदुपयोग करण्यासाठी अर्थात् दुसऱ्यांच्या हिताच्या दृष्टीने सेवा करण्यासाठीच मिळाल्या आहेत, त्यावर आपला अधिकार गाजविण्यासाठी नव्हे. म्हणून आम्हाला प्राप्त वस्तूंचा सदुपयोग करण्याचाच अधिकार आहे, आपली समजण्याचा नव्हे. भगवंतांनी मनुष्याला ह्या वस्तू इतक्या उदारपणे आणि अशा रीतीने दिल्या आहेत की, मनुष्याला ह्या वस्तू अगदी आपल्याच वाटतात. या वस्तूंना आपली समजणे भगवंताच्या उदारपणाचा दुरुपयोग करणे आहे. ज्या वस्तू आपल्या नाहीत परंतु भ्रमाने ज्यांना आपण आपले समजले आहे त्या भ्रमाला नष्ट करण्यासाठी साधकांनी अध्यात्मचित्ताने सखोल विचार करून त्या वस्तू भगवंताला अर्पण कराव्यात अर्थात् भ्रमाने त्या वस्तूशी मानलेला आपलेपणा काढून घ्यावा.

ज्याचा एकमात्र उद्देश अध्यात्मतत्त्वाच्या (परमात्मा) प्राप्तीचा आहे, अशा साधकाने जर गंभीरपणे विचार केला, तर त्याला असे स्पष्ट समजून येईल की, मिळालेली कोणतीही वस्तू आपली नसते तर ती आपणाला सोडणारी असते. शरीर, पद, अधिकार, शिक्षा, योग्यता, धन, संपत्ती, जमीन इत्यादी जे काही मिळाले आहे, संसारापासूनच मिळाले आहे आणि संसारासाठीच आहे. मिळालेल्या वस्तूला मग संसाराचे (कार्याचे) माना, प्रकृतीचे (कारणाचे) माना, अथवा भगवंताचे (स्वामीचे) माना, परंतु मुख्य तात्पर्य हेच आहे की, त्या वस्तू आपल्या नाहीत. ज्या वस्तू आपल्या नाहीत त्या आपल्यासाठी कशा होऊ शकतील ?

साधकाने तर कोणतीही वस्तू आपली मानावयाची नाही आणि कोणतेही कर्म आपल्यासाठी करावयाचे नाही. आपल्यासाठी केलेले कर्म बंधनकारक होतात (३।९) अर्थात् यज्ञ (निष्कामभावनेने परहितासाठी केले जाणारे कर्तव्यकर्म) व्यतिरिक्त अन्य (आपल्यासाठी केले गेलेले) कर्म मनुष्याला बंधनकारक होतात. यज्ञासाठी कर्म करणाऱ्या साधकाचे संपूर्ण कर्म, संचितकर्मसुद्धा विलीन होतात (४।२३)

भगवंत त्रिलोकीचे महान ईश्वर (स्वामी) आहेत "**सर्वलोकमहेश्वरम्**" (५।२९) जर मनुष्याने आपल्याला वस्तूंचा मालक समजले तर तो आपल्या वास्तविक स्वामीला विसरतो. कारण तो आपल्याला ज्या वस्तूचा मालक मानतो त्याला त्याच वस्तूचे चिंतन होत असते. म्हणून भगवंतालाच एकमात्र स्वामी समजून साधकाने संसारात सेवकाप्रमाणे रहावे. सेवक आपल्या स्वामीचे संपूर्ण कार्य करीत असताना सुद्धा आपल्याला कधीही स्वामी समजत नाही. म्हणून साधकाने शरीर, इंद्रिये, मन बुद्धी, पदार्थ इत्यादींना आपले

न समजता केवळ भगवंताचेच समजून आपल्या कर्तव्याचे पालन करीत जावे, कर्म करण्याविषयी निमित्तमात्र व्हावे. आपल्यात स्वामीपणाचा अभिमान करू नये.

सर्वस्व भगवदर्पण केल्यानंतर लाभ-हानी, मान-अपमान, सुख-दुःख इत्यादी जे काही येतील त्यांनाही साधकाने भगवंताचेच समजावे आणि त्याचे ठिकाणी आपले कोणतेच प्रयोजन ठेवू नये. सर्व कर्तव्य प्राप्त परिस्थितीनुरूप होत असतात. परिस्थितीनुरूप आपल्या कर्तव्याचे पालन प्रसन्नतेने करीत रहावे. हेच भगवंताच्या मताचे सदा अनुसरण करणे आहे.

**मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः**—भगवान् अर्जुनाला जणू हे म्हणत आहेत की, मी तुला तर सर्वस्व मला अर्पण करून कर्तव्यकर्म करण्याविषयी स्पष्ट आज्ञा देत आहे. म्हणून माझी आज्ञापालन झाल्यास तू मुक्त होशील यात शंकाच नाही. परंतु ज्यांना मी अशा प्रकारची स्पष्ट आज्ञा देत नाही ते देखील जर या मताचे (मिळालेल्यांना आपले न समजून कर्तव्यकर्माचे पालन करणे) अनुसरण करतील तर ते देखील मुक्त होतील. कारण हे मतच असे आहे की, मग मनुष्य मला मानो अथवा न मानो केवळ या मताचे पालन झाल्यानेच तो मुक्त होतो.

**परिशिष्ट भाव**—भगवंताचे मत हेच वास्तविक आणि सर्वोपरी 'सिद्धान्त' आहे, ज्याच्या अंतर्गत सर्वच मत-मनांतर येतात. परंतु भगवान् अभिमान न करता मोठ्या सरळतेने, नम्रतेने आपल्या सिद्धांताला 'मत' नावाने म्हणतात. तात्पर्य हे आहे की, भगवंताने आपल्या अथवा दुसऱ्या कोणत्याही मताचा आग्रह ठेवला नाही, तर निष्पक्ष होऊन आपला विचार समोर मांडला आहे.

मत सर्वोपरी नसते, तर व्यक्तिगत असते. प्रत्येक व्यक्ती आपापले मत प्रकट करू शकतो, परंतु सिद्धान्त सर्वोपरी असतो, जो सर्वांना मानावा लागतो. म्हणून गुरुशिष्यातसुद्धा मतभेद तर होऊ शकतो, परंतु सिद्धान्त भेद होऊ शकत नाही. ऋषि-मुनी, दार्शनिक आपापल्या मतालाही 'सिद्धान्त' नावाने म्हणतात. परंतु गीतेत भगवान् आपल्या सिद्धान्तालाही 'मत' नावाने म्हणतात. ऋशि-मुनी, दार्शनिक, आचार्य इत्यादींच्या मतात तर भेद (मतभेद) राहतो, परंतु भगवंताचे मत अर्थात् सिद्धांतात कोणताही मतभेद नाही.

**ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम्।**
**सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः॥ ३२॥**

**तु** = परंतु
**ये** = जे मनुष्य
**मे** = माझ्या
**एतद्** = या
**मतम्** = मतात
**अभ्यसूयन्तः** = दोषदृष्टी ठेवून
**न, अनुतिष्ठन्ति** = (याचे) अनुष्ठान करीत नाहीत,
**तान्** = त्या
**सर्वज्ञानविमूढान्** = संपूर्ण ज्ञानांत मोहित
**अचेतसः** = (आणि) अविवेकी मनुष्यांना
**नष्टान्** = नष्ट झालेले (च)
**विद्धी** = समज अर्थात् त्यांचे पतनच होते.

***व्याख्या*—ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम्**—तीसाव्या श्लोकात वर्णन केलेल्या सिद्धांतानुसार वर्तन करणाऱ्यांना होणाऱ्या लाभाचे वर्णन एकतीसाव्या श्लोकात केल्यानंतर ह्या सिद्धांतानुसार वर्तन न करणाऱ्यांना वेगळे दर्शविण्याच्या हेतूने या ठिकाणी ''तु'' या पदाचा प्रयोग केला आहे.

ज्याप्रमाणे संसारात सर्व स्वार्थी मनुष्य आपणालाच सर्व पदार्थ मिळावेत, आपल्यालाच लाभ व्हावा अशी इच्छा करतात. त्याप्रमाणे भगवान् देखील अशी इच्छा करतात की, संपूर्ण कर्मे मलाच अर्पण केली जावीत, मलाच स्वामी समजले जावे—अशा प्रकारे मानणे भगवंतावर दोषारोपण करणे आहे.

कामनेवाचून संसाराचे कार्य कसे चालेल? ममतेचा तर संपूर्णपणे त्याग होऊच शकत नाही, राग-द्वेष ह्या विकारापासून रहित होणे अशक्य आहे—अशा प्रकारे मानणे भगवंताच्या ''मता'' वर दोषरोपण करणे आहे.

भोग आणि संग्रहाची इच्छा असणारी जी माणसें शरीरादी पदार्थांना आपले आणि आपल्यासाठी समजतात आणि संपूर्ण कर्म आपल्यासाठीच करतात ती भगवंताच्या मतानुसार वागत नाहीत.

**सर्वज्ञानविमूढान् तान्**—जी माणसे भगवंताच्या मतानुसार वर्तन करीत नाहीत ती सर्व प्रकारच्या सांसारिक ज्ञानात (विद्या, कला इत्यादी) मोहित राहतात. ती मोटार, विमान, रेडियो टेलिविजन इत्यादी अविष्कारामध्ये त्यांची कला-कुशलता जाणण्यात तसेच नविन-नविन अविष्कार करण्यातच व्यस्त राहतात. जलतरण, घरबांधणी, चित्रकला, शिल्पकला, मंत्र, तंत्र, यंत्र इत्यादीचे ज्ञान प्राप्त करून घेण्यामध्ये तसेच त्यांच्याकडून विलक्षण विलक्षण चमत्कार दाखविण्यामध्ये, देश-विदेशाच्या भाषा, लिपी, रितीरिवाज, आहार-विहार इत्यादीसंबंधी ज्ञान प्राप्त करण्यातच आसक्त

झालेली असतात. जे काही आहे ते हेच आहे—असा त्यांचा निश्चय असतो (१६।११) अशा लोकांना या ठिकाणी ''संपूर्ण ज्ञानाने मोहित झालेले'' म्हटले गेले आहे.

**अचेतसः**—भगवंताच्या मताचे अनुकरण न करणाऱ्या मनुष्याचे ठिकाणी सत्-असत्, सार-असार, धर्म-अधर्म, बंधन-मोक्ष इत्यादी पारमार्थिक गोष्टींविषयी देखील ज्ञान (विवेक) नसते. त्यांच्यात सावधानता नसते. ते पशूप्रमाणे माजलेले असतात. ते व्यर्थ आशा, व्यर्थ कर्म आणि व्यर्थ ज्ञान असणारे विक्षिप्त चित्ताचे मूढ पुरुष असतात—''**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः।**'' (९।१२)

**विद्धि नष्टान्**—मनुष्यशरीर प्राप्त होऊनही जे भगवंताच्या मतानुसार वर्तन करीत नाहीत त्या माणसांना नष्ट झालेलेच समजावे. तात्पर्य ती माणसे जन्म-मरणाच्या चक्रात-च भ्रमण करीत राहतात.

मनुष्यजीवनात अंतकाळापर्यंत मुक्तीची शक्यता असते (८।५) म्हणून जी माणसे वर्तमान काळात भगवंताच्या मताचे अनुकरण करीत नाहीत. ती देखील भविष्यात सत्संगादीच्या प्रभावाने भगवंताच्या मताचे अनुकरण करू शकतात ज्यामुळे त्यांची मुक्ती होऊ शकते. परंतु जर त्या माणसांचा भाव जसा वर्तमानकाळात आहे तसाच भविष्यात राहिला तर त्यांना (भगवात्प्राप्तीपासून वंचित राहिल्याने) नष्ट झालेलेच समजावे. याच कारणाने भगवंतांनी अशा माणसांसाठी ''**नष्टान् विद्धि**'' पदाचा प्रयोग केला आहे.

भगवंताच्या मताचे अनुकरण न करणारा मनुष्य संपूर्ण कर्म राग अथवा द्वेषपूर्वक करीत असतो. राग आणि द्वेष दोन्हीही मनुष्याचे फार मोठे शत्रू आहेत—''**तौ ह्यस्य परिपन्थिनौ**'' (३।३४) पदार्थ आणि कर्म तर नाशवान् असल्यामुळे नेहमी बरोबर राहत नाहीत. परंतु राग-द्वेषपूर्वक कर्म केल्याने मनुष्य तादात्म्य, ममता आणि कामना इत्यादींनी बद्ध होऊन वारंवार नीच योनींना आणि नरकांना प्राप्त होत राहतो. म्हणूनच भगवंतांनी अशा मनुष्यांना नष्ट झालेलेच समजावे—असे म्हटले आहे.

एकतीसाव्या व बत्तीसाव्या—दोन्ही श्लोकामध्ये भगवंतांनी म्हटले आहे की, माझ्या सिद्धांतानुसार वर्तन करणारे मनुष्य कर्मबंधनातून मुक्त होतात आणि वर्तन न करणाऱ्या मनुष्यांचे पतन होते. यावरुन असा निष्कर्ष निघतो की, मनुष्य भगवंताला मानो अथवा न मानो याविषयी भगवंताचा कोणताच आग्रह नाही. परंतु त्याने भगवंताच्या मताचे (सिद्धांताचे) पालन अवश्य केले पाहिजे—याविषयी भगवंताची आज्ञा आहे. जर त्याने असे केले नाही तर त्याचे पतन अवश्य होईल. एक गोष्ट मात्र जरूर आहे की, जर साधक भगवंताला मानून त्यांच्या मताचे अनुष्ठान करील, तर भगवंत त्याला स्वतःला देऊन टाकतील, परंतु जर भगवंताला न मानता केवळ त्यांच्या मताचे अनुष्ठान करील तर भगवान् त्याचा उद्धार करतील. तात्पर्य भगवंताला मानणाऱ्यांना ''प्रेमा'' ची प्राप्ती आणि भगवंताच्या मताला मानणाऱ्यांना ''मुक्ती'' ची प्राप्ती होते.

*संबंध—भगवंताच्या मतानुसार कर्म न करण्याने मनुष्याचे पतन होते—असे का? याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

## सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि।
## प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति॥ ३३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भूतानि** | = संपूर्ण प्राणी | **स्वस्याः** | = आपल्या | **निग्रहः** | = (मग यात कोणाचा) हट्ट |
| **प्रकृतिम्** | = प्रकृतीला | **प्रकृतेः** | = प्रकृती- | | |
| **यान्ति** | = प्राप्त होतात. | **सदृशम्** | = नुसार | **किम्** | = काय |
| **ज्ञानवान् अपि** | = ज्ञानी महापुरुषही | **चेष्टते** | = प्रयत्न करतो. | **करिष्यति** | = करेल? |

*व्याख्या*— **प्रकृतिं यान्ति भूतानि**—जी काही कर्म केली जातात ती स्वभाव अथवा सिद्धांताला* समोर ठेवून केली जातात. स्वभाव दोन प्रकारचा असतो—राग-द्वेषरहित आणि राग-द्वेषयुक्त. जसे चालत असताना रस्त्यात एखादा फलक दिसला आणि त्यावर जे लिहिलेले असेल ते वाचले तर हे वाचणे राग-द्वेषाने झाले नाही आणि कोण्या सिद्धांताला-ही धरून झाले नाही. परंतु राग-द्वेषरहित स्वभावाने आपोआपच घडून आले. एखाद्या मित्राचे पत्र आले असता आपण ते रागपूर्वक वाचतो आणि शत्रूचे पत्र आल्यास त्याला द्वेषपूर्वक वाचतो. तर हे वाचणे राग-द्वेषयुक्त स्वभावाने झाले. गीता-रामायण इत्यादी सत् शास्त्रांना वाचणे सिद्धांताला धरून वाचणे होते. मनुष्यजन्म परमात्मप्राप्तीसाठीच आहे.

* सिद्धांत तोच आहे जो शास्त्र आणि भगवंताचे आज्ञेनुसार असेल. शास्त्र आणि भगवंताच्या आज्ञेविरूद्ध सिद्धांत मान्य नसतो.

म्हणून परमात्मप्राप्तीच्या उद्देशाने कर्म करणेसुद्धा सिद्धांतानुसार कर्म करणे आहे.

अशा प्रकारे पाहणे, ऐकणे, वास घेणे, स्पर्श करणे इत्यादी सर्व क्रिया स्वभाव आणि सिद्धांत—दोन्हीनी होतात. राग-द्वेषरहित स्वभाव दोषी नसतो तर राग-द्वेषयुक्त स्वभाव दोषी असतो. राग-द्वेषपूर्वक होणाऱ्या क्रिया मनुष्याला बंधनकारक होतात. कारण यामुळे स्वभाव अशुद्ध होतो आणि सिद्धांताला अनुसरुन होणाऱ्या क्रिया उद्धार करणाऱ्या होतात. कारण त्यामुळे स्वभाव शुद्ध होतो. स्वभाव अशुद्ध झाल्यामुळेच संसाराशी मानलेल्या संबंधाचा विच्छेद होत नाही. स्वभाव शुद्ध झाल्यास संसाराशी मानलेल्या संबंधाचा सुगमतेने विच्छेद होतो.

ज्ञानी महापुरुषाच्या आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीराकडून आपोआप क्रिया होत असतात. कारण त्याचे ठिकाणी कर्तृत्वाभिमान नसतो. परमात्मप्राप्तीची इच्छा असणाऱ्या साधकाच्या क्रिया सिद्धांतानुसार असतात. ज्याप्रमाणे लोभी पुरुष व्यवहारात कधीही तोटा होऊ नये म्हणून निरंतर सावधान राहतो. त्याप्रमाणेच साधक कोणतीही क्रिया राग-द्वेषपूर्वक न होईल याविषयी नेहमी सावध राहतो. अशी सावधानी बाळगल्यास साधकाचा स्वभाव शीघ्र शुद्ध होतो आणि परिणामी तो कर्म-बंधनातून मुक्त होतो.

जरी सर्व क्रिया स्वाभाविकच प्रकृतीकडून होतात तरीपण अज्ञानी पुरुष क्रियेशी आपला संबंध मानून आपल्याला त्या क्रियांचा कर्ता मानतो (३।२७) पदार्थ आणि क्रियेशी आपला संबंध मानल्यामुळेच राग-द्वेष उत्पन्न होतात ज्यामुळे जन्म-मरणाचे बंधन होते. परंतु प्रकृतीशी संबंध न मानणारा साधक स्वतःला नेहमी अकर्ताच मानतो (१३।२९)

स्वभावामध्ये मुख्य दोष प्राकृत पदार्थांची आसक्ती (राग) च आहे. जोपर्यंत स्वभावामध्ये आसक्ती राहते तोपर्यंत अशुद्ध कर्म होतात. म्हणून साधकासाठी आसक्तीच बंधनाचे मुख्य कारण आहे

राग मानलेल्या "अहम्" मध्ये राहतो आणि मन, बुद्धी, इंद्रिये तसेच इंद्रियांच्या विषयात दिसतो.

"अहम्" दोन प्रकारचा आहे

(१) चेतनाकडून जडाशी मानलेल्या संबंधाने होणारा तादात्म्यरूपी "अहम्".

(२) जड प्रकृतीचा धातुरूपी "अहम्" "**महाभूतान्यहङ्कारः**" (१३।५)

जड प्रकृतीच्या धातुरूपी "अहम्" मध्ये कोणताही दोष नाही कारण हा "अहम्" मन, बुद्धी, इंद्रिये इत्यादी प्रमाणे एक करणच आहे. म्हणून संपूर्ण दोष, मानलेल्या "अहम्" मध्येच असतात. ज्ञानी महापुरुषाचे ठिकाणी तादात्म्यरूपी "अहम्" चा संपूर्णपणे अभाव असतो म्हणून त्याच्या म्हणविल्या जाणाऱ्या शरीराकडून होणाऱ्या सर्व क्रिया प्रकृतीच्या धातुरूपी "अहम्" कडूनच होतात. वास्तविक पाहिले तर सर्व प्राण्याच्या संपूर्ण क्रिया या धातुरूपी "अहम्" नेच होतात. परंतु जड शरीराला "मी" आणि "माझे" मानणारा अज्ञानी पुरुष त्या क्रियांना आपल्या आणि आपल्यासाठी समजतो आणि बंधनात अडकतो. कारण क्रियांना आपले आणि आपल्यासाठी समजल्यानेच राग उत्पन्न* होतो.

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि**—जरी अंतःकरणात राग-द्वेष नसल्यामुळे ज्ञानी महापुरुषाची प्रकृती निर्दोष असते आणि ते प्रकृतीच्या वशीभूत होत नाहीत तरीपण ते क्रिया तर आपल्या प्रकृती (स्वभाव) नुसारच करत असतात. ज्याप्रमाणे एखादा ज्ञानी पुरुष इंग्रजी भाषा जाणत नाही आणि त्याला इंग्रजीतून बोलण्यास सांगितले गेले तर तो बोलू शकणार नाही. तो जी भाषा जाणतो त्याच भाषेत बोलेल.

भगवान्देखील आपल्या प्रकृतीला (स्वभाव) वश करून ज्या योनीमध्ये अवतार घेतात त्याच योनीच्या स्वभावानुसार क्रिया करतात. जसे भगवान् राम अथवा कृष्ण-रूपाने मनुष्य योनीत अवतार घेतात. तसेच मत्स्य, कच्छ, वराह इत्यादी योनीत अवतार घेतात त्यावेळी त्या त्या योनीनुसारच क्रिया करतात. तात्पर्य भगवंताच्या अवतारी शरीरातसुद्धा वर्ण, योनीनुसार स्वभावाची भिन्नता राहते. परंतु परवशता नसते. त्याचप्रमाणे ज्या महापुरुषांचा प्रकृतीशी (जडता) संबंध-विच्छेद झाला आहे त्यांचे ठिकाणी स्वभावाची भिन्नता तर राहते परंतु परवशता नसते. परंतु ज्या माणसांचा प्रकृतीशी संबंध-विच्छेद झालेला नाही त्यांचे ठिकाणी स्वभावाची भिन्नता आणि परवशता—दोन्हीही असतात.

या ठिकाणी "**स्वस्याः**" पदाचे तात्पर्य हे आहे की, ज्ञानी महापुरुषाची प्रकृती निर्दोष असते. ते प्रकृतीला वश नसतात तर प्रकृती त्यांना वश असते. कर्माच्या फलजनकतेचे मूळ बीज (कारण) कर्तृत्वाभिमान आणि स्वार्थबुद्धी आहे. ज्ञानी महापुरुषांचे ठिकाणी कर्तृत्वाभिमान आणि स्वार्थबुद्धी

* शरीराचे वाढणे आणि बदलणे इत्यादी क्रियेसारख्या, शरीरनिर्वाहसंबंधी व्यावहारिक क्रियासुद्धा सहज होतात. परंतु साधारण मनुष्याची तर या (व्यावहारिक) क्रियेमध्ये रागद्वेष असल्याने लिप्तता राहते तर ज्ञानी पुरुषाची या क्रियेमध्ये राग-द्वेष नसल्याने लिप्तता नसते.

नसते. त्यांच्याकडून केवळ क्रिया होतात. बंधन कर्मामुळे होते, क्रियेमुळे नव्हे. म्हणूनच येथे "**चेष्टते**" पद आले आहे. त्यांचा स्वभाव इतका शुद्ध असतो की, त्यांच्याकडून होणाऱ्या क्रियासुद्धा अत्यंत शुद्ध तसेच साधकांसाठी आदर्श असतात.

मागील आणि वर्तमानकालीन जन्माचे संस्कार, माता-पित्याचे संस्कार, वर्तमानकालीन संगती, शिक्षण, वातावरण, अध्ययन, उपासना, चिंतन, क्रिया, भाव इत्यादीनुसार स्वभाव बनत असतो. हा स्वभाव सर्व माणसांचा भिन्न भिन्न असतो आणि याला निर्दोष करण्यात सर्व मनुष्य स्वतंत्र आहेत. व्यक्तिगत स्वभावाची भिन्नता ज्ञानीमहापुरुषांचे ठिकाणी सुद्धा असते. चेतनात भिन्नता नसतेच आणि प्रकृती (स्वभाव) च्या ठिकाणी स्वाभाविक भिन्नता असते. प्रकृती विषमच असते. जसे वृक्षाच्या दृष्टीने एका जातीचे असतानासुद्धा आंब्याच्या वृक्षात अवांतर भेद असतात. तसेच प्रकृती (स्वभाव) शुद्ध असूनसुद्धा ज्ञानी महापुरुषांच्या प्रकृतीमध्ये भेद असतो.

ज्ञानी महापुरुषाचा स्वभाव शुद्ध (राग-द्वेषरहित) असतो म्हणून ते प्रकृतीला वश नसतात. या उलट अशुद्ध (राग-द्वेषयुक्त) स्वभावाचे मनुष्य आपणच निर्माण केलेल्या परवशतेला बळी पडून कर्म करतात.

**निग्रहः किं करिष्यति**—ज्यांचा स्वभाव अत्यंत शुद्ध आणि श्रेष्ठ आहे, त्यांच्या क्रियासुद्धा त्यांच्या प्रकृतीनुसार होत असतात. मग ज्यांचा स्वभाव अशुद्ध (राग-द्वेषयुक्त) आहे त्या पुरुषांच्या क्रिया तर प्रकृतीनुसार होणारच. या विषयात कोणताही हट्ट चालणार नाही. ज्याचा जसा स्वभाव आहे त्याला त्यानुसारच कर्म करावे लागतील. जर स्वभाव अशुद्ध असेल तर तो अशुद्ध कर्मामध्ये आणि शुद्ध असेल तर तो शुद्ध कर्मामध्ये मनुष्याला प्रवृत्त करील.

अर्जुनसुद्धा जेव्हा हट्टाने युद्धरूप कर्तव्यकर्माचा त्याग करू इच्छितात तेव्हा भगवान् त्यांना हेच म्हणतात की, तुझा स्वभाव तुला बळेच युद्ध करावयास लावील. "**प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति।**" (१८।५९) कारण, तुझ्या स्वभावामध्ये क्षात्र कर्म (युद्ध इत्यादी) करण्याची विचारधारा आहे. म्हणून स्वाभाविक कर्मांनी बांधलेला तू परवश होऊन युद्ध करशील अर्थात् यात तुझा हट्ट चालणार नाही—"**करिष्यस्यवशोऽपि तत्।**" (१८।६०)

ज्याप्रमाणे प्रत्येक तासाला शंभर मैल धावणारी मोटार आपल्या निर्धारित क्षमतेपेक्षा अधिक वेगाने धावणार नाही, त्याप्रमाणे ज्ञानी महापुरुषाकडून त्यांच्या शुद्ध प्रकृतीच्या विरुद्ध क्रिया होणार नाही. ज्यांची प्रकृती अशुद्ध आहे त्यांची ती प्रकृती बिघडलेल्या (नादुरुस्त) मोटारीप्रमाणे आहे. नादुरुस्त असलेल्या मोटारीला दुरुस्त करण्याचे दोन मुख्य उपाय आहेत (१) मोटारीला स्वतः नीट करणे (२) मोटारीला वर्कशॉप मध्ये दुरुस्तीसाठी पाठविणे. त्याचप्रकारे अशुद्ध प्रकृतीला सुधारण्याचेसुद्धा दोन मुख्य उपाय आहेत (१) रागद्वेषरहित होऊन कर्म करणे (३।३४) आणि (२) भगवंताला शरण जाणे (१८।६२). जर मोटार योग्य प्रकारे चालत असेल तर आम्ही मोटारीला वश नाहीत आणि जर मोटार बिघडली असेल तर आम्ही मोटारीच्या वशमध्ये आहोत. तसेच ज्ञानी महापुरुषांची प्रकृती शुद्ध असल्याकारणाने ते प्रकृतीला वश नसतात आणि अज्ञानी पुरुषाची प्रकृती अशुद्ध असल्याकारणाने तो प्रकृतीला वश होतो.

ज्याच्या बुद्धीचे ठिकाणी जडतेचेच (सांसारिक भोग आणि संग्रह) महत्त्व आहे असा मनुष्य कितीही विद्वान का असेना त्याची अधोगती निश्चित होणार. परंतु ज्याच्या बुद्धीचे ठिकाणी जडतेचे महत्त्व नाही आणि भगवत्प्राप्तीच ज्याचा उद्देश आहे असा मनुष्य विद्वान नसला तरीही त्याचा उद्धार निश्चित होतो. कारण ज्याचा उद्देश भोग आणि संग्रह नसून केवळ परमात्मप्राप्ती करणेच आहे त्याचे सर्व भाव, विचार, कर्म इत्यादी त्याच्या उन्नतीला सहाय्यक होतात. म्हणून साधकाने सर्वप्रथम परमात्मप्राप्तीचा उद्देश निश्चित करावा आणि त्यानंतर त्या उद्देशाच्या सिद्धीसाठी राग-द्वेषरहित होऊन कर्तव्यकर्म करीत रहावे. राग-द्वेषरहित होण्याचा सुगम उपाय आहे—मिळालेल्या शरीरादी पदार्थांना आपले आणि आपल्यासाठी न मानता दुसऱ्यांच्या सेवेसाठी उपयोगात आणावे आणि मोबदल्यात दुसऱ्याकडून कशाचीही इच्छा ठेवू नये.

प्रकृतीला वश न होण्यासाठी साधकाने एखादा आदर्श समोर ठेवून कर्तव्यकर्म करीत जावे. आदर्श दोन होऊ शकतात (१) भगवंताचे मत (सिद्धांत) आणि (२) श्रेष्ठ महापुरुषांचे आचरण. आदर्शाला समोर ठेवून कर्म करणाऱ्या मनुष्याची प्रकृती शुद्ध होत असते आणि नित्यप्राप्त परमात्मतत्त्वाचा अनुभव येतो. या उलट आदर्श समोर न ठेवता कर्म करणारा मनुष्य राग-द्वेषपूर्वकच सर्व कर्म करतो ज्यामुळे राग-द्वेष पुष्ट होतात आणि त्याचे पतन होते—"**नष्टान् विद्धि।**" (३।३२)

जसे नदीच्या प्रवाहाला आम्ही रोखू तर शकत नाही. परंतु पाट काढून त्याला योग्य रीतीने वळवू शकतो, तसेच कर्माच्या प्रवाहाला रोखू तर शकत नाही. परंतु त्याचा प्रवाह वळवू शकतो. निःस्वार्थ भावनेने केवळ दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करणेच कर्माच्या प्रवाहाला मोडणे आहे. आपल्यासाठी थोडेसुद्धा कर्म करण्याने कर्माचा प्रवाह वळणार नही. तात्पर्य केवळ दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करण्याने कर्मांचा प्रवाह संसाराकडे वळतो आणि साधक कर्मबंधनातून मुक्त होतो.

**परिशिष्ट भाव**—ज्ञानी महापुरुषही जेव्हा व्यवहार करतो तेव्हा स्वभावानुसारच करतो. कारणाविना कोणी व्यवहार करू शकत नाही. जसे शिक्षक बालकाच्या स्थितीत येऊनच त्याला वर्णमाला (क-ख-ग) शिकवितो, तसेच ज्ञानी महापुरुषही साधारण मनुष्याच्या स्थितीत येऊनच त्याला समजावतो, व्यवहार करतो.

**'चेष्टते'** पदाचे तात्पर्य हे आहे की, तो कर्म करीत नाही, तर त्याच्याकडून प्रकृतीनुसार आपोआप क्रिया होते. जसे वृक्षाची पाने हालतात तर त्यांत कोणतेही फलजनक कर्म (पाप अथवा पुण्य) होत नाही, तसेच कृर्तत्वाभिमान न राहिल्यामुळे त्याच्याद्वारा कोणतेही शुभाशुभ कर्म होत नाही.

ज्ञानी महापुरुषही दुसऱ्यांच्या हितात लागून राहतात, कारण साधनावस्थेतच त्यांचा स्वभाव प्राणिमात्राचे हित करण्याचा राहिला आहे—**'सर्वभूतहिते रताः'** (गीता ५।२५, १२।४). म्हणून काहीही करणे, जाणणे आणि प्राप्त करणे शिल्लक न राहिल्यावर सुद्धा त्यांच्यात सर्वांचे हित करण्याचा स्वभाव राहतो. तात्पर्य हे आहे की, दुसऱ्यांचे हित करता-करता जेव्हा त्यांचा संसाराशी संबंध-विच्छेद होतो, तेव्हा त्यांना हित करावे लागत नाही, तर पूर्वीच्या प्रवाहामुळे त्यांच्या द्वारा आपोआप दुसऱ्यांचे हित होते.

***संबंध**—प्रत्येक मनुष्याचा जन्म आपल्या प्रकृतीला बरोबर घेऊनच होत असतो म्हणून त्याला त्याच्या प्रकृतिनुसार कर्म करावीच लागतात. म्हणून आता भगवान् पुढील श्लोकात प्रकृतीला शुद्ध करण्याचा उपाय सांगतात.*

**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ।**
**तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ॥ ३४॥**

| | |
|---|---|
| **इन्द्रियस्य, इन्द्रियस्य अर्थे** | = इंद्रिय-इंद्रियाच्या अर्थामध्ये (प्रत्येक इंद्रियाच्या प्रत्येक विषयात) |
| **रागद्वेषौ** | = (मनुष्याचे) राग आणि द्वेष |
| **व्यवस्थितौ** | = व्यवस्थितपणे (अनुकूलता आणि प्रतिकूलतेनुसार) स्थित आहेत. |
| **तयोः** | = (मनुष्याने) या दोन्हींच्या |
| **वशम्** | = वश |
| **आगच्छत्** | = होऊ |
| **न** | = नये, |
| **हि** | = कारण |
| **तौ** | = हे दोन्हीही |
| **अस्य** | = त्याच्या (पारमार्थिक मार्गात) |
| **परिपन्थिनौ** | = विघ्न करणारे शत्रू आहेत. |

***व्याख्या*— इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ—** प्रत्येक इंद्रिय आपापल्या विषयामध्ये राग आणि द्वेषानुसार वेगवेगळे स्थित असलेले दाखविण्यासाठी येथे **"इन्द्रियस्य"** पद दोन वेळा प्रयुक्त झाले आहे. तात्पर्य प्रत्येक इंद्रिया (श्रोत्र, त्वचा, नेत्र, रसना आणि घ्राण) च्या प्रत्येक विषया-(शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध) मध्ये असलेल्या अनुकूलता आणि प्रतिकूलता यांच्या मान्यतेनुसार मनुष्याचे राग आणि द्वेष स्थित असतात. इंद्रियांच्या विषयांमध्ये अनुकूलतेचा भाव झाल्यास मनुष्याचा त्या विषयाचे ठिकाणी (आसक्ती) राग उत्पन्न होतो आणि प्रतिकूलतेचा भाव निर्माण झाल्यास त्या विषयाविषयी द्वेष उत्पन्न होतो.

वास्तविक पाहिले तर राग-द्वेष इंद्रियांच्या विषयात नसतात. जर विषयाचे ठिकाणी राग-द्वेष स्थित असते तर एकच विषय सर्वांना समानरूपाने प्रिय अथवा अप्रिय झाला असता. परंतु असे होत नाही. जसे शेतकऱ्याला पाऊस प्रिय वाटतो परंतु कुंभाराला तो अप्रिय असतो. एक विषयसुद्धा एका मनुष्याला सर्वकाळात प्रिय किंवा अप्रिय नसतो. जसे थंड वारा उन्हाळ्याच्या दिवसात प्रिय वाटतो परंतु हिवाळ्यात अप्रिय वाटतो. अशा प्रकारे सर्व विषय आपल्या अनुकूलता अथवा प्रतिकूलता या भावनेनेच प्रिय अथवा अप्रिय वाटत असतात अर्थात् मनुष्य विषयाचे ठिकाणी आपला अनुकूल अथवा प्रतिकूल भाव करून त्यांना चांगले अथवा वाईट समजून राग-द्वेष करीत असतो. म्हणून भगवंतांनी राग-द्वेषाला प्रत्येक इंद्रियाच्या प्रत्येक विषयामध्ये स्थित असलेले सांगितले आहे.

वास्तविक राग-द्वेष मानलेल्या "अहम्" (मीपणा) मध्ये राहत असतात.* शरीराने मानलेला संबंधच "अहम्" म्हटला जातो. म्हणून जोपर्यंत शरीराने मानलेला संबंध राहतो तोपर्यंत त्यात राग-द्वेष राहतात आणि तेच राग-द्वेष बुद्धी, मन, इंद्रिये तसेच इंद्रियांच्या विषयांमध्ये प्रतीत होतात. याच अध्यायाच्या सदतीसाव्यापासून त्रेचाळीसाव्या श्लोकापर्यंत भगवंतांनी याच राग-द्वेषाला "काम" आणि "क्रोध" या

* भगवंतांनी "रसवर्जं रसोऽप्यस्य" (२।५९) पदामध्ये "अस्य" पदाने या गोष्टीकडे लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला आहे की, राग-द्वेष मानलेल्या "अहम्" मध्ये (साधकामध्ये) असतात.

नावाने म्हटले आहे. राग आणि द्वेषाचेच स्थूल रूप काम आणि क्रोध आहेत. चाळीसाव्या श्लोकात सांगितले आहे की, हा काम इंद्रिये, बुद्धी आणि मनामध्ये राहतो. विषयांप्रमाणे यांचे ठिकाणी (इंद्रिये, मन, बुद्धीत) "काम" प्रतीत झाल्यामुळेच भगवंतांनी यांना "कामा" चे निवास-स्थान म्हटले आहे. जसे विषयाचे ठिकाणी राग-द्वेषाची केवळ प्रतीती आहे, तसेच इंद्रिये, मन आणि बुद्धीचे ठिकाणी सुद्धा राग-द्वेषाची केवळ प्रतीती असते. ही इंद्रिये, मन आणि बुद्धी तर केवळ कर्म करण्याचे करण (अवजार) आहेत. यांचे ठिकाणी काम क्रोध अथवा राग-द्वेष आहेतच कोठे? याशिवाय, दुसऱ्या अध्यायाच्या एकोणसाठाव्या श्लोकात भगवान् म्हणतात की, इंद्रियाद्वारे विषय सेवन न करणाऱ्या पुरुषांचे विषय तर निवृत्त होतात परंतु विषयामधील त्यांचा राग (आसक्ती) निवृत्त होत नाही. हा राग परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यास निवृत्त होतो.

**तयोर्न वशमागच्छेत्**—या पदाने भगवान् साधकांना आश्वासन देतात की, राग-द्वेषाची वृत्ती उत्पन्न झाल्यास त्याने साधन आणि साध्याविषयी कधीही निराश होऊ नये. परंतु राग-द्वेषाच्या वृत्तीला वश होऊन त्याने एखाद्या कार्यात प्रवृत्त अथवा निवृत्त होऊ नये. कर्मात प्रवृत्ती अथवा निवृत्ती शास्त्रानुसारच झाली पाहिजे (१६।२४). जर राग-द्वेषानुसारच साधकाची कर्मामध्ये प्रवृत्ती अथवा निवृत्ती होत असेल तर याचे तात्पर्य असे होते की, साधक रागद्वेषाला वश झाला आहे. रागपूर्वक प्रवृत्ती अथवा निवृत्ती झाल्यास "राग" पुष्ट होतो आणि द्वेषपूर्वक प्रवृत्ती अथवा निवृत्ती झाल्यास "द्वेष" पुष्ट होतो. अशाप्रकारे राग-द्वेष पुष्ट झाल्याने परिणामी पतनच होते.

जेव्हा साधक संसाराच्या कार्याचा त्याग करून भजनात रममाण होतो. तेव्हा संसाराच्या अनेक चांगल्या व वाईट स्फूर्ती उत्पन्न होऊ लागतात, त्यामुळे तो घाबरून जातो. याठिकाणी भगवान् साधकाला जणू आश्वासन देत आहेत की, त्यांनी अशा स्फूर्तीपासून घाबरून जाऊ नये. या स्फूर्तींना वास्तविक सत्ताच नाही. कारण ह्या उत्पन्न होणाऱ्या आहेत आणि सिद्धांत असा आहे की, उत्पन्न होणारी वस्तू नष्ट होणारी असते. म्हणून विचारपूर्वक पाहिले असता स्फूर्ती तर येत नसून जात आहेत. कारण हे आहे की, संसाराचे कार्य करीत असताना अवकाश न मिळाल्याने स्फूर्ती दबून राहतात आणि संसाराच्या कार्याचा त्याग केल्याबरोबर अवसर मिळाल्याने जुने संस्कार स्फूर्तीच्या रूपाने बाहेर निघू लागतात. म्हणून साधकांनी ह्या चांगल्या अथवा वाईट स्फूर्तीविषयीसुद्धा राग-द्वेष करू नये. तर सावधपणे यांची उपेक्षा करून स्वतः तटस्थ रहावे. अशा प्रकारे त्याने पदार्थ, व्यक्ती, विषय इत्यादीविषयीसुद्धा राग-द्वेष करू नयेत.

## राग-द्वेषावर विजय मिळविण्याचे उपाय

राग-द्वेषाला वश होऊन कर्म करण्याने राग-द्वेष पुष्ट (बलवान) होतात आणि अशुद्ध प्रकृती (स्वभाव) चे रूप धारण करतात. प्रकृती अशुद्ध झाल्यास प्रकृतीच्या अधिन व्हावे लागते. अशा अशुद्ध प्रकृतीच्या अधिनतेमुळे होणारे कर्म मनुष्याला बंधन-कारक होतात. म्हणून राग-द्वेषाला वश होऊन कोणतीही प्रवृत्ती अथवा निवृत्ती करू नये. हा उपाय या ठिकाणी सांगितला आहे. यापूर्वी भगवंतांनी म्हटले आहे की, जो माझ्या मताचे अनुकरण करतो तो कर्मबंधनातून मुक्त होतो (३।३१). म्हणून राग-द्वेषाच्या वृत्तीला वश न होता भगवंताच्या मतानुसार कर्म करण्याने राग-द्वेष सुगमतेने नष्ट होतात. तात्पर्य साधकाने संपूर्ण कर्मांना आणि स्वतः लासुद्धा भगवदर्पण करावे आणि असे समजावे की, कर्म माझ्यासाठी नाहीत तर भगवंतासाठीच आहेत. ज्यांच्याकडून कर्म होतात ते शरीर, मन, बुद्धी इत्यादींसुद्धा भगवंताचेच आहेत आणि मीसुद्धा भगवंताचाच आहे. मग निष्काम, निर्मम आणि निःसंताप होऊन कर्तव्यकर्म केल्यास राग-द्वेष नाहीसे होतात. अशा प्रकारे भगवंताचे मत अर्थात् सिद्धांताला समोर ठेवूनच कोणत्याही कार्यात प्रवृत्त अथवा निवृत्त व्हावे.

संपूर्ण सृष्टी प्रकृतीचे कार्य आहे आणि शरीर सृष्टीचा एक अंश आहे. जोपर्यंत शरीराविषयी ममता असते तोपर्यंत राग-द्वेष असतात अर्थात् मनुष्य रुची अथवा अरुचिपूर्वक वस्तूंचे ग्रहण अथवा त्याग करीत असतो. ही रुची-अरुचीच राग-द्वेषाचे सूक्ष्म रूप आहे. राग-द्वेषपूर्वक प्रवृत्ती अथवा निवृत्ती झाल्यास राग-द्वेष पुष्ट होतात परंतु शास्त्र समोर ठेवून एखाद्या कार्यात प्रवृत्त अथवा निवृत्त झाल्यास राग-द्वेष नष्ट होतात. कारण शास्त्रानुसार वर्तन झाल्यास आपल्या रुची अथवा अरुचीचे प्राधान्य राहत नाही. जर एखादा मनुष्य शास्त्राला जाणत नसेल तर त्यासाठी महर्षी वेद व्यासजींचे वचन आहे—

**श्रूयतां धर्म सर्वस्वं श्रुत्वा चैवावधार्यताम्।**
**आत्मनः प्रतिकूलानि परेषां न समाचरेत्॥**

(पद्मपुराण, सृष्टि० १९।३५५-५६)

"हे मनुष्यांनो, तुम्ही धर्माचे सार ऐका आणि ऐकून त्याप्रमाणे आचरण करा की, जे आम्ही आपल्यासाठी इच्छित नाहीत ते दुसऱ्यासाठी करू नये"

जीवन्मुक्त महापुरुषसुद्धा शास्त्रमर्यादेलाच आदर देतात. म्हणूनच श्राद्धाचे वेळी पिंडदान करताना आपल्या वडिलांचा हात प्रत्यक्ष दिसत असूनसुद्धा भीष्माचार्यांनी शास्त्राज्ञेनुसार कुशावरच (दर्भावरच) पिंडदान केले (महाभारत, अनुशासन० ८४।१५-२०) म्हणून साधकाने संपूर्ण कर्म शास्त्राज्ञेनुसारच करीत जावे.

राग-द्वेष नष्ट करू इच्छिणाऱ्या साधकासाठी तर कर्म करण्यासाठी शास्त्र प्रमाणाची आवश्यकता असते. परंतु राग-द्वेषापासून संपूर्णपणे रहित असलेल्या महापुरुषांचे अंत:करण इतके शुद्ध, निर्मळ असते की, त्यामध्ये आपोआप वेदाचे तात्पर्य (सार) प्रगट होत असते. मग तो सुशिक्षित असो अथवा अशिक्षित. त्याच्या अंत:करणात जी गोष्ट येते ती शास्त्रानुकूलच असते. * राग-द्वेषाचा संपूर्णपणे अभाव असल्याकारणाने त्या महापुरुषाकडून शास्त्रनिषिद्ध क्रिया कधी होतच नाही. त्याचा स्वभाव सहजच शास्त्रानुसार घडत असतो. हेच कारण आहे की, अशा महापुरुषाचे आचरण आणि वचन दुसऱ्या मनुष्यांसाठी आदर्श होत असते. (३।२१) म्हणून त्या महापुरुषाच्या आचरणाचे आणि वचनाचे अनुकरण करण्याने साधकाचे राग-द्वेष नष्ट होतात.

काही लोक असे समजतात की, राग-द्वेष अंत:-करणाचे धर्म आहेत म्हणून यांना नष्ट केले जाऊ शकत नाही. परंतु ही गोष्ट युक्तिसंगत दिसत नाही. वास्तविक पाहता राग-द्वेष अंत:करणाचे आगंतुक विकार आहेत, धर्म नव्हे. जर हे अंत:करणाचे धर्म असते तर ज्यावेळी अंत:करण जागृत असते त्यावेळी राग-द्वेषही राहिले असते अर्थात् यांची नेहमीच प्रचीती आली असती. परंतु यांची प्रचीती नेहमी येत नसून कधी कधीच येत असते. साधन करीत राहिल्यास राग-द्वेष वरचेवर कमी होत जातात—हा साधकांचा अनुभव आहे. कमी होणारी वस्तू नष्ट होणारी असते. यावरुनही सिद्ध होते की, राग-द्वेष अंत:करणाचे धर्म नाहीत. भगवंतांनी राग-द्वेषांना ''मनोगत'' म्हटले आहे—''**कामान् सर्वान् पार्थ मनोगतान्**'' (२।५५) अर्थात् हे मनामध्ये येणारे आहेत नेहमी राहणारे नव्हेत. या व्यतिरिक्त भगवंतांनी राग-द्वेषाला विकार म्हटले आहे (१३।६) आणि प्रिय-अप्रियच्या प्राप्तीमध्ये चित्ताच्या सर्वकाळ सम राहण्यास साधन म्हटले आहे (१३।९) जर राग-द्वेष अंत:करणाचे धर्म असते तर समत्व चित्तरूपी साधन होऊच शकले नसते. धर्म स्थायी राहत असतो आणि विकार अस्थायी असतात अर्थात् येणारे जाणारे असतात. राग-द्वेष अंत:करणात येणारे-जाणारे आहेत म्हणून यांना नष्ट केले जाऊ शकते.

प्रकृती (जड) आणि पुरुष (चेतन) दोन्ही निरनिराळे आहेत. या दोन्हींचा विवेक स्वयंसिद्ध आहे. पुरुष या विवेकाला महत्त्व न देऊन प्रकृतिजन्य शरीराशी एकता करून घेतो आणि आपल्याला एकदेशीय समजतो. हे जड चेतनाचे तादात्म्यच ''अहम्'' म्हटले जाते आणि यामध्येच राग-द्वेष राहतात. तात्पर्य अहंतेत (मीपणा) राग-द्वेष राहतात आणि राग-द्वेषाने अहंता पुष्ट होते. हेच राग-द्वेष बुद्धीच्या ठिकाणी प्रतीतीस येतात, ज्यामुळे बुद्धीच्या ठिकाणी सिद्धांतांना अनुलक्षून आपली मान्यता प्रिय आणि दुसऱ्याची मान्यता अप्रिय वाटू लागते. नंतर हे राग-द्वेष मनामध्ये प्रतीतीस येतात त्यामुळे मनाला अनुकूल वाटणाऱ्या गोष्टी प्रिय आणि प्रतिकूल वाटणाऱ्या गोष्टी अप्रिय वाटू लगतात. नंतर हेच राग-द्वेष इंद्रियांचे ठिकाणी प्रतीतीस येतात त्यामुळे इंद्रियांना अनुकूल असणारे विषय प्रिय आणि प्रतिकूल असणारे विषय अप्रिय वाटू लागतात. हेच राग-द्वेष इंद्रियांच्या विषयाचे ठिकाणी (शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध) आपल्या अनुकूल आणि प्रतिकूल भावनेनुसार प्रतीतीस येतात. म्हणून जड-चेतनाची ग्रंथीरूपी अहंता (मीपणा) नष्ट झाल्यास राग-द्वेषाचा संपूर्णपणे अभाव होऊन जातो. कारण अहंतेवरच राग-द्वेष टिकून राहिले आहेत.

मी सेवक आहे, मी जिज्ञासु आहे, मी भक्त आहे हे सेवक, जिज्ञासु आणि भक्त ज्या ''मी'' मध्ये राहतात त्याच ''मी'' मध्यें राग-द्वेष सुद्धा राहतात. राग-द्वेष केवळ जडामध्ये राहत नाहीत आणि केवळ चेतनामध्येही राहत नाहीत तर जड-चेतन च्या मानलेल्या संबंधात असतात. जड-चेतनाच्या मानलेल्या संबंधात राहत असूनही हे राग-द्वेष प्रामुख्याने जडाचे ठिकाणीच असतात. जड-चेतनाच्या तादात्म्यामध्ये जडाचे आकर्षण जड अंशामध्येच होत असते. परंतु तादात्म्यामुळे ते चेतनामध्ये दिसून येते. जडाचे आकर्षणच राग आहे. म्हणून जेव्हा साधक शरीरा (जड) लाच आपले स्वरूप समजतो तेव्हा त्याला राग-द्वेष नष्ट करणे

* जो पुरुष धर्माचा कधीही परित्याग करीत नाही त्याचे अंत: करणसुद्धा शुद्ध होते. राजा दुष्यंताचे वर्णन करताना महाकवि कालिदास म्हणतात—

सतां हि सन्देहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्त:करणप्रवृत्तय: ॥

(अभिज्ञान शाकुन्तलम् १।२१)

ज्या ठिकाणी संदेह असतो, त्या ठिकाणी सत्पुरुषाच्या अंत:करणाची प्रवृत्तीच प्रमाण ठरत असते.

कठीण जाते. परंतु आपल्या चेतन स्वरूपाकडे दृष्टी राहिल्यास त्याला राग-द्वेष नष्ट करणे कठीण जात नाही. कारण राग-द्वेष स्वयं सिद्ध नाहीत तर जड (असत्) च्या संबंधाने उत्पन्न होणारे आहेत.

जर सत्सङ्ग, भजन, ध्यान इत्यादीमध्ये "राग" असेल तर संसाराशी द्वेष होईल. परंतु "प्रेम" झाल्यास संसाराशी द्वेष होणार नाही तर संसाराची उपेक्षा (विमुखता) होईल. *संसाराच्या कोणत्याही एखाद्या विषयात "राग" झाल्यास दुसऱ्या विषयात द्वेष होतो परंतु भगवंताचे ठिकाणी "प्रेम" झाल्यास संसाराविषयी वैराग्य होते. वैराग्य निर्माण झाल्यास संसारापासून सुख घेण्याची भावना समाप्त होते आणि आपोआप संसाराची सेवा होऊ लागते. यामुळे शरीर, इंद्रिये, मन, आणि बुद्धीबरोबर "अहम्" सुद्धा आपोआप संसार सेवेत लागतो. परिणामी शरीरादी सोबत "अहम्" शी असलेला संबंधसुद्धा विच्छेद झाल्याने त्यात राहणारे राग-द्वेष संपूर्णपणे नष्ट होतात.

मनुष्याच्या क्रिया स्वभाव अथवा सिद्धांतानुसार असतात. केवळ अध्यात्मिक उन्नतीसाठी कर्म करणे सिद्धांताला अनुसरुन कर्म करणे आहे. स्वभाव दोन प्रकारचा असतो—रागद्वेषरहित (शुद्ध) आणि रागद्वेषयुक्त (अशुद्ध). स्वभावाला नष्ट तर करू शकत नाहीत परंतु त्याला शुद्ध अर्थात् राग द्वेष-रहित अवश्य करू शकतो. जसे गंगा गंगोत्रीहून निघते, गंगोत्री हे स्थान जितक्या उंचीवर आहे तेवढा अथवा त्यापेक्षा अधिक उंचीचा बांध घालून गंगेचा प्रवाह, रोखला जाऊ शकतो. परंतु असे करणे सोपे काम नाही. एक गोष्ट मात्र जरूर आहे की, गंगेतून कालवे काढल्यास तिचा प्रवाह बदलला जाऊ शकतो. त्याच प्रकारे स्वाभाविक कर्माच्या प्रवाहाला नष्ट तर करणे शक्य नाही परंतु त्याला बदलले जाऊ शकते अर्थात् त्याला रागद्वेषरहित करता येणे शक्य आहे—हा गीतेचा मार्मिक सिद्धांत आहे. राग द्वेषाला अनुलक्षून ज्या क्रिया होतात त्याविषयी प्रवृत्ती आणि निवृत्ती तितकी बाधक नाही जितके राग-द्वेष बाधक आहेत. म्हणूनच भगवंतांनी राग-द्वेषाचा त्याग करणाऱ्यांनाच खरे त्यागी म्हटले आहे (१८।१०). राग-द्वेषाकडे बहुतेक साधकाचे लक्ष जात नाही. म्हणून त्याची प्रवृत्ती आणि निवृत्ती राग द्वेषपूर्वक होत असते. म्हणून राग द्वेषरहित होण्यासाठी साधकाने सिद्धांताला समोर ठेवूनच सर्व क्रिया कराव्या. मग त्याचा स्वभाव आपोआप सिद्धांतानुरूप आणि शुद्ध होऊन जाईल.

**राग**—द्वेषयुक्त स्फूर्ती निर्माण झाल्यास त्यानुसार कर्म करण्याने राग-द्वेष पुष्ट होतात आणि त्या अनुरूप कर्म न करता सिद्धांतानुसार कर्म करण्याने राग-द्वेष नष्ट होतात.

मनाच्या शुभाशुभ स्फूर्तीमध्ये राग-द्वेष असावयास नको. साधकाने मनात होणाऱ्या स्फूर्तींना "स्व" च्या ठिकाणी न मानता त्याच्याशी कोणत्याही प्रकारचा संबंध जोडू नये, त्याचे समर्थनही करू नये आणि विरोधही करू नये.

जर साधक राग-द्वेषाला नष्ट करण्यामध्ये आपल्याला असमर्थ समजत असेल तर त्याने सर्वसमर्थ परम सुहृद परमात्म्याला शरण जावे. मग प्रभूच्या कृपेने त्याचे राग-द्वेष नष्ट होतील. (७।१४) आणि परम शांतीची प्राप्ती होईल (१८।६२) मानलेल्या "अहम्" सहित शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, प्राण आणि सांसारिक पदार्थ सर्वचे सर्व भगवंताचेच आहेत—असे मानणेच भगवंताला शरण जाणे होय. मग भगवंताच्या प्रसन्नतेसाठी भगवंतांनी दिलेल्या सामुग्रीने भगवंताच्याच जनाची (जगताची) केवळ सेवा करावयाची आहे आणि मोबदल्यात आपल्यासाठी कशाचीही इच्छा करावयाची नाही. मोबदल्यात काही इच्छा ठेवल्यास जडाशी संबंध कायम राहतो.

निष्कामभावनेने संसाराची सेवा करणे राग-द्वेष नष्ट करण्याचा अचूक उपाय आहे. आपल्याजवळ स्थूल, सूक्ष्म आणि कारण—शरीरापासून मानलेल्या "अहम्" पर्यंत जे काही आहे, त्याला संसाराच्याच सेवेमध्ये वेचले पाहिजे. कारण हे सर्व पदार्थ तत्त्वत: संसाराशी अभिन्न आहेत. यांना संसारापासून भिन्न मानणे (आपले) हेच बंधन आहे. स्थूल शरीराने क्रियां आणि पदार्थांचे सुख, सूक्ष्मशरीराने चिंतनाचे सुख आणि कारणशरीराने स्थिरतेचे सुख घ्यावयास नको. वास्तविक पाहता मनुष्यशरीर आपल्या सुखासाठी नाहीच—

**एहि तन कर फल विषय न भाई।**

(मानस ७।४४।१)

* साधकाच्या ठिकाणी सत्संगाविषयी राग आहे अथवा प्रेम हे पुढील उदाहरणावरून आपण जाणून घेऊ शकतो. सत्संग, भजन, ध्यान, इत्यादी-मध्ये जर एखादी व्यक्ती बाधा आणीत असेल तर त्याचेविषयी क्रोध आल्यास समजावे की, सत्संग इत्यादीमध्ये "राग" आहे आणि (त्याचेविषयी क्रोध न येता) रडू आले तर समजावे की, सत्संग इत्यादीविषयी "प्रेम" आहे. कारण आपल्या ठिकाणी साधनाविषयी दृढतेची उणीव असल्यानेच बाधा वाटते. म्हणून बाधा झाल्यास आपल्यामध्ये दृढतेची उणीव पाहून साधकाला रडू कोसळते. त्याचप्रमाणे दुसरे धर्म संप्रदाय इत्यादीच्या व्यक्ती आपणाला वाईट दिसत असतील तर हे समजावे की, आपल्या धर्म, संप्रदाय इत्यादीमध्ये आपला "राग" आहे.

वास्तविक पाहिले तर सत्संग, भजन-ध्यान इत्यादीमध्ये राग असणेसुद्धा एवढे वाईट नाही. कारण काही का असेना भगवंताविषयी भक्ती होणे उत्तमच आहे.—"तस्मात् केनाप्युपायेन मन: कृष्णे निवेशयेत्।" (श्रीमद्भा० ७।१।३१)

दुसरी गोष्ट ज्या शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ इत्यादीकडून सेवा होते ते सर्व संसाराचेच अंश आहेत. जर संसारच आपला नाही तर मग त्याचा अंश आपला कसा होऊ शकतो? या शरीरादी पदार्थांना आपले मानल्याने खरी सेवा होऊच शकत नाही. कारण त्यामुळे ममता आणि स्वार्थभाव उत्पन्न होतो. म्हणून त्या पदार्थांना त्यांचेच समजावे ज्यांची सेवा केली जाईल. जसे भक्त पदार्थांना भगवंताचेच मानून भगवंतालाच अर्पण करतो—''**त्वदीयं वस्तु गोविंद तुभ्यमेव समर्पये**'' त्याप्रमाणे कर्मयोगी पदार्थांना संसाराचेच मानून संसारला अर्पण करतो.

## सेवासंबंधी मार्मिक संकेत

सेवा तोच करू शकतो जो आपल्यासाठी कधी काहीही मागत नाही. सेवा करण्यासाठी धनादी पदार्थांची इच्छा कामना आहेच, सेवा करण्याची इच्छासुद्धा कामनाच आहे. कारण सेवेची इच्छा झाल्यानेच धनादी पदार्थांची कामना निर्माण होते. म्हणून अवसर प्राप्त झाल्यास आणि योग्यता असल्यास सेवा करावी, परंतु सेवेची कामना करू नये.

दुसऱ्यांना सुख देऊन सुखी होणे ''माझ्या कडून लोकांना सुख मिळत आहे'' असा भाव ठेवणे, सेवेच्या मोबदल्यात किंचितसुद्धा मान-प्रतिष्ठेची इच्छा करणे आणि मान-प्रतिष्ठा प्राप्त झाल्यास राजी होणे, हा वास्तविक भोग आहे सेवा नव्हे. कारण असे करण्याने सेवा सुखभोगात परिणत होते अर्थात् सेवा आपल्या सुखासाठी होते. जर सेवा करताना थोडेसुद्धा सुख घेतले तर ते सुख धनादी पदार्थामध्ये महत्त्वबुद्धी उत्पन्न करते ज्यामुळे क्रमाने ममता आणि कामनेची उत्पत्ती होते.

''मी एखाद्याला काही देत आहे'' असा ज्याचा भाव आहे त्याला ही गोष्ट लक्षात येत नाही. तसेच दुसरा कोणी त्याला सोप्या रीतीने समजाऊ शकत नाही की, सेवेत उपयोगात येणारे पदार्थ त्याचेच आहेत, ज्याची सेवा केली जात आहे. ज्याची वस्तू त्यालाच दिली तर मग मोबदल्यात काही मागण्याचा आम्हाला अधिकारच काय आहे? ज्याची धरोहर त्याला वापस देण्यात उपकार कशाचा? आपल्या हाताने आपले तोंड धुतले तर मोबदल्यात आम्ही काही इच्छितो काय?

**शंका**—सेवा तर धनादी पदार्थाद्वाराच होते. पदार्थावाचून सेवा कशी होऊ शकते? म्हणून सेवा करण्यासाठी सुद्धा पदार्थांची इच्छा न करण्याचे काय तात्पर्य आहे?

**समाधान**—स्थूल पदार्थांनी सेवा करणे तर फारच स्थूल गोष्ट आहे. वास्तविक पाहिले तर सेवा भाव आहे कर्म नव्हे. कर्माने बंधन होते आणि सेवेने मुक्ती होते. सेवेचा भाव असल्यास आपल्याजवळ जे पदार्थ आहेत ते आपोआप सेवे-मध्ये उपयोगात येतील. भाव असल्यास आपल्याजवळ जेवढे पदार्थ आहेत, त्यांच्या योगानेच पूर्ण सेवा होईल. म्हणून दुसऱ्या पदार्थांची इच्छा करण्याची आवश्यकताच नाही.

वास्तविक सेवा पदार्थामध्ये महत्त्वबुद्धी न राहण्यानेच होऊ शकते. स्थूल पदार्थाच्या साहाय्याने देखील तोच सेवा करू शकतो ज्याची पदार्थाविषयी महत्त्वबुद्धी नाही. पदार्थामध्ये महत्त्वबुद्धी ठेवून सेवा करण्याने सेवेचा आभिमान येत असतो. जोपर्यंत अंत:करणात पदार्थांचे महत्त्व असते तोपर्यंत सेवकामध्ये भोगबुद्धी राहत असते मग ती कोणाला कळो अथवा न कळो.

वास्तविक सेवा भावाने होत असते वस्तूंमुळे नाही. वस्तूंमुळे कर्म होते सेवा नव्हे. म्हणून वस्तूंना देऊन टाकणे म्हणजे सेवा नव्हे. वस्तू तर दुकानदारही देत असतो. परंतु देण्याबरोबरच घेण्याचा भाव असल्याने त्याच्याकडून पुण्य होत नाही. त्याचप्रमाणे प्रजा राजाला कररूपाने धन देत असते परंतु ते दान होत नाही. एखाद्याला पाणी पाजले तर ''मी त्याला पाणी पाजले तेव्हाच तो सुखी झाला'' असा भाव असणे दुकान-दारीच आहे. आम्ही मान-प्रतिष्ठा इच्छित नाही परंतु ''पाणी पाजल्याने पुण्य होईल'' अथवा ''दान करण्याने पुण्य होईल'' असा भाव राहिल्यानेसुद्धा फलाशी संबंध होत असल्यामुळे अंत: करणात पाणी, धन इत्यादी वस्तूंचे महत्त्व अंकित होते. वस्तूंचे महत्त्व अंकित झाल्यास मग वास्तविक सेवा होत नाही तर घेण्याचा भाव असल्याने असत्‌शी संबंध कायम राहतो. मग तो कळो अथवा न कळो. म्हणून वस्तूंना दुसऱ्यांच्या सेवेत उपयोगात आणून दान-पुण्य करावयाचे नाही, तर त्या वस्तूंशी असलेला आपला संबंध-विच्छेद करावयाचा आहे.

आपल्याकडून वस्तू त्यालाच मिळू शकते ज्याचा त्या वस्तूवर अधिकार आहे अर्थात् वास्तविक ज्याची ती वस्तू आहे. त्याला वस्तू दिल्याने आपण उऋण होतो. जर दुसऱ्याला आपल्याकडून एखाद्या वस्तूची अधिक आवश्यकता असेल (भूक) तर त्या वस्तूचा तोच अधिकारी आहे असे समजावे. कारण दुसरा आपल्या अधिकाराचीच (हक्काची) वस्तू घेत असतो. आमच्या अधिकाराची वस्तू दुसरा घेऊच शकत नाही.

एक गोष्ट विशेष लक्ष देण्याची आहे की, शुद्ध अंत:-करणाने दुसऱ्याची सेवा करण्याने, ज्याची तो सेवा करतो, त्या (सेव्य) च्या अंत:करणातसुद्धा सेवाभाव जागृत होतो—हा नियम आहे. शुद्ध अंत:करणाने सेवा करणारा पुरुष स्थूल-दृष्टीने तर वस्तूंना सेव्याच्या सेवेत वेचतो. परंतु सूक्ष्मदृष्टीने पाहिले तर तो सेव्याच्या अंत:करणात सेवाभाव जागृत करीत

असतो. जर सेव्याच्या अंत:करणात सेवाभाव जागृत न झाला तर साधकाने हे समजून घ्यावे की, सेवा करण्यात आपली काही तरी उणीव (आपल्यासाठी काही मिळविण्याची किंवा घेण्याची इच्छा) आहे. म्हणून साधकाने या विषयात विशेष सावधानी ठेवूनच दुसऱ्याची सेवा केली पाहिजे आणि आपल्या उणीवांना शोधून कमी केले पाहिजे. दुसऱ्याने मला चांगले म्हणावे—असा भाव सेवा करताना मुळीच ठेवता कामा नये. असा भाव येताच त्याला तुरंत नष्ट केले पाहिजे कारण हा भाव अभिमान वाढविणारा आहे.

प्रत्येक साधकासाठी संसार केवळ कर्तव्यपालनाचे क्षेत्र आहे, सुखी-दु:खी होण्याचे क्षेत्र नव्हे. संसार सेवेसाठी आहे. संसारात साधकाने सेवाच सेवा केली पाहिजे. सेवा करताना साधकाचा सर्वात प्रथम असा भाव असला पाहिजे की, माझ्याकडून कोणाचेही किंचितमात्रसुद्धा अहित होऊ नये. संसारात काही प्राणी दु:खी असतात आणि काही प्राणी सुखी असतात. दु:खी प्राण्यांना पाहून दु:खी होणे आणि सुखी प्राण्यांना पाहून सुखी होणे हीसुद्धा सेवा आहे. कारण यामुळे दु:खी आणि सुखी—दोन्ही व्यक्तींना सुखाचा अनुभव होत असतो आणि त्यांना धैर्य येते की, आमचेसुद्धा कोणी सहाय्यक आहेत. दुसरा दु:खी असेल तर त्याच्याबरोबर आपणसुद्धा अंत:करणापासून दु:खी व्हावे की, त्याचे दु:ख कसे निवृत्त होईल? त्याच्याबरोबर प्रेमाने बोलावे आणि त्याचे म्हणणे ऐकून घ्यावे. त्याला म्हणावे की, प्रतिकूल परिस्थिती आली असता घाबरू नये. अशी परिस्थिती तर भगवान् राम तसेच राजा नल, हरिश्चंद्र इत्यादी अनेक थोर पुरुषांवर देखील आलेली आहे. आजकाल तर कित्येक लोक तुमच्यापेक्षाही जास्त दु:खी आहेत. आमच्या लायक एखादे काम असेल तर आम्हाला सांगा इत्यादी. अशा प्रकारच्या संभाषणामुळे तो खूश होईल. त्याचप्रमाणे सुखी व्यक्तीला भेटून आपणसुद्धा अंत:करणापासून सुखी व्हावे की, फार चांगले झाले तेव्हा तो खूश होईल. अशा प्रकारे आम्ही दु:खी आणि सुखी दोन्ही व्यक्तींची सेवा करू शकतो. दुसऱ्यांच्या दु:ख आणि सुख—दोन्हीविषयी सहमत होऊन आम्ही दुसऱ्यांना सुख पोहचवू शकतो. केवळ दुसऱ्याच्या हिताचा भाव निरंतर राहण्याची आवश्यकता आहे. जे दुसऱ्यांच्या दु:खाने दु:खी आणि दुसऱ्यांच्या सुखाने सुखी होतात ते संत असतात. गोस्वामी तुलशीदास महाराजांनी संतांच्या लक्षणात म्हटले आहे—

"**पर दुख दुख सुख सुख देखे पर**" मानस (७।३८।१)

या ठिकाणी अशी शंका येते की, जर आपण दुसऱ्याच्या दु:खाने दु:खी होऊ लागलो तर मग आपले दु:ख कधी निवृत्त होणारच नाही. कारण संसारात तर दु:खी व्यक्ती भेटतच राहणार. याचे समाधान असे आहे की, ज्याप्रमाणे आपल्यावर एखादे दु:ख कोसळले तर आपण ते निवृत्त करण्याचा प्रयत्न करतो त्याचप्रमाणे दुसऱ्याला दु:खी पाहून आपल्या शक्तिनुसार त्याचे दु:ख दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्याचे दु:ख दूर करण्याची भावना आपल्या अंत:-करणापासून असली पाहिजे. म्हणून दुसऱ्याच्या दु:खाने दु:खी होण्याचे तात्पर्य त्याच्या दु:खाला दूर करण्याचा भाव तसेच प्रयत्न करण्यात आहे ज्यामुळे आपल्याला प्रसन्नताच होईल दु:ख होणार नाही. दुसऱ्यांच्या दु:खाने दु:खी झाल्यास आपल्याजवळ शक्ती, योग्यता, पदार्थ इत्यादी जे काही आहे ते सर्व आपोआप दुसऱ्याचे दु:ख दूर करण्यात वेचले जाईल. दु:खी व्यक्तीला सुखी करणे तर आमच्या हातातली गोष्ट नाही. परंतु त्याचे दु:ख दूर करण्यासाठी आपल्या सुख सामुग्रीला त्याच्या सेवेत खर्च करणे आमच्या हातातली गोष्ट आहे. सुख सामुग्रीच्या त्यागाने तात्काळ शांती प्राप्त होते.

सेवा करण्याचा अर्थ आहे—सुख पोहोचविणे. साधकाचा भाव "**मा कश्चिद् दु:खभाग्भवेत्**" (कोणालाही किंचिन्मात्र दु:ख होऊ नये) असल्याने तो सर्वांना सुख पोहचवितो अर्थात् सर्वांची सेवा करतो. साधक जरी सर्वांना सुखी करू शकला नाही तरी तो असा भाव तर ठेवूच शकतो. भाव निर्माण करण्यात सर्व स्वतंत्र आहेत कोणीही पराधीन नाही. म्हणून सेवा करण्यात धनादी पदार्थांची आवश्यकता नाही, तर सेवा भावाचीच आवश्यकता आहे. क्रिया आणि पदार्थ मग ते कितीही असोत सीमितच असतात. सीमित पदार्थ आणि क्रियेने सेवा देखील सीमितच होते. मग सीमित सेवेने असीम तत्त्वा-(परमात्मा) ची प्राप्ती कशी होऊ शकेल? परंतु भाव असीम असतो. असीमभावाने सेवासुद्धा असीम होते आणि असीम सेवेने असीम तत्त्वाची प्राप्ती होते. म्हणून सेवाभाव असणाऱ्या व्यक्तीच्या क्रिया आणि पदार्थ कमी असल्या तरी त्याची सेवा कमी समजू नये, कारण त्याचा भाव असीम असतो.

जरी साधकाच्या कर्तव्यपालनाचे क्षेत्र सीमितच असते तरीपण त्याचे कडून ज्या ज्या व्यक्तीबरोबर त्याचा व्यवहार होत असतो, त्यावेळी तो सुखी व्यक्तीला पाहून सुखी आणि दु:खी व्यक्तीला पाहून दु:खी होत असतो. पदार्थ, शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी इत्यादीना जो आपले समजत नाही तोच दुसऱ्यांच्या सुखामध्ये सुखी आणि दु:खामध्ये दु:खी होऊ शकतो. शरीर, इंद्रिये, मन इत्यादी आपले आणि आपल्या-साठी नाहीतच—ही वास्तविकता आहे. देश, काल, वस्तू,

व्यक्ती, योग्यता, सामर्थ्य इत्यादी काहीही व्यक्तिगत नाही. या पदार्थांविषयी भ्रमाने मानलेल्या आपलेपणाचा त्याग प्रत्येक मनुष्य करू शकतो मग तो दरिद्राती-दरिद्र असो अथवा श्रीमंताती-श्रीमंत, सुशिक्षित असो किंवा अशिक्षित. ह्या त्यागात सर्वचे सर्व स्वाधीन तसेच समर्थ आहेत.

शुद्ध अंत: करणाच्या सेवकाची वृत्ती नाशवान वस्तूवर जातच नाही. कारण त्याच्या अंत:करणात वस्तूचे महत्त्व नसते. अंत:करणात वस्तूचे महत्त्व असल्यानेच वस्तू व्यक्तिगत (आपल्या) वाटतात. साधकाने प्रथमपासूनच असे समजावे की, वस्तू माझ्या नाहीत आणि माझ्यासाठीही नाहीत. वस्तूंना आपली आणि आपल्यासाठी मानल्याने भोगच होतो सेवा नव्हे. अशा प्रकारे वस्तूंना आपले आणि आपल्यासाठी न मानता सेव्याचीच समजून सेवेत वेचल्याने राग-द्वेष सुलभतेने नष्ट होतात.

**तौ ह्यस्य परिपन्थिनौ**—पारमार्थिक मार्गात राग-द्वेषच साधकाच्या साधन संपत्तीला लुटणारे मुख्य शत्रू आहेत. परंतु याकडे बहुतेक साधक लक्षच देत नाहीत. म्हणूनच साधन करूनसुद्धा साधकाची जेवढी अध्यात्मिक उन्नती व्हावयाला पाहिजे तेवढी होत नाही. बहुतेक साधकांची ही तक्रार असते की, मन लागत नाही. पण वास्तविक मनाचे न लागणे तेवढे बाधक नाही जेवढे बाधक राग-द्वेष आहेत. म्हणून साधकाने मनाच्या एकाग्रतेला महत्त्व देऊ नये आणि जेथे जेथे राग-द्वेष दिसत असतील त्या त्या ठिकाणाहून त्यांना तात्काळ नष्ट करावे. राग-द्वेष हटविले गेल्यास मन लागणेसुद्धा सुगम होऊन जाईल.

स्वाभाविक कर्मांचा त्याग करणे तर आपल्या हातातील गोष्ट नाही. परंतु त्या कर्मांचे राग-द्वेषपूर्वक करणे अथवा न करणे मात्र आपल्या अधीन आहे. साधक जे करू शकतो तेच करण्याविषयी भगवान् आज्ञा देत आहेत की, राग-द्वेषयुक्त स्फूर्ती उत्पन्न झाल्यावरसुद्धा त्यानुसार कर्म करू नका. कारण ते दोन्हीही पारमार्थिक मार्गातले लुटारू आहेत. असे करण्यात साधक स्वतंत्र आहे. वास्तविक पाहिले तर राग-द्वेष आपोआप नष्ट होत असतात. परंतु साधक त्या राग-द्वेषाला आपल्यात समजून त्यांना सत्ता देतो आणि त्यानुसार कर्म करू लागतो. ह्याच कारणामुळे ते निवृत्त होत नाहीत. जर साधकाने राग-द्वेषांना आपल्यात न समजता त्यानुसार कर्म केले नाही तर ते आपोआप नष्ट होऊन जातील.

**परिशिष्ट भाव**—सुख-दु:खाचे कारण दुसऱ्याला मानण्यानेच राग-द्वेष होतात. अर्थात् ज्याला सुख देणारा मानतात त्यात राग (आसक्ती) होतो आणि ज्याला दु:ख देणारा मानतो, त्याग द्वेष होतो. म्हणून राग-द्वेष आपल्या चूकीमुळे उत्पन्न होतात, यात दुसरे कोणी कारण नाही. राग-द्वेष झाल्यामुळेच संसार भगवत्स्वरूप दिसत नाही, तर जड आणि नाशवान् दिसतो. जर राग-द्वेष राहणार नाहीत तर जडता नाहीच, तर सर्व काही चिन्मय परमात्माच आहेत—'**वासुदेवः सर्वम्**' (गीता ७। १९).

जर मन-बुद्धीत राग-द्वेषादी कोणता दोष उत्पन्न झाला तर त्याच्या अधीन होऊ नये अर्थात् त्यानुसार कोणती निषिद्ध क्रिया करू नये. त्याच्या वशीभूत होऊन क्रिया केल्याने तो दोष दृढ होईल. परंतु त्याच्या वशीभूत होऊन क्रिया न केल्यास एक उत्साह निर्माण होईल. जसे, कोणी आपणाला शिविगाळ केली, परंतु आपणाला क्रोध आला नाही तर आपल्या अंत:करणात एक उत्साह, प्रसन्नता राहील की, आज आपण वाचलो. परंतु यात आपले बल न मानता भगवत्कृपा मानावी की, त्यांच्या कृपेनेच आपण वाचलो, नाही तर त्याच्या अधीन होत होतो. अशा प्रकारे साधकाला कधीही कोणता दोष दिसला तर त्याने त्याच्या अधीन होऊ नये आणि त्याला आपल्यातही मानू नये. जर राग-द्वेष आपल्यात असते तर जोपर्यंत आपली सत्ता राहते तोपर्यंत राग-द्वेष हेही राहिले असते. परंतु सर्वांचा असा अनुभव आहे की, आपण तर निरंतर राहतो, परंतु राग-द्वेष निरंतर राहत नाहीत, तर येत-जात राहतात. सत्तारूप स्वयं मध्ये राग-द्वेष येऊच शकत नाहीत. कारण आपला (स्वयंचा) विभाग वेगळा आहे आणि राग-द्वेषाचा विभाग वेगळा आहे. ज्याला राग-द्वेषाच्या येण्या-जाण्याचे ज्ञान होते, तो राग-द्वेषाहून वेगळा असतो. म्हणून राग-द्वेष आपल्याहूनही वेगळे आहेत आणि ज्यात हे प्रतीत होतात, त्या मन-बुद्धी इत्यादीहूनही वेगळे आहेत—'**मनोगतान्**' (गीता २। ५५).

'**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ**' या पदांचे तात्पर्य हे आहे की, अनुकूलता आणि प्रतिकूलता दोन्हीतही राग-द्वेष करू नये, तर त्यांचा सदुपयोग करावा अर्थात् अनुकूलतेत दुसऱ्यांची सेवा करावी आणि प्रतिकूलतेत अनुकूलतेच्या इच्छेचा त्याग करावा. '**तयोर्नवशमागच्छेत्**' पदांचे तात्पर्य हे आहे की, अनुकूलता-प्रतिकूलता यात सुखी-दु:खी होऊ नये. सुखी-दु:खी होणे फलासक्त होणे आहे आणि फलासक्त मनुष्य बांधला जातो—'**फले सक्तो निबध्यते**' (गीता ५। १२).

***संबंध***—*राग-द्वेषाला वश न होता काय केले पाहिजे आणि काय करता कामा नये याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः॥ ३५॥**

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **स्वनुष्ठितात्** | = चांगल्या प्रकारचे आचरण असलेल्या | **स्वधर्मः** | = आपला धर्म | **श्रेयः** | = कल्याणकारक आहे. (आणि) |
| **परधर्मात्** | = दुसऱ्याच्या धर्मापेक्षा | **श्रेयान्** | = श्रेष्ठ आहे. | **परधर्मः** | = दुसऱ्याचा धर्म |
| **विगुणः** | = कमी गुण असणारा | **स्वधर्मे** | = आपल्या धर्मात (तर) | **भयावहः** | = भय देणारा आहे. |
| | | **निधनम्** | = मृत्यू होणे (ही) | | |

*व्याख्या*— **श्रेयान् *स्वधर्मो विगुणः परधर्मात्-स्वनुष्ठितात्**—इतर वर्ण, आश्रम इत्यादींचा धर्म (कर्तव्य) बाहेरुन पाहता गुणसंपन्न असेल, त्याच्या पालनातसुद्धा सुगमता असेल, पालन करण्यात मनही लागत असेल, धन-वैभव सुख-सुविधा, मान-प्रतिष्ठा इत्यादिसुद्धा मिळत असतील आणि जीवनभर सुख आणि आरामातही रहावयास मिळत असेल तरीसुद्धा त्या परधर्माचे पालन आपल्यासाठी विहित नसल्याने परिणामी दुःख आणि भयदायकच आहे. या उलट आपल्या वर्णाश्रमाचा धर्म बाहेरुन पाहता गुणांनी कमी असेल, त्याचे पालन करणेही कठीण असेल, पालन करण्यात मन देखील लागत नसेल, धन-वैभव, सुख-सुविधा, मान-प्रतिष्ठा इत्यादी-सुद्धा मिळत नसतील आणि त्याचे पालन करताना जीवनभर कष्टसुद्धा सहन करावे लागतील तरीसुद्धा त्या स्वधर्माचे निष्कामभावनेने पालन करणे परिणामी कल्याण करणारे आहे. म्हणून मनुष्याने कोणत्याही स्थितीत आपल्या धर्माचा त्याग करू नये तर निष्काम, निर्मम आणि अनासक्त होऊन स्वधर्माचेच पालन केले पाहिजे.

मनुष्यासाठी स्वधर्माचे पालन स्वाभाविक आहे, सहज आहे. मनुष्याचा जन्म कर्मानुसार होत असतो आणि जन्मानुसार भगवंतांनी "कर्म" निश्चित केले आहेत. (१८।४१). म्हणून आपापल्या नियतकर्माचे पालन केल्याने मनुष्य कर्मबंधनातून मुक्त होतो अर्थात् त्याचे कल्याण होते (१८।४५). म्हणून दोषयुक्त दिसत असले तरी नियतकर्म अर्थात् स्वधर्माचा त्याग करू नये (१८।४८)

अर्जुन युद्ध करण्यापेक्षा भिक्षेवर जगणेच श्रेष्ठ समजत आहेत (२।५). परंतु येथे भगवान् अर्जुनाला जणू हे समजवितात की, भिक्षेवर निर्वाह करणे भिक्षुकासाठी स्वधर्म असला तरी तुझ्यासाठी परधर्म आहे. कारण तू गृहस्थी, क्षत्रिय आहेस, भिक्षुक नव्हे. पहिल्या अध्यायातसुद्धा जेव्हा अर्जुनाने म्हटले की, युद्ध करण्याने पापच लागेल "**पापमेवाश्रयेत्**" (१।३६) तेव्हासुद्धा भगवंतांनी म्हटले की, धर्मयुद्ध न करण्याने तू स्वधर्म आणि कीर्तीला गमावून पापालाच प्राप्त होशील (२।३३) नंतर भगवंतांनी सांगितले की, जय-पराजय लाभ-हानी आणि सुख-दुःख यांना समान समजून युद्ध करण्याने अर्थात् राग-द्वेषरहित होऊन आपल्या कर्तव्याचे (धर्म) पालन करण्याने पाप लगत नाही (२।३८), पुढे अठराव्या अध्यायातसुद्धा भगवंतांनी हीच गोष्ट सांगितली आहे की, स्वभावनियत, स्वधर्मरूपी कर्तव्यकर्म करणारा मनुष्य पापाला प्राप्त होत नाही (१८।४७). तात्पर्य स्वधर्माचे पालन करताना राग-द्वेष राहिले तरच पाप लागते अन्यथा नव्हे. राग-द्वेषरहित होऊन स्वधर्माचे योग्य प्रकारे आचरण करण्याने समतेचा (योगाचा) अनुभव येतो आणि समतेचा अनुभव झाल्यास दुःखाचा नाश होतो (६।२३). म्हणून भगवान् वारंवार अर्जुनाला राग-द्वेषरहित होऊन युद्धरूपी स्वधर्माचे पालन करण्यावर विशेष भर देत आहेत.

भगवान् अर्जुनाला जणू हे समजावीत आहेत की, क्षत्रिय कुलात जन्म झाल्यामुळे क्षत्रिय धर्माच्या नात्याने युद्ध करणे तुझा स्वधर्म (कर्तव्य) आहे. म्हणून युद्धातील जय-पराजय, लाभ-हानी आणि सुख-दुःखाला समान समजावयाचे आहे आणि युद्धरूपी क्रियेचा संबंध आपल्याशी नाही असे समजून केवळ कर्मांची आसक्ती नष्ट करण्यासाठी कर्म करावयाचे आहे. शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, पदार्थ इत्यादी आपल्या कर्तव्य पालनासाठीच आहेत.

वर्ण आश्रम इत्यादीनुसार आपापल्या कर्तव्याचे निः-स्वार्थभावाने पालन करणे हाच "स्वधर्म" आहे. आस्तिक लोक ज्याला "धर्म" म्हणतात, त्याचेच नाव "कर्तव्य" आहे. स्वधर्माचे पालन करणे अथवा आपल्या कर्तव्याचे पालन करणे एकच गोष्ट आहे.

कर्तव्य त्याला म्हणतात ज्याला सुगमतेने करता येणे शक्य आहे, जे अवश्य करण्यायोग्य आहे आणि जे केल्याने प्राप्तव्याची प्राप्ती अवश्य होते. धर्माचे पालन करणे सुगम असते कारण ते कर्तव्य असते. हा नियम आहे की, केवळ आपल्या धर्माचे योग्य प्रकारे पालन केल्यास मनुष्याला वैराग्य निर्माण होते—"**धर्म ते बिरति.....**" मानस (३।१६।१) केवळ कर्तव्य मात्र समजून धर्माचे पालन करण्याने कर्माचा प्रवाह प्रकृतीमध्ये समाविष्ट होतो आणि अशा प्रकारे आपल्याशी कर्माचा संबंध राहत नाही.

* अर्जुनाच्या मूळ प्रश्नात आलेले "ज्यायसी" (३।१) आणि येथे आलेले "श्रेयान्" दोन्ही शब्द एकच आहेत. यावरुन असे वाटते की, भगवंतांनी अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर प्रामुख्याने याच श्लोकामध्ये दिले आहे.

वर्ण, आश्रम इत्यादीनुसार सर्व माणसांचे आपापले कर्तव्य (स्वधर्म) कल्याणप्रद आहे. परंतु दुसऱ्या वर्ण, आश्रम इत्यादींचे कर्तव्य पाहण्याने आपले कर्तव्य तुलनेने कमी गुणांचे दिसते. जसे ब्राह्मणाच्या कर्तव्या (शम, दम, तप, क्षमा इत्यादी) पेक्षा क्षत्रियांच्या कर्तव्या (युद्धकरणे इत्यादी) मध्ये अहिंसादी गुणांची उणीव दिसते. म्हणून येथे **''विगुणः''** पद देण्याचा भाव असा आहे की, दुसऱ्यांच्या कर्तव्यापेक्षा आपल्या कर्तव्यात गुणांची उणीव दिसत असली तरी, आपले कर्तव्यच कल्याण करणारे आहे. म्हणून कोणत्याही अवस्थेत आपल्या कर्तव्याचा त्याग करू नये.

वर्ण आश्रम इत्यादीनुसार बाह्यदृष्टीने तर कर्म निर-निराळे (घोर अथवा सौम्य) प्रतीत होतात. परंतु परमात्म-प्राप्तीरूपी उद्देश एकच असतो. परमात्मप्राप्तीचा उद्देश न राहण्याने, तसेच अंत:करणात प्राकृत पदार्थांचे महत्त्व राहण्यानेच कर्म घोर अथवा सौम्य प्रतीत होतात.

**स्वधर्मे निधनं श्रेयः**—स्वधर्म पालन करण्यात जर नित्य सुख-आराम, धन-संपत्ती, मान-प्रतिष्ठा, आदर-सत्कार, इत्यादीच जर मिळत असते तर वर्तमान काळात धर्मात्म्यांचे समूह दिसले असते. परंतु स्वधर्माचे पालन सुख अथवा दु:खाकडे पाहून केले जात नाही तर भगवंताच्या अथवा शास्त्राच्या आज्ञेनुसार निष्कामभावाने केले जाते. म्हणून स्वधर्म अर्थात् आपल्या कर्तव्याचे पालन करीत असताना जर काही त्रास झाला तर तो त्रास देखील उन्नतिकारकच ठरत असतो. वास्तविक तो त्रास नसतो तर ते तप होते. त्या त्रासामुळे तपापेक्षासुद्धा फार लवकर उन्नती होते. कारण तप आपल्यासाठी केले जाते आणि कर्तव्य दुसऱ्यासाठी! जाणून केल्या गेलेल्या तपाने तेवढा लाभ होत नाही जेवढा लाभ आपोआप झालेल्या त्रासरूपी तपाने होतो. ज्यांनी स्वधर्माचे पालन करताना अत्यंत कष्ट सोसले आणि आपला देह ठेवला ते धर्मात्मा पुरुष अमर झाले. लौकिक दृष्टीनेसुद्धा जो पुरुष त्रास झाला तरी आपल्या धर्मापासून (कर्तव्य) ढळत नाही, टिकून राहतो त्याची जगामध्ये खूपच प्रशंसा होत असते आणि त्याचा महिमा वर्णिला जातो. ज्याप्रमाणे देशाला स्वतंत्र करण्यासाठी ज्या पुरुषांनी अत्यंत कष्ट सहन केले, वारंवार तुरुंगवास भोगला, फासावर चढले त्यांची आजही खूप प्रशंसा केली जाते आणि महिमा वर्णिला जातो. या उलट वाईटकर्म करून तुरुंगात जाणाऱ्यांची सर्व ठिकाणी निंदा होते. तात्पर्य हे निघाले की, निष्कामभावनेने आपल्या धर्माचे पालन करीत असताना कष्ट सहन करावे लागले अथवा मृत्यूही झाला तरीही त्यामुळे ह्या लोकामध्ये प्रशंसा आणि परलोकात कल्याणच होते.

स्वधर्माचे पालन करणाऱ्या मनुष्याची दृष्टी धर्मावर असते. धर्मावर दृष्टी असल्याने त्याचा धर्माशी संबंध असतो. म्हणून धर्म पालन करताना जर मृत्यूही झाला तरी त्याचा उद्धार होतो.

**शंका**—स्वधर्माचे पालन करीत असता मृत्यू झाल्यास कल्याण होते यावर कसा विश्वास करावा?

**समाधान**—गीता साक्षात भगवंताची वाणी आहे म्हणून या विषयी शंकाच संभवत नाही. दुसरी गोष्ट हा विषय प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहण्याचा नाही, तर श्रद्धा विश्वासाचा विषय आहे. तरी परंतु या विषयाविषयी काही गोष्टी सांगता येतात.

(१) ज्या विषयाचे ज्ञान आम्हाला नाही, त्याचे ज्ञान शास्त्राकरवी होत असते.* शास्त्रात असे वर्णन आढळते की, जो धर्माचे रक्षण करतो त्याचे रक्षण (कल्याण) धर्म करतो **''धर्मो रक्षति रक्षितः।''** (मनुस्मृति ८।१५) म्हणून जो धर्माचे पालन करतो त्याच्या कल्याणाचा भार धर्मावर आणि धर्माविषयी उपदेश करणाऱ्या भगवंतावर, वेद, शास्त्र, ऋषी, मुनी इत्यादींवर असतो. तसेच त्यांच्या शक्तीनेच त्याचे कल्याण होते. जसे आमच्या शास्त्रात वर्णन आले आहे की, पतिव्रता-धर्माचे पालन केल्याने स्त्रीचे कल्याण होते तर त्या ठिकाणी पतिव्रता-धर्माची आज्ञा देणारे भगवान्, वेद, शास्त्र इत्यादीच्या शक्तीनेच त्या पतिव्रतेचे कल्याण होते, पतीच्या शक्तीने नव्हे. त्याचप्रमाणे धर्माचे पालन करण्यासाठी भगवान्, वेद, शास्त्र, ऋषी-मुनी आणि संत महात्म्यांची आज्ञा आहे म्हणून धर्म पालन करीत असता मृत्यू झाल्यास त्यांच्या शक्तीने कल्याण होते याविषयी किंचिन्मात्रसुद्धा संशय नाही.

(२) पुराणे आणि इतिहासातूनही सिद्ध होते की, आपल्या धर्माचे पालन करणाऱ्याचे कल्याण होते. जसे राजा हरिश्चंद्र, अनेक कष्ट, निंदा, अपमान इत्यादी झाले तरी आपल्या ''सत्य'' धर्मापासून विचलित झाले नाहीत म्हणून त्यांच्या प्रभावाने ते सर्व प्रजेला बरोबर घेऊन परमधामाला प्राप्त झाले.†आणि आजही त्यांची विशेष प्रशंसा आणि महिमा आपण

* अनेकसंशयोच्छेदि परोक्षार्थस्य दर्शकम्। सर्वस्य लोचनं शास्त्रं यस्य नास्त्यन्ध एव सः।

जे अनेक संशयांना दूर करणारे आणि परोक्ष (अप्रत्यक्ष) विषयाला दाखविणारे आहे ते शास्त्र सर्वांचे नेत्र आहे. म्हणून ज्याला शास्त्राचे ज्ञान नाही तो आंधळाच आहे.

† द्रष्टव्य—मार्कण्डेय पुराण, देवी भागवत इत्यादी.

वर्णन करतो.

(३) वर्तमानकाळात पुनर्जन्मसंबंधी अनेक सत्य घटना पाहण्यात, ऐकण्यात आणि वाचण्यात येतात ज्यामुळे मृत्यूनंतर मिळणाऱ्या सद्गती-दुर्गतीचा पत्ता लागतो.*

(४) नि:स्वार्थभावनेने आपल्या कर्तव्याचे योग्य प्रकारे पालन झाल्यास आस्तिक मनुष्याची गोष्ट तर सोडाच, परलोक न मानणाऱ्या नास्तिकाच्यासुद्धा चित्तामध्ये सात्त्विक प्रसन्नता निर्माण होते. ही प्रसन्नता कल्याणाचे द्योतक आहे. कारण कल्याणाचे वास्तविक स्वरूप "परमशांती" आहे. म्हणून आपल्या अनुभवानेही सिद्ध होते की, अकर्तव्याचा संपूर्णपणे त्याग करून कर्तव्याचे पालन झाल्यास कल्याण होते.

## मार्मिक गोष्ट

"स्व" परमात्म्याचा अंश असल्याने आपले कल्याण करणे, आपल्याला भगवंताचे समजणे, भगवंतावाचून कोणालाही आपले न मानणे, आपणाला जिज्ञासू मानणे, आपणाला सेवक समजणे—वास्तविक स्वधर्म आहेत. कारण हे सर्व सत्य धर्म आहेत. खास "स्व" चे धर्म आहेत, मन बुद्धीचे धर्म नव्हेत. या शिवाय, वर्ण, आश्रम, शरीर इत्यादींना अनुसरून जेवढे म्हणून धर्म आहेत ते आपल्या कर्तव्य पालनासाठी स्वधर्म असूनसुद्धा परधर्मच आहेत. कारण ते सर्व धर्म मानलेले आहेत "स्व" चे नव्हेत. त्या सर्व धर्मामध्ये दुसऱ्याच्या मदतीची आवश्यकता आहे अर्थात् त्यामध्ये परतंत्रता राहते. परंतु जो आपला मुख्य धर्म आहे त्यामध्ये कोणाच्या मदतीची अवश्यकता नसते. अर्थात् त्यामध्ये स्वतंत्रता असते. म्हणून जो प्रेमी होतो तो "स्व" होतो, जिज्ञासु होतो तो "स्व" होतो आणि सेवक होतो तो "स्व" होतो. म्हणून प्रेमी प्रेमाकार होऊन प्रेमास्पदाशी तादात्म्य पावतो, जिज्ञासू जिज्ञासेने ज्ञातव्य तत्त्वाशी तादात्म्य पावतो आणि सेवक सेवास्वरूप होऊन सेव्याशी तादात्म्य पावतो. त्याचप्रमाणे साधक देखील साधनाशी एकरूप झाल्याने साध्यस्वरूप होतो.

परमात्मप्राप्तीची इच्छा असणाऱ्या साधकांना धन, मान, प्रतिष्ठा, आदर, आराम, इत्यादी मिळविण्याची इच्छा नसते. म्हणून धन, मानादी न मिळाल्यास त्याला कसलीही चिंता राहत नाही आणि जर प्रारब्धवशात् ह्या गोष्टी मिळाल्या तर त्याला प्रसन्नताही नसते. कारण त्याचे ध्येय केवळ परमात्म्याला प्राप्त करणेच असते, धन-मानादींना प्राप्त करणे नव्हे. म्हणून कर्तव्यरूपी प्राप्त लौकिक कार्य सुद्धा त्याच्याकडून काळजीपूर्वक आणि पवित्रतापूर्वक होत असतात. परमात्मप्राप्तीचा उद्देश असल्याने त्याचे सर्व कर्म परमात्म्यासाठीच होतात. जसे धनप्राप्तीचे ध्येय असल्यास व्यापारी आरामाचा त्याग करतो आणि कष्ट सहन करतो आणि जसे डॉक्टरकडून एखाद्या फोडाची शस्त्रक्रिया करताना "याचा परिणाम आपल्याला अनुकूल होईल" याकडे दृष्टी राहण्याने रोग्याचे अंत:करण प्रसन्न असते, तसेच परमात्मप्राप्तीचे ध्येय असल्याने संसारामध्ये पराजय, हानी, कष्ट इत्यादी प्राप्त झाल्यावरसुद्धा साधकाच्या अंत:-करणात स्वाभाविक प्रसन्नता राहते. सर्व काही अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती त्याच्यासाठी साधनसामुग्री असते.

जेव्हा साधक आपले कल्याण करण्याविषयीचा दृढनिश्चय करून स्वधर्म (आपले स्वाभाविक कर्म) च्या पालनामध्ये तत्परतेने स्वत: ला वाहून घेतो तेव्हा, कोणतेही कष्ट, दु:ख, अडचण इत्यादी आले तरी तो स्वधर्मापासून विचलित होत नाही. एवढेच नव्हे तर ते कष्ट, दु:ख, इत्यादी त्याला तपश्चर्येच्या रूपाने प्रसन्नता देणारे ठरतात. शरीराला मी आणि माझे समजल्यानेच संसारात राग-द्वेष होतात. राग-द्वेष राहिल्याने मनुष्याला स्वधर्म-परधर्माचे ज्ञान राहत नाही. जर शरीर "मी" (स्वरूप) असते तर "मी" असताना शरीरही राहिले असते आणि शरीराच्या नष्ट होण्याबरोबर "मी" देखील नष्ट झाला असता. जर शरीर "माझे" असते तर हे मिळविल्यानंतर आणखी काही मिळविण्याची इच्छा राहिली नसती. जर इच्छा शिल्लक राहते तर हे सिद्ध होते की, वास्तविक "माझी" (आपली) वस्तू अद्याप मला मिळाली नाही आणि मिळालेली वस्तू (शरीरादी) "माझी" नाही. शरीराला बरोबर आणले नाही, बरोबर घेऊन जाऊ शकत नाही, त्यात इच्छेनुसार परिवर्तन करू शकत नाही, मग ती "माझी" कशी? अशा प्रकारे "शरीर मी नाही आणि माझे नाही" याचे ज्ञान (विवेक) सर्व साधकांना राहते. परंतु या ज्ञानाला महत्त्व न दिल्याने त्याचे राग-द्वेष नष्ट होत नाहीत. जरी शरीरामध्ये कधी मीपणा आणि माझेपणा दिसला तरी साधकाने त्याला महत्त्व न देता आपल्या विवेकालाच महत्त्व दिले पाहिजे. अर्थात् "शरीर मी नाही आणि माझे नाही" याच तत्त्वावर दृढ राहिले पाहिजे. आपल्या विवेकाला महत्त्व दिल्याने वास्तविक तत्त्वाचा बोध होतो. बोध झाल्याने राग-द्वेष राहत नाहीत. राग-द्वेष न राहिल्यास अंत:करणामध्ये

* द्रष्टव्य—"कल्याण" मासिकाच्या ४३ व्या वर्षाचा (१९६८) चा विशेष अंक "परलोक आणि पुनर्जन्माङ्क".

स्वधर्म-परधर्माचे ज्ञान आपोआप प्रगट होते आणि त्यानुसार आपोआप क्रिया होतात.

**परधर्मो भयावहः**—जरी परधर्माचे पालन वर्तमान काळात् सुगम दिसते तरीपण परिणामी ते सिद्धांताच्या दृष्टिने भयावह ठरते. जर मनुष्याने स्वार्थभावाचा त्याग करून परहितासाठी स्वधर्माचे पालन केले, तर त्याच्यासाठी कोठेही कोणतेही भय नाही.

**शंका**—अठराव्या अध्यायाच्या बेचाळीसाव्या, त्रेचाळीसाव्या आणि चौवेचाळीसाव्या श्लोकात क्रमाने ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्या स्वाभाविक कर्मांचे वर्णन करून भगवंतांनी सत्तेचाळीसाव्या श्लोकाच्या पूर्वार्धातसुद्धा हीच गोष्ट "**श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्**" म्हटले आहे. म्हणून जर या ठिकाणी (प्रस्तुत श्लोकात) दुसऱ्याच्या स्वाभाविक कर्माला भयावह म्हटले गेले आहे तर अठराव्या अध्यायाच्या बेचाळीसाव्या श्लोकात सांगितलेले ब्राह्मणाचे स्वाभाविक कर्मसुद्धा दुसऱ्या (क्षत्रिया) साठी भयावह व्हावयास पाहिजे. परंतु शास्त्रामध्ये सर्व माणसांना त्यांचे पालन करण्याविषयी आज्ञा दिली गेली आहे.

**समाधान**—मनाचा निग्रह, इंद्रियांचे दमन इत्यादी तर सामान्य धर्म आहेत. (१३।७-११, १६।१-३) ज्याचे पालन सर्वांनी केलेच पाहिजे. कारण हे सर्वांचे स्वधर्म आहेत. हे सामान्य धर्म ब्राह्मणासाठी "स्वाभाविक कर्म" यासाठी आहेत की, यांचे पालन करण्यामध्ये त्यांना श्रम होत नाहीत. परंतु दुसऱ्या वर्णांना यांचे पालन करण्यात थोडे परिश्रम होऊ शकतात. स्वाभाविक कर्म आणि सामान्य धर्म—दोन्हीही "स्वधर्मा" च्या अंतर्गत येतात सामान्यधर्मा व्यतिरिक्त आपल्या स्वाभाविक कर्मामध्ये पाप दिसत असून-सुद्धा वास्तविक पाप होत नाही. जसे केवळ आपले कर्तव्य समजून (स्वार्थ, द्वेष इत्यादीविना) शूरवीरतापूर्वक युद्ध करणे क्षत्रियाचे स्वाभाविक कर्म असल्यामुळे यामध्ये पाप दिसत असूनही वास्तविक पाप होत नाही—"**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्**" (१८।४७)

सामान्य धर्मा व्यतिरिक्त दुसऱ्याचे स्वाभाविक कर्म (परधर्म) भयदायक आहे. कारण त्याचे आचरण शास्त्र-निषिद्ध आणि दुसऱ्याची जीविका बळकावणारे असते. दुसऱ्याचा धर्म भयदायक यामुळे आहे की, त्याचे पालन करण्याने पाप लागते आणि ते स्थान-विशेष तसेच योनि-विशेष नरकरूपी भयाला देणारे असते. म्हणून भगवान् अर्जुनाला जणू हे म्हणत आहेत की, भिक्षेच्या अन्नाने जीवन-निर्वाह करणे दुसऱ्याच्या जीविकेचे हरण करणारे तसेच क्षत्रियासाठी निषिद्ध असल्यामुळे तुझ्यासाठी कल्याणकारक नाही तर तुझ्यासाठी युद्धरूपी आपोआप प्राप्त झालेल्या स्वाभाविक कर्माचे पालनच कल्याणकारक आहे.

## स्वधर्म आणि परधर्मसंबंधी मार्मिक संकेत

परमात्मा आणि त्याचा अंश (जीवात्मा) "स्व" आहे तसेच प्रकृती आणि तिचे कार्य (शरीर आणि संसार) "अन्य" आहे. स्व चा धर्म "स्वधर्म" आणि अन्यचा धर्म "परधर्म" म्हटला जातो. म्हणून सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर निर्विकारता, निर्दोषता, अविनाशिता, नित्यता, निष्कामता, निर्ममता इत्यादी जेवढे स्व चे धर्म आहेत ते सर्व "स्वधर्म" आहेत. उत्पन्न होणे, उत्पन्न होऊन अस्तित्वात राहणे, बदलणे, वाढणे, क्षीण होणे तसेच नष्ट होणे,* तसेच भोग आणि संग्रहाची इच्छा, मान-प्रतिष्ठेची इच्छा इत्यादी जितके शरीराचे, संसाराचे धर्म आहेत, ते सर्व "परधर्म" आहेत. "**संसारधर्मैरविमुह्यमानः**" (श्रीमद्भाग०११।२।४९) "स्व" मध्ये कधी कोणतेही परिवर्तन होत नाही, म्हणून त्याचा नाश होत नाही. परंतु शरीरामध्ये निरंतर परिवर्तन होत असते म्हणून त्याचा नाश होतो. या दृष्टीने स्वधर्म अविनाशी आणि परधर्म विनाशी आहे.

त्याग (कर्मयोग), बोध (ज्ञानयोग) आणि प्रेम (भक्तियोग) हे तिन्हीही स्वयंसिद्ध असल्यामुळे स्वधर्म आहेत. स्वधर्मामध्ये अभ्यासाची जरूरी नाही. कारण अभ्यास शरीर-संबंधाने होत असतो आणि शरीराच्या संबंधाने होणारे सर्व कर्म परधर्म असतात.

योगी होणे स्वधर्म आहे आणि भोगी होणे परधर्म आहे. निर्लिप्त राहणे स्वधर्म आहे आणि लिप्त होणे परधर्म आहे. सेवा करणे स्वधर्म आहे आणि कशाची कामना ठेवणे परधर्म आहे. प्रेमी होणे स्वधर्म आहे आणि रागी (आसक्त) होणे परधर्म आहे. निष्काम, निर्मम आणि अनासक्त होणे स्वधर्म आहे आणि कामना, ममता, आसक्ती करणे परधर्म आहे. तात्पर्य प्रकृतीच्या संबंधाविना (स्वमध्ये) होणारे सर्व काही "स्वधर्म" आहे आणि प्रकृतीच्या संबंधाने होणारे सर्व काही "परधर्म" आहे. स्वधर्म चिन्मय धर्म आणि परधर्म जडधर्म आहे.

परमात्म्याचा अंश (शरीरी) "स्व" आहे आणि

* "जायतेऽस्ति विपरिणमते वर्धतेऽपक्षीयते विनश्यति।" (निरूक्त १।१।२)

प्रकृतीचा अंश (शरीर) ''पर'' आहे. ''स्व'' चे दोन अर्थ होतात एक तर ''स्वत:'' आणि दुसरा ''स्वकीय'' अर्थात् परमात्मा! या दृष्टीने आपल्या स्वरूप बोधाची इच्छा तसेच स्वकीय परमात्म्याची इच्छा दोन्हीही स्वधर्म आहेत.

पुरुषा (चेतन) चा धर्म आहे—स्वयंसिद्ध स्वाभाविक स्थिती आणि प्रकृती (जड) चा धर्म आहे—स्वयंसिद्ध स्वाभाविक परिवर्तनशीलता. पुरुषाचा धर्म ''स्वधर्म'' आणि प्रकृतीचा धर्म ''परधर्म'' आहे.

मनुष्याचे ठिकाणी दोन प्रकारच्या इच्छा असतात— ''सांसारिक'' अर्थात् भोग आणि संग्रहाची इच्छा आणि ''पारमार्थिक'' अर्थात् आपल्या कल्याणाची इच्छा. यामध्ये भोग आणि संग्रहाची इच्छा ''परधर्म'' अर्थात् शरीराचा धर्म आहे. कारण असत् शरीराशी संबंध जोडण्यानेच भोग आणि संग्रहाची इच्छा होत असते. आपल्या कल्याणाची इच्छा ''स्वधर्म'' आहे. कारण परमात्म्याचाच अंश असल्याने ''स्व'' ची इच्छा परमात्म्याचीच आहे, संसाराची नव्हे.

स्वधर्माचे पालन करण्याविषयी मनुष्य स्वतंत्र आहे कारण आपले कल्याण करण्यासाठी शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, इत्यादींची आवश्यकता नाही तर यापासून विन्मुख होण्याची आवश्यकता आहे. परंतु परधर्माचे पालन करण्याविषयी मनुष्य परतंत्र आहे कारण यामध्ये शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, देश, काल, वस्तू व्यक्ती इत्यादींची आवश्यकता आहे. शरीरादींच्या साहाय्यतेवाचून परधर्माचे पालन होऊ शकत नाही.

स्व परमात्म्याचा अंश आहे आणि शरीर संसाराचा अंश आहे. जेव्हा मनुष्य परमात्म्याला आपले समजत असतो तेव्हा हा त्याच्यासाठी ''स्वधर्म'' होतो आणि जेव्हा शरीर-संसाराशी आपला संबंध समजतो तेव्हा हा त्याच्यासाठी ''परधर्म'' होतो, जो शरीर-धर्म आहे. जेव्हा मनुष्य शरीराशी आपला संबंध न मानता परमात्मप्राप्तीसाठी साधन करतो, तेव्हा ते साधन त्याचा ''स्वधर्म'' होतो. नित्यप्राप्त परमात्म्याचा अथवा आपल्या स्वरूपाचा अनुभव करून देणारी सर्व साधने ''स्वधर्म'' आहेत आणि संसाराकडे आकृष्ट करविणारी सर्व कर्म ''परधर्म'' आहेत. या दृष्टीने कर्मयोग, ज्ञानयोग आणि भक्तियोग—तिन्हीही योगमार्ग सर्व मनुष्याचे ''स्वधर्म'' आहेत. या उलट शरीराशी आपला संबंध मानून भोग आणि संग्रहामध्ये व्यस्त राहणे सर्व माणसांचा ''परधर्म'' आहे.

स्थूल, सूक्ष्म आणि कारण—तिन्ही शरीरांनी केली जाणारी तीर्थ, व्रत, तप, दान, चिंतन, ध्यान, समाधी इत्यादी सर्व शुभ कर्म, सकामभावनेने अर्थात् आपल्यासाठी केल्यास ''परधर्म'' होतात आणि निष्कामभावनेने अर्थात् दुसऱ्यासाठी केल्यास ''स्वधर्म'' होतात. कारण स्वरूप निष्काम आहे आणि सकामभाव प्रकृतीच्या संबंधाने येत असतो. म्हणून कामना ठेवल्यास परधर्म होतो. स्वधर्म मुक्त करणारा आणि परधर्म बंधनात टाकणारा असतो.

मनुष्याचे मुख्य काम परधर्मापासून विन्मुख होणे आणि स्वधर्माच्या सन्मुख होणे आहे. मनुष्यच केवळ असे करू शकतो. स्वधर्माच्या सिद्धीसाठीच मनुष्यशरीर मिळाले आहे. परधर्म तर अन्य योनीमध्ये तसेच भोगप्रधान स्वर्गादी लोकांमध्येही आहे. स्वधर्मासाठी सर्व मनुष्य सबल, पात्र आणि स्वाधीन आहेत तसेच परधर्मामध्ये सर्व मनुष्य निर्बल, अपात्र आणि पराधीन आहेत. प्रकृतिजन्य वस्तूच्या कामनेने अभावाविषयी दु:ख होते आणि वस्तू मिळाल्यास त्या वस्तूची पराधीनता होते जो ''परधर्म'' आहे. परंतु प्रकृतिजन्य वस्तूंच्या कामनेचा नाश झाल्यास अभाव आणि पराधीनता नेहमीसाठी नाहीशा होतात जो स्वधर्म आहे. या स्वधर्मात स्थित राहून कितीही कष्ट झाले, इतकेच नव्हे तर प्राण गेले तरीही तो कल्याण करणारा असतो. परंतु परधर्माच्या संबंधामुळे सुख-सुविधा झाल्या तरीही तो भयावह अर्थात् वारंवार जन्म मृत्यूच्या चक्रात टाकणारा असतो.

संसारात जेवढी म्हणून दु:ख, शोक, चिंता इत्यादी आहेत ती सर्व परधर्माचा आश्रय घेतल्यामुळेच आहेत. परधर्माचा आश्रय सोडून स्वधर्माचा आश्रय घेतल्यास, नेहमी, संपूर्णपणे, सर्वकाळ राहणाऱ्या आनंदाची प्राप्ती होते जी स्वत:सिद्ध आहे.

**परिशिष्ट भाव**—साधक जन्म आणि कर्म यानुसार 'स्व' ला अर्थात् स्वत:ला जो मानतो, त्याचा धर्म (कर्तव्य) त्याच्यासाठी 'स्वधर्म' आहे आणि जे त्याच्यासाठी निषिद्ध आहे, तो 'परधर्म' आहे. जसे साधक स्वत:ला कोण्या वर्ण आणि आश्रमाचा मानतो तर त्या वर्ण आणि आश्रमाचा धर्म त्याच्यासाठी स्वधर्म आहे. तो स्वत:ला विद्यार्थी अथवा अध्यापक मानत असेल तर शिकणे अथवा शिकविणे त्याच्यासाठी स्वधर्म आहे. तो स्वत:ला सेवक, जिज्ञासू अथवा भक्त मानत असेल तर सेवा, जिज्ञासा अथवा भक्ती त्याच्यासाठी स्वधर्म आहे. ज्यात दुसऱ्याच्या अहिताचा, अनिष्टाचा भाव असतो, ते चोरी, हिंसा इत्यादी कर्म कोणाचे ही स्वधर्म नाहीत, तर कुधर्म अथवा अधर्म आहेत.*

---

* प्रत्येक धर्मात कुधर्म, अधर्म आणि परधर्म—हे तिन्ही असतात. दुसऱ्याच्या अनिष्टाचा भाव, कूटनीती इत्यादी 'धर्मात कुधर्म' आहेत. यज्ञात पशुबली देणे इत्यादी 'धर्मात-अधर्म' आहे. जो आपल्यासाठी निषिद्ध आहे असा दुसऱ्या वर्ण, आश्रम इत्यादीचा धर्म 'धर्मात परधर्म' आहे. कुधर्म,

निष्कामभावाने दुसऱ्याच्या हितासाठी कर्म करणे (कर्मयोग) स्वधर्म आहे. स्वधर्मालाच गीतेत सहज कर्म, स्वकर्म आणि स्वभावज कर्म नावाने म्हटले गेले आहे.

कर्तव्याच्या विरुद्ध कर्म करणे हेही अकर्तव्य आहे आणि कर्तव्याचे पालन न करणे हेही अकर्तव्य आहे (गीता—दुसऱ्या अध्यायाचा तेहतीसावा श्लोक).

***संबंध—*** *"स्वधर्म कल्याणकारक आणि परधर्म भयदायक आहे" असे जाणत असूनसुद्धा मनुष्य स्वधर्मामध्ये का प्रवृत्त होत नाही? याविषयी अर्जुन प्रश्न करीत आहेत.*

*अर्जुन उवाच*

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः॥ ३६॥**

अर्जुन म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **वार्ष्णेय** | = हे वार्ष्णेय! | **अपि** | नसतानाही | **केन** | = कोणाच्या प्रेरणेने |
| **अथ** | = मग | **बलात्** | = जबरदस्तीने | **प्रयुक्त** | = प्रेरित होऊन |
| **अहम्** | = हा | **नियोजितः** | = करावयास लावल्या- | **पापम्** | = पापाचे |
| **पूरुषः** | = मनुष्य | | | **चरति** | = आचरण करतो? |
| **अनिच्छन्,** | = इच्छा | **इव** | = प्रमाणे | | |

***व्याख्या—*** **अथ केन प्रयुक्तोऽयं.............बलादिव नियोजितः**—यादवांच्या वंशामध्ये "वृष्णि" नावाचा एक वंश होता. त्याच वृष्णिवंशामध्ये अवतार घेतल्याने भगवान् श्रीकृष्णाचे एकनाव "वार्ष्णेय" आहे. पूर्व श्लोकामध्ये भगवंतांनी स्वधर्म पालनाची प्रशंसा केली आहे. धर्म "वर्ण" आणि "कुलाचा" असतो. म्हणून अर्जुनसुद्धा कुळ (वंश) च्या नावाने भगवंताला संबोधित करून प्रश्न करीत आहेत.

विचारवंत पुरुष पाप करू इच्छित नाही कारण पापाचा परिणाम दुःख असतो आणि कोणताही प्राणी दुःखाची इच्छा करीत नाही.

या ठिकाणी "**अनिच्छन्**" पदाचे तात्पर्य भोग आणि संग्रहाचे इच्छेचा त्याग नाही तर पाप करण्याच्या इच्छेचा त्याग आहे. कारण भोग आणि संग्रहाची इच्छाच संपूर्ण पापाचे मूळ आहे, जे नसल्यास पाप होतच नाही.

विचारवंत पुरुष पाप करणे तर इच्छित नाही परंतु अंतः-करणात भोग आणि संग्रहाची इच्छा असल्यामुळे तो करण्यायोग्य कर्तव्यकर्म करत नाही आणि न करण्याजोगे पाप करून बसतो.

**अनिच्छन्**—या पदाची प्रबलता दाखविण्यासाठी अर्जुन "**बलादिव नियोजितः**" या पदाची योजना करतात. तात्पर्य पापप्रवृत्ती निर्माण झाल्यास विचारवंत पुरुष त्या पापाला जाणून त्यापासून संपूर्णपणे दूर राहू इच्छितो तरी-सुद्धा तो ते पाप अशा रीतीने करू लागतो की, जसे कोणी एखादा त्याला जबरदस्तीने पापामध्ये प्रवृत्त करीत आहे. यावरुन असे दिसून येते की, पाप-कर्मामध्ये प्रवृत्त करविणारे कोणते तरी बलवान कारण आहे.

पापामध्ये प्रवृत्तीचे, "काम" अर्थात् सांसारिक सुखभोग आणि संग्रहाची कामना, हेच मूळ कारण आहे. परंतु या कारणाकडे दृष्टी न राहिल्याने मनुष्याला पाप करविणारा कोण आहे याचा पत्ता लागत नाही. तो हे समजतो की, मी तर पापाला जाणत असून, त्यापासून निवृत्त होऊ इच्छितो, परंतु मला कोणीतरी जबरदस्तीने पापामध्ये प्रवृत्त करीत आहे—जसे दुर्योधनाने म्हटले आहे-

**जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिर्जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः।**
**केनापि देवेन हृदि स्थितेन यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि॥**
**(गर्ग संहिता, अश्वमेध० ५०।३६)**

"मी धर्माला जाणतो परंतु त्यामध्ये माझी प्रवृत्ती होत नाही आणि अधर्मालाही जाणतो परंतु त्यापासून माझी निवृत्ती होत नाही. माझ्या हृदयात कोणता तरी देव राहत आहे जो माझ्याकडून जसे करवितो तसेच मी करतो."

दुर्योधनाने वर्णन केलेला हा "देव" वस्तुतः "काम" (भोग आणि संग्रहाची इच्छा) च आहे. ज्यामुळे मनुष्य विचारपूर्वक जाणत असतानासुद्धा धर्माचे पालन आणि

अधर्म आणि परधर्म—या तिन्हीने कल्याण होत नाही. कल्याण अशा धर्माने होते, ज्यात आपल्या स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग आणि दुसऱ्याचे वर्तमानात आणि भविष्यात हित होत असेल.

अधर्माचा त्याग करू शकत नाही.

**केन प्रयुक्तोऽयं पापं चरति**—पदांनीसुद्धा "**अनिच्छन्**" पदाची प्रबलता प्रतीत होते. तात्पर्य विचारवंत मनुष्य स्वत: पाप करू इच्छित नाही, कोणी दुसराच त्याला जबरदस्तीने पापामध्ये प्रवृत्त करवितो. तो दुसरा कोण आहे ? हा अर्जुनाचा प्रश्न आहे.

भगवंतांनी नुकतेच चौतीसाव्या श्लोकात सांगितले आहे की, राग आणि द्वेष (जे काम आणि क्रोधाची सूक्ष्म रूपे आहेत) साधकाचे महान शत्रू आहेत अर्थात् हे दोन्ही पापाला कारण आहेत. परंतु ही गोष्ट सामान्य रीतीने सांगितली गेली असल्याने अर्जुन तिला पकडू शकले नाहीत. म्हणून ते प्रश्न करीत आहेत की, मनुष्य विचारपूर्वक पाप करू इच्छित नसतानासुद्धा कोणाकडून प्रेरणा झाल्याने पापाचे आचरण करतो ?

अर्जुनाच्या प्रश्नाचा अभिप्राय असा आहे की, (एकतीसाव्या पासून पस्तीसाव्या श्लोकापर्यंत पाहिले असता) अश्रद्धा, असूया, दुष्ट चित्तता, मूढता, प्रकृती (स्वभाव) ची परवशता, राग-द्वेष, स्वधर्मामध्ये अरुची आणि परधर्मामध्ये रुची—यापैकी कोणते कारण आहे ज्यामुळे मनुष्य विचार-पूर्वक इच्छित नसतानासुद्धा पापामध्ये प्रवृत्त होतो ? या व्यतिरिक्त ईश्वर, प्रारब्ध, युग, परिस्थिती, कर्म, कुसंग, समाज, रीतिरिवाज, सरकारी कायदे इत्यादीपैकी देखील कोणत्या कारणाने मनुष्य पापामध्ये प्रवृत्त होतो ?

***संबंध**—आता भगवान् पुढील श्लोकात अर्जुनाच्या प्रश्नाचे उत्तर देतात.*

*श्रीभगवानुवाच*

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः।**
**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम्॥ ३७॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **रजोगुणसमुद्भवः** | = रजोगुणापासून उत्पन्न झालेला | | (हीच पापाचे कारण आहे) | | (आणि) |
| **एषः** | = हा | **एषः** | = हा (कामच) | **महापाप्मा** | = महापापी आहे. |
| **कामः** | = काम अर्थात् कामना | **क्रोधः** | = क्रोध (यात परिणत होतो) आहे. | **इह,** | = या विषयात (तू) |
| | | **महाशनः** | = (हा) फार खादाड | **एनम्** | = याला (च) |
| | | | | **वैरिणम्** | = वैरी |
| | | | | **विद्धि** | = जाण |

*व्याख्या*— **रजोगुणसमुद्भवः**—पुढे चौदाव्या अध्यायाच्या सातव्या श्लोकामध्ये भगवान् सांगतील की, तृष्णा (कामना) आणि आसक्तीने रजोगुण उत्पन्न होतो आणि येथे हे म्हणतात की, रजोगुणापासून काम उत्पन्न होतो. यावरुन हे समजून घ्यावे की, आसक्तीपासून काम उत्पन्न होतो आणि कामाने रागाची वाढ होते. तात्पर्य सांसारिक पदार्थांना सुखदायक समजल्याने राग उत्पन्न होतो, ज्यामुळे अंत:करणात त्यांचे महत्त्व दृढ होते. मग त्याच पदार्थांचा संग्रह करण्याची आणि त्यापासून सुख भोगण्याची कामना उत्पन्न होते. पुन्हा कामनेने पदार्थांविषयी राग वृद्धिंगत होत राहतो. हा क्रम जोपर्यंत चालत राहतो तोपर्यंत पापकर्मापासून संपूर्णपणे निवृत्ती होत नाही.

**काम एष क्रोध एषः**—माझ्या मनासारखे व्हावे हाच काम आहे.* उत्पत्ति-विनाशशील जड पदार्थांच्या संग्रहाची इच्छा, संयोगजन्य सुखाची इच्छा, सुखाची आसक्ती—हे सर्व कामाचीच रूपे आहेत

पापकर्म कधी तर "कामा" ला वश होऊन आणि कधी "क्रोधा" ला वश होऊन केली गेलेली दिसून येतात. दोन्हीमुळे वेगवेगळी पापे होतात म्हणून दोन्ही पदे दिली आहेत.

वास्तविक काम अर्थात् उत्पत्ति-विनाशशील पदार्थांची कामना, प्रियता, आकर्षण, हेच संपूर्ण पापांचे मूळ आहे. †कामनेमध्ये अडथळा झाल्यास कामच क्रोधात परिणत होतो. म्हणून भगवंतांनी एका "कामने" लाच पापाचे मूळ दाखविण्या-साठी उपर्युक्त पदामध्ये एक वचनाचा प्रयोग केला आहे.

कामनेची पूर्ती झाल्यास लोभ उत्पन्न होतो ‡आणि

---

* "इदं मे स्यादिदं मे स्यादितीच्छा कामशब्दिता" (हे मला मिळावे, हे मला मिळावे-अशा प्रकारची इच्छा "काम" म्हटली जाते.)

† जरी भगवत्प्रदत्त विवेकाला महत्त्व न देणे आणि भगवंताला विन्मुख होणेसुद्धा पापाला कारण आहे तरीपण या ठिकाणी "कामा" लाच पापाचे कारण यासाठी म्हटले आहे की, हा (तीसरा) अध्याय "कर्मयोगा" चा आहे आणि कर्मयोगाचा मुख्य उद्देश "कामना" नष्ट करणे हाच आहे.

‡ जिमि प्रति लाभ लोभ अधिकाई (मानस १।१८०।१, ६।१०२।१)

कामनेमध्ये अडथळा झाल्यास (अडथळा करणाऱ्याविषयी) "क्रोध" उत्पन्न होतो. जर अडथळा करणारी व्यक्ती आपल्यापेक्षा अधिक बलवान असेल तर क्रोध उत्पन्न न होता "भय" उत्पन्न होते. म्हणून गीतेमध्ये कोठे कोठे कामना आणि क्रोधाबरोबर भयाची देखील गोष्ट आली आहे जसे—"**वीतरागभयक्रोधाः**" (४।१०) आणि **विगतेच्छाभयक्रोधः**" (५।२८)

## कामनासंबंधी विशेष संकेत

कामना, ही संपूर्ण पाप, संताप, दुःख इत्यादींचे मूळ आहे. कामना ठेवीत असलेल्या मनुष्याला जागृतीत सुख मिळणे तर दूरच राहो, स्वप्नातसुद्धा कधी सुख मिळणार नाही— "**काम अछत सुख सपनेहुँ नाहीं**" (मानस ७।९०।१) जे इच्छिले जाते ते न होणे आणि ज्याची इच्छा नसते ते होणे त्यालाच "दुःख" म्हणतात जर "असे व्हावे" आणि "असे होऊ नये" याचा त्याग झाल्यास मग दुःख आहेच कोठे?

नाशवान पदार्थांची इच्छाच कामना म्हटली जाते. अविनाशी परमात्म्याची इच्छा कामनेसारखी दिसत असली तरीसुद्धा वास्तविक "कामना" नाही. कारण उत्पत्ति-विनाशशील पदार्थांची कामना कधी पूर्ण होत नाही तर वाढतच राहते. परंतु परमात्म्याची इच्छा (परमात्मप्राप्ती झाल्यावर) पूर्ण होते. दुसरी गोष्ट, कामना आपल्यापेक्षा भिन्न वस्तूची होत असते आणि परमात्मा आपल्याशी अभिन्न आहेत. त्याचप्रमाणे सेवा (कर्मयोग), तत्त्वज्ञान (ज्ञानयोग) आणि भगवत्प्रेम (भक्तियोग) यांची इच्छासुद्धा कामना नाही. परमात्मप्राप्तीची इच्छा वास्तविक पाहता जीवनाची वास्तविक आवश्यकता (भूक) आहे. जीवाला आवश्यकता तर परमात्म्याची आहे परंतु विवेक दबल्यामुळे तो नाशवान पदार्थांची कामना करू लागतो.

एक शंका अशी होऊ शकते की, कामनेशिवाय संसाराचे कार्य कसे चालेल? याचे समाधान असे की, संसाराचे कार्य वस्तू, क्रिया यांनी चालते, मनाच्या कामनेने नव्हे. वस्तूंचा संबंध कर्माशी असतो मग ती कर्म पूर्वीची (प्रारब्ध) असोत अथवा वर्तमानाची (उद्योग) असोत. कर्म, बाह्य असतात आणि कामना अंतःकरणात असतात. बाह्य कर्माचे फळसुद्धा (वस्तू, परिस्थिती इत्यादी रूपाने) बाह्य असते.

कामनेचा संबंध फला (पदार्थ, परिस्थिती इत्यादी) च्या प्राप्तीशी नाहीच. जी वस्तू कर्माच्या अधीन आहे, ती कामना करण्याने कशी प्राप्त होऊ शकेल? संसारात आपण पाहतच आहोत की, धनाची कामना असूनही लोकांचे दारिद्र्य नष्ट होत नाही. जीवन्मुक्त महापुरुषां व्यतिरिक्त बाकी सर्व व्यक्ती जिवंत राहण्याची कामना ठेवीत असले तरी मरण पावतात. कामना करा अथवा न करा जे फल मिळणार असेल ते मिळणारच. तात्पर्य जे होणारे असते ते होणारच आणि जे होणारे नाही ते कधी होणारच नाही मग त्याची कामना करा अथवा करू नका. जसे कामना न करताही प्रतिकूल परिस्थिती येत असते तसेच कामना न केल्यास अनुकूल परिस्थितीसुद्धा येईलच. रोगाची कामना केल्याविना-सुद्धा रोग येतात आणि कामना केल्यावाचूनही निरोगीपणा राहतो. निंदा अपमानाची कामना न करताही निंदा, अपमान होतो आणि कामना केल्यावाचूनही प्रशंसा-सम्मान होतो. जसे प्रतिकूल परिस्थिती कर्माचे फळ आहे तसेच अनुकूल परिस्थितीसुद्धा कर्माचे फळ आहे. म्हणून वस्तू-परिस्थिती इत्यादीचे प्राप्त होणे अथवा न होणे याचा संबंध कर्माशी आहे कामनेशी नव्हे.

कामना तात्कालिक सुखाची आणि भावी सुखाचीही असते. भोग आणि संग्रहाची इच्छा तात्कालिक सुखाची कामना आहे आणि कर्मफल प्राप्तीची इच्छा भावी सुखाची कामना आहे. या दोन्हीही कामनेमध्ये दुःखच दुःख आहे. कारण कामना केवळ वर्तमान काळातच दुःख देत नाही तर भावी जन्मात कारण असल्याने भविष्यामध्ये सुद्धा दुःख देते. म्हणून ह्या दोन्ही कामनांचा त्याग केला पाहिजे.

कर्म आणि विकर्म (निषिद्ध कर्म) दोन्हीही कामने-मुळेच होतात. कामनेमुळे कर्म होतात आणि कामनेची अधिक वृद्धी झाल्यास "विकर्म" होतात. कामनेमुळेच असत्‌मध्ये आसक्ती दृढ होते. कामना न राहिल्यास असत्‌शी संबंध-विच्छेद होतो.

कामना पूर्ण झाल्यास आपण त्याच अवस्थेला प्राप्त होतो ज्या अवस्थेमध्ये आपण कामना उत्पन्न होण्यापूर्वी होतो. जसे एखाद्याच्या मनात कामना निर्माण झाली की, मला शंभर रुपये मिळावेत. याच्यापूर्वी त्याच्या मनात शंभर रूपये मिळविण्याची कामना नव्हती म्हणून अनुभवाने सिद्ध झाले की, कामना उत्पन्न होणारी आहे. जोपर्यंत शंभर रूपये मिळण्याची कामना निर्माण झाली नव्हती तोपर्यंत "निष्कामतेची" स्थिती होती. प्रयत्न करून जर प्रारब्ध-वशात् शंभर रुपये मिळाले तर तीच "निष्कामतेची" स्थिती पुनः प्राप्त होते. परंतु सांसारिक सुखासक्तीमुळे ती स्थिती टिकत नाही आणि नवीन कामना उत्पन्न होते की, मला एक हजार रुपये मिळावेत. अशा प्रकारे कामनेची पूर्ती होत नाही आणि तृप्तीही होत नाही. केवळ परिश्रमच होतात, काहीही हाती लागत नाही.

''काम'' अर्थात् सांसारिक पदार्थांच्या कामनेचा त्याग करणे कठीण नाही. थोडा सखोल विचार करा की, वास्तविकपणे कामना सुटतच नाही का टिकतच नाही. तेव्हा कळून येईल की, वास्तविक कामना टिकतच नाही. ती तर निरंतर नाहीशी होत राहते. परंतु मनुष्य नवीन नवीन कामना करून तिला स्थिर करू इच्छित असतो. कामना उत्पन्न होत असते आणि उत्पन्न होणारी वस्तू नक्कीच नष्ट होते. म्हणून कामना आपोआप नाहीशी होत असते. जर मनुष्य नवीन कामना करणार नाही तर जुनी कामना कधी पूर्ण होऊन आणि कधी पूर्ण न होता आपोआप नष्ट होते.

कामनेची पूर्ती सर्वांसाठी आणि सर्वकाळ नसते परंतु कामनेचा त्याग सर्वांसाठी आणि सर्वकाळ होतो. कारण कामना अनित्य आणि त्याग नित्य आहे. निष्काम होण्यासाठी काय कठीण आहे ? आपण निर्मम होत नाहीत हेच काठिण्य आहे. जर आपण निर्मम झालो तर निष्काम होण्यासाठी शक्ती प्राप्त होईल आणि निष्काम झाल्यास असंग होण्यासाठी शक्ती निर्माण होईल. जेव्हा निर्ममता, निष्कामता आणि असंगता येते तेव्हा निर्विकारता, शांती आणि स्वाधीनता आपोआप प्राप्त होतात.

एका मार्मिक गोष्टीकडे लक्ष द्या. आम्ही कामनांचा त्याग करणे फार कठीण समजतो परंतु विचार करा की, जर कामनांचा त्याग करणे कठीण आहे तर काय कामनांची पूर्ती करणे सोपे आहे ? सर्व कामनांची पूर्ती आजपर्यंत संसारामध्ये कोणाची झाली नाही. आमची तर गोष्ट सोडाच, भगवंताच्या वडीला (दशरथजी) चीसुद्धा कामना पूर्ण झाली नाही. म्हणून कामनांची पूर्ती होणे असंभव आहे. परंतु कामनांचा त्याग करणे असंभव नाही. जर आम्ही असे मानले की, कामनेचा त्याग करणे कठीण आहे तर कठीण गोष्टसुद्धा असंभव (कामनांची पूर्ती) गोष्टीपेक्षा सोपीच पडते. कारण कामनांचा त्याग तर होऊ शकतो. परंतु कामनांची पूर्ती होऊच शकत नाही. म्हणून कामनांच्या पूर्तीपेक्षा कामनांचा त्याग करणे सोपेच आहे. चूक हीच होते की, जे कार्य करू शकत नाही, त्याच्यासाठी प्रयत्न करू लागतो आणि जे कार्य करू शकतो, ते करीतच नाही. म्हणून साधकाने कामनांचा त्याग, जो तो करू शकतो, केला पाहिजे.

कामनेचे चार प्रकार आहेत—

(१) शरीरनिर्वाहाची आवश्यक कामना पूर्ण करावी.*

(२) जी कामना व्यक्तिगत आणि न्याययुक्त असेल आणि जिला पूर्ण करणे आपल्या आवाक्याच्या बाहेर असेल ती कामना भगवंताला अर्पण करून समाप्त करावी.†

(३) दुसऱ्यांची न्याययुक्त आणि हितकारक कामना जिला पूर्ण करण्याचे सामर्थ्य आपल्या ठिकाणी आहे ती पूर्ण करावी. अशा प्रकारे दुसऱ्यांची कामना पूर्ण झाल्यास आमच्या ठिकाणी कामना-त्यागाचे सामर्थ्य निर्माण होते.

(४) उपर्युक्त तिन्ही प्रकारच्या कामना व्यतिरिक्त दुसऱ्या सर्व कामनांना विचार करून समाप्त करावे.

**महाशनो महापाप्मा**—एखादा शत्रू असा असतो की, जो भेट, पूजा अथवा अनुनय-विनयाने शांत होतो. परंतु हा ''काम'' असा शत्रू आहे की, जो कशानेही शांत होत नाही या कामाची कधीही तृप्ती होत नाही—

**बुझै न काम अगिनि तुलसी कहुँ, विषय-भोग बहु घी ते॥**
(विनयपत्रिका १९८)

जसे धन मिळाल्याने धनाची कामना वाढतच जाते तसेच जसजसे भोग मिळत जातात तसतशी कामना वाढतच जाते. म्हणून कामनेला ''**महाशनः**'' म्हटले गेले आहे.

कामना ही संपूर्ण पापांचे कारण आहे. चोरी, डाकू-गिरी, हिंसा इत्यादी सर्व पाप कामनेमुळेच होतात. म्हणून कामनेला ''**महापाप्मा**'' म्हटले गेले आहे.

कामना उत्पन्न होताच मनुष्य, आपल्या कर्तव्यापासून,

---

* अशा कामनेमध्ये चार गोष्टीचे असणे आवश्यक आहे.

(१) जी कामना वर्तमानकाळी उत्पन्न झालेली असेल (उदा० भूक लागल्यास भोजनाची कामना)

(२) जिच्या पूर्तीची साधनसामुग्री वर्तमानकाळी उपलब्ध आहे.

(३) जिची पूर्ती केल्यावाचून जिवंत राहणे शक्य नसेल.

(४) जिच्या पूर्तीने आपले तसेच दुसऱ्याचे—कोणाचेही अहित होत नसेल.

अशा प्रकारे केवळ शरीरनिर्वाहाच्या आवश्यक कामनांची पूर्ती करून घ्यावी. आवश्यक कामनांची पूर्तता केली असता अनावश्यक कामनेचा त्याग करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. परंतु आवश्यक कामनेच्या पूर्ततेचे सुख घेऊ नये कारण पूर्ततेचे सुख घेतल्याने नवीन कामना उत्पन्न होत राहतील ज्याचा कधी अंत होणार नाही.

† उदाहरणार्थ—''संसारामध्ये अन्याय-अत्याचार होऊ नये '' अशी तीव्र व्यक्तिगत कामना न्याययुक्त आणि आपल्या सामर्थ्याच्या बाहेरची आहे. म्हणून अशा कामनेला भगवंताला अर्पण करून निश्चिंत व्हावे. अशी भगवंताला अर्पण केलेली कामना भविष्य काळात (जर भगवंताच्या मनात येईल तर) पूर्ण होईल.

आपल्या स्वरूपापासून आणि आपल्या इष्टापासून (भगवान्) विमुख होतो आणि नाशवान संसाराशी सन्मुख होतो. नाशवानाच्या सन्मुख झाल्याने पाप होत असते आणि पापाचे फल म्हणून नरक आणि नीच योनीची प्राप्ति होते.

संयोगजन्य सुखाच्या कामनेनेच संसार सत्य प्रतीत होतो आणि क्षणाक्षणाला बदलणारे शरीरादी पदार्थ स्थिर दिसू लागतात. सांसारिक पदार्थांना स्थायी समजल्यानेच मनुष्य त्यापासून सुख भोगतो आणि त्याची इच्छा करतो. सुख-भोगाचेवेळी संसाराच्या क्षणभंगुरतेकडे लक्ष जात नाही आणि मनुष्य भोगांना आणि स्वत:लासुद्धा स्थायी समजतो. जे प्रतिक्षण नाश पावत आहे अशा संसारापासून सुख घेण्याची इच्छा कशी होऊ शकते ? परंतु संसार प्रतिक्षण नष्ट होत आहे, या ज्ञानाचा तिरस्कार केल्यामुळेच सांसारिक सुखभोगाची इच्छा होते. सिनेमामध्ये पिकलेले द्राक्ष दिसत असले तरी त्यांना पाहून खाण्याची इच्छा होत नाही. जर झाली तर हे सिद्ध झाले की, आपण त्याला स्थायी मानले आहे. परिवर्तनशील संसाराला स्थिर मानल्याने वास्तविक जे स्थिर तत्त्व आहे त्या परमात्मतत्त्वाकडे अथवा आपल्या स्वरूपाकडे दृष्टी जातच नाही. तिकडे दृष्टी न गेल्याने मनुष्य त्यापासून विन्मुख होऊन नाशवान सुखभोगामध्ये फसतो. यावरुन हे सिद्ध होते की, वास्तविक तत्त्वापासून विन्मुख झाल्यावाचून कोणताही सांसारिक भोग भोगलाच जाऊ शकत नाही आणि रागपूर्वक सांसारिक भोग भोगल्यानेच मनुष्य परमात्म्यापासून विन्मुख होतो.

भोगबुद्धीने सांसारिक भोग भोगणारा मनुष्य हिंसारूपी पापापासून वाचूच शकत नाही. तो आपलीही हिंसा (पतन) करतो आणि दुसऱ्यांची सुद्धा! जसे एखादा मनुष्य धनाचा संग्रह करून त्याद्वारा भोगाना भोगतो तर त्यावेळी त्याला पाहून दरिद्री व्यक्तीच्या अंत:करणात धन आणि भोगाच्या अभावाचे विशेष दु:ख होत असते, ही त्यांची हिंसा झाली. भोगांना भोगून तो स्वत:ची सुद्धा हिंसा (पतन) करत असतो. कारण स्वत: परमात्म्याचा अंश असूनसुद्धा जडा-(धन) ला महत्त्व दिल्याने तो वास्तविक जडाचा दास होत असतो. त्यामुळे त्याचे पतन होते. संसाराचे सर्व भोगपदार्थ सीमित असतात म्हणून मनुष्य जेवढा भोग भोगतो तितका भोग दुसऱ्याच्या भोगातूनच येतो. एक गोष्ट मात्र अशी आहे की, केवळ शरीरनिर्वाहासाठी पदार्थांचा स्वीकार केल्याने पाप लागत नाही. शरीरनिर्वाहबाबतीतसुद्धा शास्त्रामध्ये केवळ आपल्यासाठी भोग भोगण्याचा निषेध आहे. आपले माता, पिता, गुरू, पुत्र, स्त्री, वृद्ध इत्यादींना शरीरनिर्वाहाचे पदार्थ प्रथम देऊन मग स्वत: ग्रहण करावेत.

भोगबुद्धीने भोग भोगणारा पुरुष आपले तर पतन करतो, भोग्य वस्तूंचा दुरुपयोग करून त्यांचा नाश करतो आणि अभावग्रस्त पुरुषांची हिंसा करतो. परंतु जीवन्मुक्त महापुरुषाच्या विषयात ही गोष्ट लागू होत नाही. त्याच्याद्वारा हिंसारूपी पाप होत नाही, कारण त्याचे ठिकाणी भोगबुद्धी नसते आणि त्याच्याद्वारा निष्कामभावनेने केवळ जीवन-निर्वाहासाठी शास्त्रविहित क्रिया होतात (४।२१,१८।१७) त्या महापुरुषाच्या उपयोगात येणाऱ्या वस्तूंचा विकास होतो, नाश नव्हे, अर्थात् त्याच्याजवळ आल्याने वस्तूंचा सदुपयोग होतो ज्यामुळे त्या सार्थकी लागतात. जोपर्यंत संसारामध्ये त्या महापुरुषाचे म्हणविले जाणारे शरीर असते तोपर्यंत त्याच्याकडून सहजच आपोआप प्राण्यावर उपकार होत असतो.

शरीरनिर्वाहमात्राची आवश्यकता "**महाशनः**" आणि "**महापाप्मा**" नाही. कारण शरीरनिर्वाहमात्राची आवश्यकता "कामना" नाही. आवश्यकतेची पूर्तता होत असते. जसे भूक लागली आणि भोजन केल्याने तृप्ती झाली. परंतु कामनेची मात्र वृद्धी होत असते.

**विद्ध्येनमिह वैरिणम्**—जरी वास्तविक सांसारिक पदार्थांच्या कामनेचा त्याग झाल्यावरच सुख-शांतीचा अनुभव येतो तरीपण मनुष्य अज्ञानाला वश होऊन पदार्थापासून सुख होते असे समजतो. अशा प्रकारे मनुष्याने पदार्थाच्या कामनेला सुखाचे कारण समजून त्याला आपले मित्र आणि हितचिंतक मानले. या मान्यतेमुळे कामना कधी समाप्त होत नाही. म्हणून भगवान् या ठिकाणी म्हणतात की, या कामनेला आपला मित्र मानू नका तर शत्रू समजा. कामना मनुष्याची वैरिणी आहे कारण की, ही मनुष्याच्या विवेकाला झाकून टाकते आणि त्याला पापामध्ये प्रवृत्त करते.

संसारातील संपूर्ण पाप, दु:ख, नरक इत्यादींच्या मूळात एक कामनाच आहे. या लोकी आणि परलोकी जेथे जेथे जो कोणी दु:ख भोगत आहे त्यामध्ये असत्‌ची कामनाच कारण आहे. कामनेने सर्व प्रकारची दु:ख होतात आणि सुख थोडेही होत नाही.

### विशेष गोष्ट

कामाला नष्ट करण्याचा सोपा उपाय, दुसऱ्यांची सेवा करणे आणि त्यांना सुख पोहचविणे हा आहे. अन्य शरीर-धारी तर दुसरे आहेतच, आपले म्हणविले जाणारे शरीर, इंद्रिये मन, बुद्धी आणि प्राणसुद्धा दुसरेच आहेत. म्हणून यांना सेवाबुद्धीनेच सांभाळावे, भोगबुद्धीने वापरू नये.

यांच्यापासून सुख घेऊ नये. कर्मयोगामध्ये स्थूलशरीरांच्या होणाऱ्या "क्रिया", सूक्ष्मशरीराचे होणारे "चिंतन" आणि कारणशरीराने होणारी "स्थिरता", तिन्हीही आपल्यासाठी नाहीत. तर संसारासाठीच आहेत. कारण स्थूलशरीराची स्थूलसंसाराशी, सूक्ष्मशरीराची सूक्ष्मसंसाराशी आणि कारणशरीराची कारणसंसाराशी एकता आहे. म्हणून शरीर, पदार्थ आणि क्रिया यांच्या योगाने दुसऱ्यांची सेवा करणे हे उचित आहे परंतु आपल्या ठिकाणी सेवकपणाचा अभिमान बाळगणे अयोग्य आहे. सूक्ष्मशरीराने परहित चिंतन करणे तर योग्य आहे परंतु त्यापासून सुख घेणे अयोग्य आहे. कारण-शरीराने स्थिर होणे तर उचित आहे परंतु स्थिरतेचे सुख घेणे अयोग्य आहे*. अशा प्रकारे सुख न घेतल्यास फलाची आसक्ती समाप्त होते. फलाची आसक्ती समाप्त झाल्यास कर्माची आसक्ती सुगमतेने नाहीशी होते.

माझी हुकुमत चालावी, अमुक व्यक्तीने माझ्या आज्ञेत रहावे, अमुक वस्तू माझ्या उपयोगी पडावी, माझेच बोलणे खरे ठरावे—ही सर्व कामनांचीच स्वरूपे आहेत. उत्पत्ति-विनाशशील (असत्) संसारापासून काही मिळविण्याची कामना करणे भयंकर अनर्थ करणारे आहे. दुसऱ्यांची न्याय-युक्त कामना (ज्यामुळे दुसऱ्यांचे हित होईल आणि जे पूर्ण करण्याचे सामर्थ्य आमच्यामध्ये आहे) पूर्ण करण्याने आपल्या ठिकाणी कामनेच्या त्यागाविषयी शक्ती प्राप्त होते. दुसऱ्यांची कामना पूर्ण करू शकलो नाही तरीही अंतः करणात पूर्ण करण्याचा भाव असावा.

तादात्म्य—अहंता (आपणाला शरीर समजणे), ममता, (शरीरादी पदार्थांना आपले समजणे) आणि कामना (अमुक वस्तू मिळावी—असा भाव) या तिन्हीनीच जीव संसारात बांधला जातो. तादात्म्यापासून परिच्छिन्नता, ममतेपासून विकार आणि कामनेने अशांती उत्पन्न होते. कामनेच्या त्यागाने ममता आणि ममतेच्या त्यागाने तादात्म्य समाप्त होते. कर्मयोगी, सिद्धांतानुसार यापैकी कोणाशीही आपला संबंध समजत नाही. कारण तो शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी, अहम् पदार्थ इत्यादीपैकी कोणालाही आपले आणि आपल्यासाठी समजत नाही. तो या शरीरादींना केवळ संसाराचे आणि संसाराच्या सेवेसाठीच मानतो, जे वास्तविक आहे. कोणालाही दुःख न देण्याचा भाव झाल्यास सेवेचा आरंभ होतो. म्हणून साधकाच्या अंतःकरणात "कोणालाही दुःख होऊ नये." हा भाव नेहमी राहिला पाहिजे. काही कारणाने (अज्ञानाने) आपल्याकडून कोणास दुःख जरी झाले तर त्याची क्षमा मागावी. त्याने क्षमा केली नाही तरी-सुद्धा काही भीती नाही. कारण शुद्ध अंतःकरणापासून क्षमा मागणाऱ्यास भगवंताकडून आपोआप क्षमा होते. सेवा करण्याविषयी साधकांनी सर्वकाळ सावध रहावे की, एखादेवेळीही सेवेच्या मोबदल्यात काही मागण्याचा भाव यावयास नको. अशा प्रकारे सेवा करण्याने कामरूपी शत्रू सुगमतेने समाप्त होतो.

**परिशिष्ट भाव**—वस्तू, व्यक्ती आणि क्रिया यापासून सुख इच्छिण्याचे नाव 'काम' आहे. या कामरूप एका दोषात अनंत दोष, अनंत विकार, अनंत पाप भरलेले आहेत. म्हणून जोपर्यंत मनुष्याच्या अंतःकरणात काम आहे, तोपर्यंत तो संपूर्णपणे निर्दोष, निर्विकार, निष्पाप होऊ शकत नाही. आपल्या सुखासाठी काही इच्छिल्यानेच वाईटपणा येतो. जो कोणाकडून कशाचीही इच्छा करीत नाही तो वाईटपणापासून रहित होतो.

कर्मफल तीन प्रकारचे असतात—इष्ट, अनिष्ट आणि मिश्र (गीता—अठराव्या अध्यायाचा बारावा श्लोक). तिन्हीपैकी 'काम' चे केवळ अनिष्टच फल मिळते.

शास्त्रनिषिद्ध कर्म प्रारब्धामुळे होत नाहीत, तर 'कामा' मुळे होतात. प्रारब्धानुसार (फलभोगासाठी) कर्म करण्याची वृत्ती तर होईल. परंतु कर्म निषिद्ध होणार नाही. कारण प्रारब्धाचे फल भोगण्यासाठी निषिद्ध आचरण करण्याची आवश्यकताच नाही.

'काम' रजोगुणाने पैदा होतो. म्हणून पापांचे कारण तर रजोगुण आहे आणि कार्य तमोगुण आहे. सर्वच पापे रजोगुणापासून उत्पन्न होतात.

***संबंध***—*"हे पाप आहे" असे जाणूनसुद्धा मनुष्य पापामध्ये प्रवृत्त होतो. म्हणून या जाणण्याचा प्रभाव आचरणात न येण्याचे काय कारण आहे? याचे विवेचन भगवंत पुढील दोन श्लोकांत करीत आहेत.*

**धूमेनाव्रियते वन्हिर्यथादर्शो मलेन च।**
**यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम्॥ ३८॥**

* सेवा, परहित चिंतन, स्थिरता इत्यादींचे सुख घेणे आणि ते कायम राहण्याची इच्छा करणेसुद्धा परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीमध्ये बाधक आहे. (१४।६) म्हणून साधकांनी सात्त्विक, राजस आणि तामस—तिन्हीही गुणांपासून असंग व्हावे. कारण स्वरूप असंग आहे.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| यथा | = ज्याप्रमाणे | आव्रियते | = झाकला जातो (तसेच) | | | | राहतो, |
| धूमेन | = धुराने | | | | तथा | | = त्याप्रमाणे |
| वह्निः | = अग्नी | यथा | = ज्याप्रमाणे | | तेन | | = त्या कामनाद्वारा |
| च | = आणि | उल्बेन | = वारेने (जारेने) | | इदम् | | = हे (ज्ञान अर्थात् विवेक) |
| मलेन | = धुळीने | गर्भः | = गर्भ | | | | |
| आदर्शः | = आरसा | आवृतः | = अच्छादिलेला | | आवृतम् | | = झाकलेले आहे. |

***व्याख्या*— धूमेनाव्रियते वह्निः**—जसे अग्नी धुराने झाकलेला असतो तसेच कामनेने मनुष्याचा विवेक झाकलेला राहतो. अर्थात् स्पष्ट प्रतीत होत नाही.

विवेक बुद्धीमध्ये प्रगट होतो. बुद्धी तीन प्रकारची असते. सात्त्विकी, राजसी, तामसी. सात्त्विकी बुद्धीत कर्तव्य अकर्तव्याचे योग्य प्रकारे ज्ञान राहते, राजसी बुद्धीमध्ये कर्तव्य अकर्तव्याचे योग्य प्रकारे ज्ञान नसते आणि तामसी बुद्धीमध्ये सर्व वस्तूंविषयी विपरीत ज्ञान होते (१८।३०-३२). कामना उत्पन्न झाल्यास सात्त्विकी बुद्धीसुद्धा, ज्याप्रमाणे धुराने अग्नी झाकला जातो त्याप्रमाणे, झाकली जाते. तर मग राजसी आणि तामसी बुद्धीबद्दल प्रश्नच नाही.

सांसारिक इच्छा उत्पन्न होताच पारमार्थिक मार्ग मलिन होऊन जातो. जर या अवस्थेमध्ये आपण सावधचित्त झालो नाही तर कामनेची अधिक वाढ होते. कामना वाढल्यास पारमार्थिक मार्गामध्ये अंधारच होतो.

उत्पत्ति-विनाशशील जड वस्तूंच्या ठिकाणी प्रियता, महत्ता, सुखरूपता, सुंदरता, विशेषता इत्यादी दिसत असल्यामुळे त्यांच्याविषयी कामना उत्पन्न होते. ही कामनाच मूळात विवेकाला झाकणारी असते. इतर शरीरापेक्षा मनुष्यशरीरामध्ये विवेक विशेषरूपाने प्रगट आहे परंतु जड पदार्थांच्या कामनेमुळे तो विवेक काम करीत नाही. कामना उत्पन्न होताच विवेक अस्पष्ट होतो. जसे धुराने अग्नी झाकला गेलेला असूनसुद्धा काम करू शकतो तसेच जर साधक कामना उत्पन्न होताच सावधान झाला तर त्याचा विवेक काम करू शकतो.

प्रथम अवस्थेमध्येच कामनेला नष्ट करण्याचा उपाय असा आहे की, कामना उत्पन्न होताच साधकाने विचार करावा की, आम्ही ज्या वस्तूंची कामना करीत आहोत त्या वस्तू आमच्याबरोबर सर्वकाळ राहणाऱ्या नाहीत. त्या वस्तू पूर्वीही आमच्याबरोबर नव्हत्या आणि नंतरही आमच्याबरोबर राहणाऱ्या नाहीत तसेच मध्यंतरीसुद्धा त्या वस्तूचा आमच्यापासून निरंतर वियोग होत आहे. असा विचार केल्यास कामना राहत नाही.

**यथादर्शो मलेन च**—जसे धुळीने माखलेल्या आरशामध्ये प्रतिबिंब दिसत नाही तसेच कामनेचा वेग तीव्र झाल्यावर "मी साधक आहे, माझे हे कर्तव्य आणि हे अर्कतव्य आहे" हे ज्ञान राहत नाही. अंत: करणात नाशवान वस्तूंचे महत्त्व जास्त प्रमाणात वाढल्यामुळे मनुष्य त्याच वस्तूंचा भोग आणि संग्रह ह्याची कामना करू लागतो. ही कामना जसजशी वाढते तसतसे मनुष्याचे पतन होते.

वास्तविक महत्त्व वस्तूचे नाही त्याच्या उपयोगाचे आहे. रुपये, विद्या, बल, इत्यादी वस्तूंना काही महत्त्व नाही. त्यांचा उपयोगच महत्त्वाचा आहे, ही गोष्ट समजली तर मग त्यांची कामना राहत नाही. कारण जितक्या वस्तू आमच्या जवळ आहेत, त्यांच्याच सदुपयोगाची आमच्यावर जबाबदारी आहे. त्या वस्तूंनाच सदुपयोगात आणावयाचे आहे तर मग कामना कशाला वाढवावयाची? कारण केवळ कामना केल्याने वस्तू प्राप्त होत नाहीत.

सांसारिक वस्तूंचे महत्त्व जसजसे कमी होईल तसतसे परमात्म्याचे महत्त्व साधकाच्या अंत:करणात वाढेल. सांसारिक वस्तूंचे महत्त्व संपूर्णपणे नष्ट झाल्यास परमात्म्याचा अनुभव होईल आणि कामनेचा सर्वथैव नाश होईल.

**यथोल्बेनावृतो गर्भः**—आरशावर धूळ बसल्याने त्यात आपला चेहरा तर दिसत नाही पण "हा आरसा आहे" असे ज्ञान असतेच. परंतु जसा वारेमध्ये झाकलेला गर्भ हा मुलगा आहे की; मुलगी आहे याचा पत्ता लागत नाही. तसेच कामनेच्या तृतीय अवस्थेमध्ये कर्तव्य अकर्तव्याचे भान राहत नाही. अर्थात् विवेक पूर्णपणे झाकला जातो. विवेक झाकला गेल्याने कामनेचा वेग वाढतच जातो.

कामनेमध्ये बाधा आल्यास क्रोध उत्पन्न होतो. मग त्यापासून सम्मोह होतो. सम्मोहाने बुद्धी नष्ट होते. बुद्धी नष्ट झाल्यास मनुष्य करण्यायोग्य कार्य करीत नाही आणि खोटेपणा, कपट, बेइमानी, अन्याय, पाप, अत्याचार इत्यादी न करण्यायोग्य कामे करू लागतो. अशा लोकाना भगवंत "मनुष्य" सुद्धा म्हणू इच्छित नाहीत. म्हणूनच सोळाव्या अध्यायामध्ये ज्या ठिकाणी अशा लोकांचे वर्णन आले आहे त्या ठिकाणी भगवंतांनी (आठव्यापासून अठराव्या श्लोकापर्यंत) मनुष्यवाचक एकही शब्द दिला नाही. स्वर्ग-

लोकाची कामना असणाऱ्या लोकानासुद्धा भगवंतांनी **''कामात्मानः''** (२।४३) म्हटले आहे कारण असे लोक कामनेचेच स्वरूप असतात. कामनेतच तदाकार असल्याने त्यांचा असा निश्चय असतो की, सांसारिक सुखापेक्षा जास्त काही नाहीच. (१६।११)

[जरी कामनेच्या या तृतीय अवस्थेमध्ये मनुष्याची दृष्टी आपल्या वास्तविक उद्देशाकडे (परमात्मप्राप्ती) जात नाही तरीपण पूर्व संस्कारामुळे, वर्तमानकाळाच्या एखाद्या सत्संगामुळे अथवा इतर कोणत्या कारणाने त्याला आपल्या उद्देशाची जागृती झाली तर त्याचेसुद्धा कल्याण होऊ शकते]

**तथा तेनेदमावृतम्**—या श्लोकात भगवंतांनी एका कामाद्वारा विवेक कसा झाकला जातो याविषयी तीन दृष्टांत दिले आहेत. म्हणून उपर्युक्त पदाचे हे तात्पर्य आहे की, एका कामाद्वारा विवेक झाकला गेल्यानेच कामाच्या तीन अवस्था हृदयात उत्पन्न होतात.

काम उत्पन्न झाल्यास त्याच्या तीन अवस्था सर्वांच्या अंतःकरणात येत असतात. परंतु जो मनुष्य कामनेलाच सुखाचे कारण समजतो त्याचा आश्रय घेतो आणि कामनेला त्याज्य समजत नाही, तो कामनेला ओळखतच नाही. परंतु परमार्थात रुची असणारे तसेच साधन करणारे पुरुष या कामनेला ओळखतात. जो कामनेला ओळखतो तोच कामनेला नष्टसुद्धा करू शकतो.

भगवंतांनी या श्लोकात कामनेच्या तीन अवस्थांचे वर्णन तिला समाप्त करण्याच्या उद्देशानेच केले आहे, ज्याची आज्ञा त्यांनी पुढे एकेचाळीसाव्या आणि त्रेचाळीसाव्या श्लोकात दिली आहे, वास्तविक कामना उत्पन्न झाल्यास त्याच्या वृद्धीचा क्रम इतक्या वेगाने घडतो की, त्याचे वर्णन करण्यासाठी वेळ लागेल पण कामनांच्या अवस्था बदलण्यास मुळीच वेळ लागत नाही. कामना वाढल्यास तर अनर्थ परंपराच सुरू होते. संपूर्ण पाप, संताप, दुःख इत्यादी कामनेमुळेच होतात. म्हणून मनुष्याने आपल्या विवेकाला जागृत ठेवून कामनेला उत्पन्नच होऊ देऊ नये. जर कामना उत्पन्न झाली तरीसुद्धा तिला प्रथम अथवा द्वितीय अवस्थेमध्येच समाप्त करून टाकावी, तिला तृतीय अवस्थेपर्यंत कधीही येऊ देऊ नये.

## विशेष गोष्ट

धूर दिसल्यास त्या ठिकाणी अग्नी आहे असे सिद्ध होते. कारण त्या ठिकाणी अग्नी नसता तर धूर कोठून निघाला असता? म्हणून ज्याप्रमाणे धुराने अग्नी झाकला गेला असला तरी अग्नीच्या अस्तित्वाचे ज्ञान, धुळीने आरसा माखलेला असला तरी आरशाच्या अस्तित्वाचे ज्ञान आणि वारेने झाकलेला असला तरी गर्भाच्या अस्तित्वाचे ज्ञान सर्वांना असते. त्याचप्रमाणे कामनेने झाकला गेला तरी विवेक (कर्तव्य अकर्तव्याचे ज्ञान) सर्वांना असतो पण कामनेमुळे तो उपयोगात येत नाही.

शास्त्रानुसार परमात्म्याच्या प्राप्तीमध्ये तीन दोष बाधक आहेत—मल, विक्षेप, आवरण. हे दोष असत् (संसार) च्या संबंधाने उत्पन्न होतात. असत्चा संबंध कामनेने होतो. म्हणून मूळ दोष कामनाच आहे. कामनेचा संपूर्णपणे नाश होताच असत्शी संबंध-विच्छेद होतो. असत्शी संबंध-विच्छेद होताच संपूर्ण दोष समाप्त होतात आणि विवेक प्रगट होतो.

परमात्मप्राप्तीत मुख्य बाधा, सांसारिक पदार्थांना नाशवान समजत असून महत्त्वदेणे, ही आहे. जोपर्यंत अंतः-करणात नाशवान पदार्थांचे महत्त्व आहे आणि ते सत्य, सुंदर आणि सुखदायक प्रतीत होतात तोपर्यंत मल, विक्षेप, आवरण, हे तीन दोष राहत असतात. या तिन्हीपैकीसुद्धा मल दोषाला अधिक बाधक मानले जाते. मलदोषा (पाप) चे मुख्य कारण कामनाच आहे. कारण कामनेनेच सर्व पापे होतात. ज्यावेळी साधक असा दृढ निश्चय करतो की, ''मी आता पाप करणार नाही'' त्याचवेळी सर्व दोषांचे मूळ तुटून पडते आणि मल दोष समाप्त होऊ लागतो. संपूर्णपणे निष्काम झाल्यास मलदोष सर्वथैव नष्ट होतो.

श्रीमद्भागवतामध्ये भगवंतांनी कामना असणाऱ्या पुरुषांना कल्याणाचा उपाय कर्मयोग (निष्कामकर्म) सांगितला आहे **''कर्मयोगस्तु कामिनाम्''** (११।२०।७). म्हणून कामना असणाऱ्या पुरुषांनी आपल्या कल्याणाविषयी निराश होऊ नये. कारण ज्याचे ठिकाणी कामना आली आहे तोच निष्काम होईल. कर्मयोगद्वारा कामनेचा नाश सुगमतेने होतो. लहानात लहान आणि मोठ्यात मोठी प्रत्येक लौकिक अथवा पारलौकिक क्रिया करताना ''मी काय करीत आहे आणि कसे करीत आहे?'' अशी सावधानी ठेवल्यास उद्देशाची जागृती होते. निरंतर उद्देशाकडे दृष्टी राहिल्यास अशुभकर्म तर होतच नाहीत आणि शुभ कर्मसुद्धा आसक्ती आणि फलेच्छेचा त्याग करून केल्यास निष्कामतेचा अनुभव होतो आणि मनुष्याचे कल्याण होते.

**परिशिष्ट भाव**—परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीत कामनाच मुख्य बाधक आहे. जसे पाण्याने भरलेले भांडे आहे आणि त्यात आपणाला दोन कामे करायची आहेत. त्याला रिकामे करायचे आहे आणि आकाश भरायचे आहे. परंतु वास्तविक आपणाला दोन कामे करायची नाहीत, तर एकच काम करायचे आहे—भांडे रिकामे करणे. भांड्यातून पाणी काढाल तर आकाश आपोआप

भरून जाईल. तसेच कामनेचा त्याग करणे आणि परमात्म्याला प्राप्त करणे—ही दोन कामे नाहीत. कामनेचा त्याग कराल तर परमात्म्याची प्राप्ती आपोआप होईल. केवळ कामनेमुळेच परमात्मा अप्राप्त दिसत आहेत.

# आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा।
# कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च॥३९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुंतीनंदन! | | होणारा | **नित्यवैरिणा** | = नित्य वैरीद्वारा |
| **एतेन** | = या | **च** | = आणि | **ज्ञानम्** | = (मनुष्याचा) विवेक |
| **अनलेन** | = अग्नी (सारखा) | **ज्ञानिनः** | = विवेकियांच्या | | |
| **दुष्पूरेण** | = (कधी) तृप्त न | **कामरूपेण** | = कामनारूपी | **आवृतम्** | = झाकलेला आहे. |

***व्याख्या*— एतेन**—सदतीसाव्या श्लोकामध्ये भगवंतांनी पाप करविण्यामध्ये मुख्य कारण "काम" अर्थात् कामना सांगितले होते. त्याच कामनेसाठी या ठिकाणी "**एतेन**" पद आले आहे.

**दुष्पूरेणानलेन च**—जसे अग्नीमध्ये तुपाची अनुकूल आहुती देत राहिल्यास अग्नी कधीही तृप्त होत नाही उलट वाढतच राहतो. तसेच कामनेच्या अनुकूल भोग भोगत राहिल्यास कामना कधीही तृप्त होत नाही उलट अधिकाधिक वाढतच राहते.* जी काही वस्तू समोर येत राहते कामना अग्नी प्रमाणे त्याला खात राहते.

भोग आणि संग्रह यांची कामना कधी पूर्ण होतच नाही. जेवढे म्हणून भोग पदार्थ मिळत राहतील तितकीच त्यांच्याविषयीची भूक वाढतच जाते. कारण कामना जडाचीच होत असते म्हणून जडाच्या संबंधाने ती कधी नष्ट होत नाही उलट अधिकाधिक वाढते. सुन्दरदासजी लिहितात—

**जो दस बीस पचास भये सत, होइ हजार तो लाख मँगैगी।**
**कोटि अरब्ब खरब्ब असंख्य, पृथ्वीपति होन की चाह जगैगी॥**
**स्वर्ग पतालको राज करौ, तृष्णा अघकी अति आग लगैगी।**
**"सुन्दर" एक संतोष बिना सठ, तेरी तो भूख कभी न भगैगी॥**

ज्याप्रमाणे शंभर रुपये मिळाल्यास हजार रुपयाची भूक निर्माण होते, तर यावरुन सिद्ध झाले की, नऊशे रुपयाची कमतरता आहे. हजार रुपये प्राप्त झाल्यास मग सरळ सरळ दहा हजार रुपयाची कामना उत्पन्न होते. तेव्हा नऊ हजार रुपयाची कमतरता वाटते. दहा हजार रुपये मिळाल्यास मग सरळ एक लाख रुपयाची कामना उत्पन्न होते. तर नव्वद हजाराची कमतरता वाटू लागली. लाख रुपये मिळाल्यास मग दहा लाख रुपयाने संतोष होत नाही तर सरळ सरळ करोड रुपयाची कामना उत्पन्न होते. तर सिद्ध होते की, नव्याण्णव लाख रुपयाची उणीव भासू लागली. अशा प्रकारे भ्रम तर हा होतो की, लाभ वाढला परंतु वास्तविक तोटाच वाढला आहे. जेवढे धन मिळते तितकीच दरिद्रता (धनाची भूक) वाढ़त जाते. वास्तविक दरिद्रता त्याची समाप्त होते ज्याला धनाची कामना मुळीच राहत नाही.

**चाह गयी चिन्ता मिटी, मनुआँ बेपरवाह।**
**जिनको कछू न चाहिये, सो साहनपति साह॥**

वास्तविक पाहिले तर धन तितके बाधक नाही जितकी बाधक त्याची कामना आहे. धनाची कामना मग ती धनीला होवो अथवा निर्धनाला होवो दोघांनाही ती परमात्मप्राप्तीपासून वंचित करते. कामना कोणाचीही कधीही पूर्ण होत नाही कारण ही पूर्ण होणारी वस्तूच नाही. कामना- रहित तर कामना समाप्त झाल्यानतंरच होऊ शकतात.

**कामरूपेण**—जडाच्या संबंधाने होणाऱ्या सुखाच्या इच्छेला "काम" म्हणतात. नाशवान संसाराविषयी थोडीसुद्धा महत्त्वबुद्धी असणे "काम" आहे. अप्राप्ताला प्राप्त करण्याच्या इच्छेला "कामना" म्हणतात. अंत: करणात ज्या अनेक सूक्ष्म कामना दबलेल्या राहतात त्यांना "वासना" म्हणतात. वस्तूंची आवश्यकता प्रतीत होणे "स्पृहा" आहे. वस्तूविषयी उत्तमता आणि प्रियता वाटणे "आसक्ती" आहे. वस्तू मिळण्याची शक्यता वाटणे "आशा" आहे आणि अधिक वस्तू मिळावी याला "लोभ" अथवा तृष्णा म्हणतात. वस्तूची इच्छा अधिक वाढल्यावर "याचना" होते. ही सर्व कामाचीच रूपे आहेत.

**ज्ञानिनो नित्यवैरिणा**—या ठिकाणी "**ज्ञानिनः**" पद साधनेमध्ये लागलेल्या विवेकशील साधकासाठी आलेले आहे. कारण विवेकयुक्त साधकच या कामरूपी शत्रूला ओळखतो आणि त्याला समाप्त करतो. साधन न करणारे दुसरे लोक तर याला ओळखतही नाहीत उलट याला

---

* न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति। हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते॥

(श्रीमद्भा० ९।१९।१४ मनुस्मृति २।९४)

सुखदायक समजतात.

भगवान् म्हणतात की, हा काम विवेकशील साधकांचा नित्य वैरी आहे. कामना उत्पन्न होताच विवेकयुक्त साधक विचार करतो की, आता काही ना काही तरी संकट येणार. कामनेत संसाराचे महत्त्व आणि त्याचा आश्रय असतो जो पारमार्थिक मार्गामध्ये महान् बाधक आहे. विवेकी साधकाला कामना आरंभापासूनच टोचत असते. परिणामी तर कामना सर्वांना दुःख देतच असते. म्हणून ही साधकाची नित्य निरंतर वैरी आहे.

भोगामध्ये आसक्त असलेल्या अज्ञान्यांना ही कामना मित्रासारखी वाटते. कारण कामनेमुळेच भोगामध्ये सुख भासते. कामना नसेल तर भोगपदार्थ सुख देऊ शकणार नाहीत. परंतु परिणामी त्यांना दुःख, संताप, कैद, नरक इत्यादी प्राप्त होतच असतात. म्हणून खरे पाहिले तर ही कामना अज्ञान्यांचीसुद्धा नित्य वैरिणी आहे. परंतु अज्ञान्यांना याची जाणीव राहत नाही. मात्र विवेकयुक्त साधक जागृत असतो.

**आवृतं ज्ञानम्—**सर्व प्राणिमात्रात विवेक असतो. पशु-पक्ष्यादी मनुष्येतर योनीत हा विवेक विकसित नसतो आणि केवळ जीवननिर्वाह पर्यंतच सीमित राहतो. परंतु मनुष्यामध्ये जर कामना राहिली नाही तर हा विवेक विकसित होऊ शकतो. कारण कामनेमुळेच मनुष्याचा विवेक झाकला जातो. विवेक झाकला गेल्याने मनुष्य आपल्या उद्देशाकडे-परमात्मप्राप्तीकडे प्रगती करू शकत नाही. कारण कामना त्याला चिन्मय तत्त्वाकडे जाऊ देत नाही उलट जड तत्त्वामध्ये अडकून ठेवते.

आपल्याशी कोणी एखादा अप्रिय आणि असत्य बोलेल तर वाईट वाटते आणि प्रिय तसेच सत्य बोलेल तर बरे वाटते. याचा अर्थ असा झाला की, चांगले-वाईट, सदगुण-दुर्गुण, कर्तव्य-अकर्तव्य इत्यादीचे ज्ञान अर्थात् विवेक सर्व माणसांमध्ये असतो. परंतु असे असूनही तो अप्रिय आणि असत्य बोलतो. आपल्या कर्तव्याचे पालन करीत नाही. तर याचे कारण हेच आहे की, कामनेने त्याचा विवेक झाकून टाकला आहे.

कामनेमुळेच ''त्यागामध्ये सुख आहे'' हे ज्ञान काम करीत नाही. मनुष्याला तर असे भासते की, अनुकूल भोग-पदार्थापासून सुख होते परंतु वास्तविक पाहिले तर सुख त्यांच्या त्यागाने होते. हा सर्वांचा अनुभव आहे की, जागृत अवस्थेत आणि स्वप्नामध्ये भोगपदार्थाच्या संबंधापासून सुख आणि दुःख होत असते. परंतु सुषुप्ती (गाढनिद्रा) मध्ये थोडीसुद्धा भोगपदार्थांची स्मृती नसते तरी सुखच होते दुःख होत नाही. म्हणून सुषुप्तीतून जागे झाल्यावर तो म्हणतो की ''मी फार शांत झोपलो.'' याशिवाय जागृती आणि स्वप्नामध्ये मनुष्य थकतो परंतु सुषुप्तीमध्ये थकवा दूर होतो आणि ताजेतवानेपणा येतो. यावरुन सिद्ध होते की, भोग-पदार्थांच्या त्यागातच सुख आहे.

धनाची कामना होताच धन मनाद्वारा पकडले जाते. जेव्हा धन बाहेरुन प्राप्त होते तेव्हा मनाने पकडलेल्या धनाचा त्याग होतो आणि सुखाचा भास होतो. म्हणून वास्तविक सुखाचा भास बाहेरुन धन मिळाल्याने झाला नाही तर मनाने पकडलेल्या धनाच्या त्यागानेच झाला. जर धनाच्या मिळण्यानेच सुख झाले असते तर ते धन जवळ असताना कधी दुःख झाले नसते परंतु ते धन जवळ असतानासुद्धा दुःख प्राप्त होते.

जेव्हा मनुष्य एखाद्या वस्तूची कामना करतो तेव्हा तो पराधीन होतो. जसे त्याच्या मनांत घड्याळाची कामना उत्पन्न झाली. कामना उत्पन्न होताच त्याला घड्याळाच्या अभावाचे दुःख होऊ लागते तर ही घड्याळामुळे पराधीनता आहे. तो विचार करतो की, जर रुपये मिळाले तर आत्ताच घड्याळ विकत घेईन अर्थात् रुपयाच्या असण्याने आपल्याला स्वाधीन आणि नसण्याने स्वतःला पराधीन समजतो. ही समज अत्यंत चुकीची आहे. वास्तविक रुपये मिळाल्यास घड्याळाची पराधीनता राहत नाही परंतु रुपयाची पराधीनता तर होतेच. कारण रुपयेसुद्धा ''पर'' आहेत ''स्व'' नव्हे.

जसे वस्तूच्या कामनेने तो वस्तूच्या पराधीन झाला तसेच रुपयांची कामना झाल्याने रुपयांच्या पराधीन झाला. पराधीनता तर जशीच्या तशीच राहीली. परंतु कामनेने विवेक झाकला गेल्याने मनुष्याला वस्तूच्या पराधीनतेचा तर अनुभव येतो. परंतु रुपयांच्या पराधीनतेचा अनुभव येत नाही. उलट रुपयामुळे तो स्वाधीनतेचा अनुभव करतो. जी पराधीनता स्वाधीनतेच्या रूपामध्ये दिसते त्या पराधीनतेपासून सुटका करून घेणे फार अवघड जाते.

संपूर्ण संसार क्षणभंगुर आहे. शरीर, धन, जमीन, इमारत इत्यादी जेवढे म्हणून सांसारिक पदार्थ आहेत ते सर्वचे सर्व प्रतिक्षण विनाशाकडे धावत आहेत आणि आमच्यापासून वियुक्तसुद्धा होत आहेत. परंतु भोग भोगताना त्यांच्या क्षण-भंगुरतेचे ज्ञान राहत नाही. पदार्थाला नित्य आणि स्थायी समजल्यावाचून सुखभोग होऊच शकत नाही. साधारण मनुष्याची तर गोष्ट सोडाच. साधकसुद्धा भोगांना नित्य आणि स्थायी समजूनच त्यात फसतो. याचे कारण कामनेने विवेक झाकला जातो हेच आहे.

## विशेष गोष्ट

मनुष्याला सदैव महान् बनविण्याच्या उद्देशाने भगवंत कामनेला ''नित्यशत्रू'' दाखवून त्यापासून दूर राहण्यासाठी

सावध करीत आहेत. कारण कामना ही संपूर्ण पाप आणि दुःखाचे कारण आहे. एक मनुष्य आपल्या पत्नीला शोधत होता. लोकांनी त्याला विचारले "तुमच्या पत्नीचे काय नाव आहे ?" त्याने सांगितले "फजिती". नंतर त्याला विचारले तुमचे काय नाव आहे ? त्याने सांगितले "बदमाश". लोकांनी त्याला सांगितले "घाबरू नका. तुमची पत्नी फार पतिव्रता आहे आपोआप येईल" कारण बदमाशाला फजिती (बदनामी) अवश्य मिळतच असते. अशा प्रकारे संसाराच्या नाशवान् भोगांची कामना करणाऱ्या मनुष्यांजवळ आपोआप दुःख येतात.

मनुष्य दुःखापासून तर दूर राहू इच्छितो परंतु दुःखाचे कारण "काम" (कामना) याला सोडत नाही. कामना असताना स्वप्नातसुद्धा सुख मिळत नाही. "**काम अछत सुख सपनेहुँ नाहीं**" (मानस ७।९०।१). भगवान् "**अनलेन, दुष्पूरेण**" पदांनी हे सांगतात की, भोगपदार्थापासून कामना कधी पूर्ण होत नाही. जसजसे भोग पदार्थ मिळत जातात तसतशी त्यांच्याविषयी कामना वाढत जाते आणि जसजशी कामना वाढते तसतसे अभावाचे अधिक दुःख अनुभवाला येते. तसेच अभावाला समाप्त करण्यासाठी मनुष्य पाप कर्मात प्रवृत्त होतो. जसे धनाची कामना उत्पन्न झाल्यास धनाच्या प्राप्तीसाठी न्याय अन्यायाचा विचार करीत नाही. मग कामना वाढल्यास (द्वितीयावस्थेत) तो चोरी, डाकूगिरी इत्यादी करू लागतो. पुन: आणखी कामना वाढल्यास (तृतीयावस्थेमध्ये) तो धनासाठी दुसऱ्याचा जीव घेण्यासही मागे पुढे पाहत नाही. अशा प्रकारे नाशवान सुखाची कामना करणारा मनुष्य आपल्या इहलोक आणि परलोक ह्या दोन्हींना महान् दुःखमय बनवित असतो.

**परिशिष्ट भाव**—साधनेची मुख्य बाधा आहे—संयोगजन्य सुखाची कामना. ती बाधा साधनेत फार दूरवर राहते. साधक जेथे सुख घेतो, तेथेच अडकतो. येथ पर्यंत की, तो समीधीचेही सुख घेतो तरी तेथे तो अडकतो.* सात्त्विक सुखाची कामना, आसक्तीही बंधनकारक होते—'**सुख सङ्गेन बध्नाति**' (गीता १४। ६)† म्हणून येथे भगवंताने संयोगजन्य सुखाच्या कामनेला विवेकी साधकांचा नित्य वैरी सांगितले आहे—'**न तेषु रमते बुधः**' (गीता ५। २२), '**दुःखमेव सर्वं विवेकिनः**' (योगदर्शन २। १५).

***संबंध***—*एखाद्या शत्रूला नष्ट करण्यासाठी त्याच्या राहण्याच्या ठिकाणाची माहिती असणे आवश्यक आहे. म्हणून भगवान् पुढील श्लोकात ज्ञानी पुरुषांचा नित्य वैरी असलेल्या "कामाचे" निवासस्थान सांगत आहेत.*

**इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते।**
**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम्॥ ४०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इन्द्रियाणि** | = इंद्रिये, | **उच्यते** | = म्हटले गेले आहेत. | **ज्ञानम्** | = ज्ञानाला |
| **मनः** | = मन (आणि) | **एषः** | = ही कामना | **आवृत्य** | = झाकून |
| **बुद्धि** | = बुद्धी | **एतैः** | = याद्वारा (इंद्रिये, मन आणि बुद्धिद्वारा) | **देहिनम्** | = देहाभिमानी मनुष्याला |
| **अस्य** | = या कामनेचे | | | **विमोहयति** | = मोहित करते. |
| **अधिष्ठानम्** | = निवास-स्थान | | | | |

*व्याख्या*— **इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते**—काम पाच स्थानाचे ठिकाणी दिसत असतो—(१) पदार्थांमध्ये (३।३४) (२) इंद्रियांमध्ये (३) मनामध्ये (४) बुद्धीमध्ये आणि (५) मानलेल्या अहम् (मी) अर्थात् कर्त्यामध्ये (२।५९). या पाच स्थानांमध्ये दिसत असूनही काम वास्तविक मानलेल्या अहम् (चिज्जडग्रन्थि) मध्येच राहत असतो. परंतु उपर्युक्त पाच स्थानामध्ये दिसत असल्यामुळेच ती पाच स्थाने या कामाचे निवास-स्थान म्हटली जातात.

संपूर्ण क्रिया शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धीनेच होत असतात. ही चार कर्म करण्याची साधने आहेत. जेव्हा काम या चार ठिकाणी राहतो तेव्हा तो पारमार्थिक कर्म होऊ देत नाही. म्हणून कर्मयोगी निष्काम, निर्मम आणि अनासक्त होऊन शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धीद्वारा अंतःकरणाच्या शुद्धीसाठी कर्म करीत असतो (५।११)

वास्तविक काम अहम् (जड-चेतनाचे तादात्म्य)

* भोगांचे सुख संयोगजन्य आणि समाधीचे सुख वियोगजन्य आहे. संयोगजन्य सुख घेतल्याने पतन होते आणि वियोगजन्य सुख घेतल्याने साधक अडकतो.

† परमात्मप्राप्तीच्या मार्गात सात्त्विक सुखाची आसक्ती अडकविते आणि राजस-तामस सुखाची आसक्ती पतन करते.

मध्येच राहत असतो. अहम् अर्थात् ''मी'' पणा केवळ मानलेला आहे. मी अमुक वर्ण, आश्रम, संप्रदायाचा आहे— ही केवळ मान्यता आहे. मान्यतेशिवाय याविषयी दुसरे कोणतेच प्रमाण नाही. या मानलेल्या संबंधातच कामना राहते. कामनेमुळेच सर्व पापे होतात. पापे तर फल भोगून नष्ट होतात परंतु अहम्‌मधून कामना दूर होईपर्यंत नवीन नवीन पापे होत राहतात. म्हणून कामनाच जीवाला बंधनात टाकणारी आहे. महाभारतामध्ये म्हटले आहे—

**कामबन्धनमेवैकं नान्यदस्तीह बन्धनम्।**
**कामबन्धनमुक्तो हि ब्रह्मभूयाय कल्पते ॥**
(शान्तिपर्व २५१।७)

''जगतामध्ये कामनाच एकमेव बंधन आहे, दुसरे कोणतेच बंधन नाही. जो कामनेच्या बंधनातून मुक्त होतो तो ब्रह्मभाव प्राप्त करण्यासाठी समर्थ होतो.''

**एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम्**—कामनेमुळे, मनुष्य जे करावयास पाहिजे ते करीत नाही आणि जे करावयास नको असते ते करीत असतो. अशा प्रकारे कामना देहाभिमानी पुरुषांना मोहित करीत असते.

दुसऱ्या अध्यायामध्ये भगवंतांनी म्हटले आहे की, कामनेने क्रोध उत्पन्न होतो—''**कामात्क्रोधोऽभिजायते**।'' (२।६२) आणि क्रोधापासून सम्मोह (अत्यंत मूढभाव) उत्पन्न होतो. ''**क्रोधाद्भवति सम्मोहः**'' (२।६३) यावरुन हे समजून घ्यावे की, कामनेत बाधा झाल्यास क्रोध उत्पन्न होतो परंतु जर कामनेमध्ये बाधा झाली नाही तर कामनेने लोभ आणि लोभाने सम्मोह उत्पन्न होतो*. तात्पर्य कामनेने पदार्थ न मिळाले तर ''क्रोध'' उत्पन्न होतो आणि पदार्थ मिळाले तर ''लोभ'' उत्पन्न होतो. त्यापासून मग ''मोह'' उत्पन्न होतो. कामना रजोगुणाचे कार्य आहे आणि मोह तमोगुणाचे कार्य आहे. रजोगुण आणि तमोगुण जवळ जवळ राहतात† म्हणून काम, क्रोध, लोभ आणि मोह जवळ जवळच राहतात. काम इंद्रिये, मन आणि बुद्धीद्वारा देहाभिमानी पुरुषाला मोहित (बेहोश) करतो. अशा प्रकारे ''काम'' रजोगुणाचे कार्य असून सुद्धा तमोगुणाचे कार्य ''मोह'' होतो.

कामना उत्पन्न झाल्यास मनुष्य प्रथम इंद्रियांनी भोग भोगण्याची कामना करतो. अगोदर तर भोगपदार्थ मिळत नाहीत आणि समजा मिळाले तरी टिकत नाहीत. म्हणून त्यांना कोणत्याही पद्धतीने का होईना प्राप्त करण्यासाठी तो मनात निरनिराळया कामना करतो. त्या प्राप्त करण्यासाठी बुद्धीच्या योगाने अनेक उपाय योजतो. अशा प्रकारे कामना प्रथम इंद्रियांच्या संयोगजन्य सुखाच्या प्रलोभनात प्रेरित करते. मग इंद्रिये मनाला आपल्याकडे ओढतात आणि त्यानंतर इंद्रिये आणि मन मिळून बुद्धीलासुद्धा आपल्याकडे ओढतात. अशा प्रकारे काम देहाभिमान्याच्या ज्ञानाला झाकून इंद्रिये, मन आणि बुद्धीद्वारा त्याला मोहित करतो आणि त्याला पतनाच्या खड्डयात टाकून देतो.

हा सिद्धांत आहे की, सेवक चांगला असेल परंतु मालक त्याला तिरस्काराने काढून टाकील तर त्याला पुनः चांगला सेवक मिळणार नाही. तसेच मालक चांगला असेल आणि सेवक त्याचा तिरस्कार करील तर त्याला पुनः चांगला मालक मिळणार नाही. त्याच प्रकारे मनुष्याने परमात्मप्राप्ती केल्याशिवाय शरीराला सांसारिक भोग आणि संग्रहामध्येच व्यर्थ घालविले तर मग त्याला मनुष्यशरीर मिळणार नाही. चांगल्या वस्तूचा, अंतःकरण अशुद्ध झाल्यास, तिरस्कार होतो आणि अंतःकरण कामनेमुळे अशुद्ध होते. म्हणून सर्व प्रथम कामनेचा नाश केला पाहिजे.

**देहिनम् विमोहयति**—या पदाचे तात्पर्य हे आहे की, हा काम देहाभिमानी पुरुषालाच मोहित करतो. शरीराला ''मी'' आणि ''माझे'' समजणाराच देहाभिमानी होतो. भगवंतांनी आपल्या उपदेशाच्या आरंभीच देह (शरीर) आणि देही (शरीरी-आत्मा) चे विवेचन केले आहे. (२। ११-३०) देह आणि देही दोन्ही वेगवेगळे आहेत—हा सर्वांचा अनुभव आहे. हा काम ज्ञानाला झाकून देहाभिमानी (देहाशी आपला संबंध समजणारा) पुरुषाला बांधतो, देही (शुद्ध स्वरूप) ला नव्हे. जो देहाशी आपला संबंध समजत नाही त्याला हा बांधू शकत नाही. देहाला ''मी'', ''माझे'' आणि ''माझ्यासाठी'' समजल्यानेच मनुष्य उत्पत्ति-विनाशशील जड वस्तूंना महत्त्व देतो ज्यामुळे त्याचे ठिकाणी जडतेविषयी राग उत्पन्न होतो. राग उत्पन्न झाल्यास जडतेशी संबंध होतो. जडतेशी संबंध झाल्यावरच कामनेची उत्पत्ती होते. कामना उत्पन्न झाल्यास जीव मोहित होऊन संसारबंधनामध्ये अडकून पडतो.

---

* रागात् कामः प्रभवति कामाल्लोभोऽभिजायते। लोभाद्भवति सम्मोहः सम्मोहात् स्मृति विभ्रमः ॥
स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात् प्रणश्यति ॥
(मार्कण्डेय पुराण ३।७१-७२)

† तमोगुण, रजोगुण आणि सत्त्वगुण—या तिन्हीमध्ये परस्पर दहापटीचे (क्रमाने १,१० आणि १०० या प्रमाणे) अंतर आहे तरीही तमोगुणा (१)-पेक्षा रजोगुण (१०) जवळ आहे आणि सत्त्वगुण (१००) या दोन्हीपेक्षाही दूर आहे.

*संबंध—आता पुढील तीन श्लोकांत भगवंत "कामा" ला मारण्याची पद्धत सांगून मारण्याविषयीची आज्ञा देत आहेत.*

**तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ।**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम्॥ ४१॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तस्मात्** | = म्हणूनच | **इन्द्रियाणि** | = इन्द्रियांना | | करणाऱ्या |
| **भरतर्षभ** | = हे भरतवंशियांत श्रेष्ठ अर्जुन! | **नियम्य** | = वश करून | **पाप्मानम्** | = महान् पापी कामाला |
| | | **एनम्** | = या | **हि** | = अवश्यच |
| **त्वम्** | = तू | **ज्ञानविज्ञान-** | = ज्ञान आणि | **प्रजहि** | = बलपूर्वक मारून टाक. (नष्ट कर) |
| **आदौ** | = सर्वात प्रथम | **नाशनम्** | विज्ञानाचा नाश | | |

*व्याख्या*— **तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ**—इंद्रियांना विषयांमध्ये भोगबुद्धीने प्रवृत्त होऊ न देणे, परंतु केवळ निर्वाहबुद्धीने अथवा साधनबुद्धीने प्रवृत्त होऊ देणे हेच त्यांना वशमध्ये करणे आहे. तात्पर्य इंद्रियांची विषयाचे ठिकाणी रागपूर्वक प्रवृत्ती नसावी आणि द्वेषपूर्वक निवृत्ती नसावी (१८।१०). रागपूर्वक प्रवृत्ती आणि द्वेषपूर्वक निवृत्ती झाल्यास राग-द्वेष पुष्ट होतात आणि इच्छा नसतानासुद्धा मनुष्याला अधोगतीला नेतात. म्हणून प्रवृत्ती आणि निवृत्ती अथवा कर्तव्य आणि अकर्तव्य ह्याला जाणून घेण्यासाठी शास्त्रच प्रमाण आहे. (१६।२४) शास्त्रानुसार कर्तव्याचे पालन आणि अकर्तव्याचा त्याग करण्याने इंद्रिये वश होतात.

"कामाला" नष्ट करण्यासाठी सर्वप्रथम इंद्रियांचे नियमन केले पाहिजे हे म्हणण्याचे कारण हे आहे की, जोपर्यंत मनुष्य इंद्रियांना वश असतो तोपर्यंत त्याची दृष्टी तत्त्वाकडे जात नाही आणि तत्त्वाकडे दृष्टी गेल्याशिवाय अथवा तत्त्वाचा अनुभव झाल्याशिवाय "कामा" चा संपूर्णपणे नाश होत नाही.

मनुष्याची प्रवृत्ती इंद्रियद्वाराच होते. म्हणून तो सर्व प्रथम इंद्रियांच्या विषयातच फसतो ज्यामुळे त्याचे ठिकाणी त्या विषयांची कामना उत्पन्न होते. कामना-सहित कर्म करण्याने मनुष्य पूर्णपणे इंद्रियांच्या वशमध्ये होतो आणि त्यामुळे त्याचे पतन होते. परंतु जो मनुष्य इंद्रियांना वशमध्ये करून निष्काम भावपूर्वक कर्तव्यकर्म करतो त्याचा फार लवकर उद्धार होतो.

**एनम् ज्ञानविज्ञाननाशनम्—"ज्ञान"** पदाचा अर्थ शास्त्रीय ज्ञानसुद्धा घेतला जातो. जसे ब्राह्मणाच्या स्वाभाविक कर्मांतरगत **"ज्ञानम्"** पद शास्त्रीय ज्ञानासाठीच आले आहे. (१८।४२) परंतु या ठिकाणी प्रसंगानुसार "ज्ञाना" चा अर्थ विवेक (कर्तव्य-अकर्तव्याला वेग-वेगळे जाणणे) घेणेच योग्य वाटते. **"विज्ञान"** पदाचा अर्थ विशेषज्ञान अर्थात् तत्त्वज्ञान (अनुभव-ज्ञान, अस्सल ज्ञान अथवा बोध) आहे.

विवेक आणि तत्त्वज्ञान—दोन्हीही स्वत: सिद्ध आहेत. तत्त्वज्ञानाचा अनुभव तर सर्वांना नसतो पण विवेकाचा अनुभव सर्वांना असतो. मनुष्याचे ठिकाणी हा विवेक विशेष-रूपाने आहे. अर्जुनाच्या प्रश्न (मनुष्य इच्छा नसतानासुद्धा पाप का करतो?) मध्ये आलेल्या **"अनिच्छन्नपि"** पदाने सुद्धा हेच सिद्ध होते की, मनुष्याचे ठिकाणी विवेक आहे आणि या विवेकानेच तो पाप आणि पुण्य दोन्हीना जाणतो आणि पाप करू इच्छित नाही. पाप न करण्याची इच्छा विवेकाशिवाय होत नाही. परंतु हा "काम" त्या विवेकाला झाकून टाकतो आणि त्याला जागृत होऊ देत नाही.

विवेक जागृत झाल्यास मनुष्य भविष्यावर अर्थात् परिणामावर दृष्टी ठेवूनच कार्य करत असतो. परंतु कामनेने विवेक झाकला गेल्याने परिणामाकडे दृष्टीच जात नाही. परिणामाकडे दृष्टी न जाण्यानेच तो पाप करतो.

अशा प्रकारे ज्याचा अनुभव सर्वांना आहे त्या विवेकालासुद्धा जेव्हा हा "काम" जागृत होऊ देत नाही तर ज्याचा अनुभव सर्वांना नसतो त्या तत्त्वज्ञानाला तो जागृत होऊच कसा देईल? म्हणून या ठिकाणी "कामा" ला ज्ञान (विवेक) आणि विज्ञान (बोध)—दोन्हीचा नाश करणारा म्हटले गेले आहे.

वास्तविक हा "काम" ज्ञान आणि विज्ञानाचा नाश (अभाव) करत नाही तर त्या दोघांना झाकून टाकतो अर्थात् प्रगट होऊ देत नाही. त्यांच्या झाकण्यालाच या ठिकाणी त्यांचा नाश करणे म्हटले गेले आहे. कारण ज्ञान, विज्ञानाचा कधी नाश होतच नाही. नाश तर वास्तविक "कामा" चाच होतो. ज्याप्रमाणे डोळ्यासमोर ढग आल्यास "ढगांनी सूर्यास झाकले आहे" असे म्हटले जाते. परंतु वास्तविक सूर्य झाकला जात नाही तर डोळे झाकले जातात. त्याचप्रमाणे "कामनेने ज्ञान विज्ञानाला झाकून टाकले" असे म्हटले जाते परंतु वास्तविक ज्ञान विज्ञान झाकले जात नाहीत तर बुद्धी

झाकली जाते.

**पाप्मानं हि प्रजहि**—कामना संपूर्ण पापांचे मूळ आहे. म्हणून कामना उत्पन्न झाल्यास पाप होण्याची शक्यता राहते. नंतर कामना मनुष्याच्या विवेकाला झाकून त्याला आंधळे बनविते ज्यामुळे त्याला पाप-पुण्याचे ज्ञानच राहत नाही आणि तो पापामध्येच प्रवृत्त होतो. त्यामुळे त्याचे महान् पतन होते. म्हणून भगवंत कामनेला महापापी आहे असे म्हणून तिला अवश्यच समाप्त करण्याची आज्ञा देतात.

गृहस्थीजीवन चांगले नाही, साधू व्हावे, एकांतात जावे असा विचार करून मनुष्य कार्याला तर बदलू इच्छितो परंतु त्याला कारण असलेल्या ''कामने'' चा त्याग करीत नाही, त्याच्या त्यागाचा विचारच करीत नाही. जर त्याने कामनेचा त्याग केला तर त्याची सर्व कार्य आपोआप योग्य होतील. जेव्हा मनुष्य जगण्याची कामना अथवा इतर कामना मनात ठेवून देहत्याग करतो तेव्हा त्या कामना त्याच्या पुढील जन्माला कारण ठरतात. तात्पर्य जोपर्यंत मनुष्याच्या ठिकाणी कामना असतात तोपर्यंत त्याला जन्म-मरणरूपी चक्रात फिरावे लागते. अशा प्रकारे कामना बंधनाशिवाय दुसऱ्या कोणत्याच कामी येत नाही.

जेव्हा मनुष्याच्या ठिकाणी जड पदार्थांविषयी आकर्षण निर्माण होते तेव्हाच त्यांचेविषयी कामना निर्माण होते. कामना निर्माण झाल्यावर विवेकदृष्टी दबली जाते आणि इंद्रिय-दृष्टी बळावते. इंद्रिये मनुष्याला केवळ शब्दादी विषयांच्या सुखभोगामध्येच प्रवृत्त करतात. पशु-पक्ष्यांचीसुद्धा प्रवृत्ती इंद्रियांपासून मिळणाऱ्या सुखापर्यंतच राहत असते. परंतु कामनेने विवेक झाकला गेल्याने मनुष्य इंद्रियजन्य सुखासाठी पदार्थांची कामना करू लागतो आणि मग पदार्थांसाठी रुपयांची कामना करू लगतो. एवढेच नव्हे तर त्याची दृष्टी रुपयाच्या पुढे जाऊन रुपयाच्या संख्ये (संग्रह) कडे जाते. मग तो रुपयाची संख्या वाढविण्याकडे प्रवृत्त होतो. निर्वाहमात्रासाठी लागणाऱ्या रुपयापेक्षा त्याचा संग्रह अधिक पतन करणारा असतो आणि संग्रहापेक्षासुद्धा रुपयाची संख्या वाढविणे महान् पतन करणारे असते. संख्या वाढविण्यासाठी तो खोटेपणा, कपट, धोकाबाजी, चोरी इत्यादी पाप कर्मांनासुद्धा करू लागतो आणि संख्या वाढल्यास त्याचे ठिकाणी अभिमानसुद्धा उत्पन्न होतो जो आसुरी संपत्तीचे मूळ आहे. अशा प्रकारे कामनेमुळेच मनुष्य महान् पतनाच्या दिशेने वाटचाल करतो म्हणून भगवान् या महान् पापी कामाचा चांगल्या प्रकारे नाश करण्याची आज्ञा देतात.

**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः॥४२॥**
**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना।**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम्॥४३॥**

**इन्द्रियाणि** = इंद्रियांना (स्थूल शरीरापेक्षा)
**पराणि** = पर (श्रेष्ठ, सबल, प्रकाशक, व्यापक तसेच सूक्ष्म)
**आहुः** = म्हणतात.
**इन्द्रियेभ्यः** = इंद्रियांपेक्षा
**परम्** = पर
**मनः** = मन आहे,
**मनसः तु** = मनापेक्षाही
**परा** = पर (श्रेष्ठ)
**बुद्धिः** = बुद्धी आहे (आणि)
**यः** = जो
**बुद्धेः तु** = बुद्धीपेक्षाही
**परतः** = पर (श्रेष्ठ) आहे,
**सः** = तो (काम) आहे.
**एवम्** = अशाप्रकारे
**बुद्धेः** = बुद्धीपेक्षा
**परम्** = पर (कामाला)
**बुद्ध्वा** = जाणून
**आत्मना** = आपल्याद्वारा
**आत्मानम्** = आपण-आपल्याला
**संस्तभ्य** = वश करून
**महाबाहो** = हे महाबाहो! (तू या)
**कामरूपम्** = कामरूपी
**दुरासदम्** = दुर्जय
**शत्रुम्** = शत्रूला
**जहि** = मार.

*व्याख्या*— **इंद्रियाणि पराण्याहुः**—शरीर अथवा विषय यांच्या पलीकडची इंद्रिये आहेत. तात्पर्य इंद्रियांद्वारा विषयांचे ज्ञान होत असते परंतु विषयांद्वारा इंद्रियांचे ज्ञान होत नाही. इंद्रिये विषयाशिवायसुद्धा राहत असतात परंतु इंद्रियांशिवाय विषयांची सत्ता सिद्ध होत नाही. विषयांमध्ये इंद्रियांना प्रकाशित करण्याचे सामर्थ्य नाही तर इंद्रिये विषयांना प्रकाशित करतात. इंद्रिये तीच राहतात पण विषय बदलत राहतात. इंद्रिये व्यापक आहेत आणि विषय व्याप्य आहेत

अर्थात् विषय इंद्रियांच्या अंतर्गत येतात. परंतु इन्द्रिय विषयांच्या अंतर्गत येत नाहीत. विषयांपेक्षा इंद्रिये सूक्ष्म आहेत. म्हणून विषयांपेक्षा इंद्रिये श्रेष्ठ, बलवान, प्रकाशक, व्यापक आणि सूक्ष्म आहेत.

**इन्द्रियेभ्यः परं मनः**—इंद्रिये मनाला जाणत नाहीत. परंतु मन सर्व इंद्रियांना जाणते. इद्रियांत देखील प्रत्येक इंद्रिय आपापल्या विषयालाच जाणते इतर इंद्रियांच्या विषयाला नव्हे. जसे कान केवळ शब्दाला जाणतो परंतु स्पर्श, रूप, रस आणि गंधाला जाणत नाही. त्वचा केवळ स्पर्शाला जाणते परंतु शब्द, रूप, रस आणि गंध यांना जाणत नाही. रसना केवळ रसाला जाणते परंतु शब्द, स्पर्श, रूप, गंध यांना जाणत नाही आणि नाक केवळ गंधाला जाणते परंतु शब्द, स्पर्श, रूप आणि रस यांना जाणत नाही. परंतु मन पाचही इंद्रियांना तसेच त्यांच्या विषयांना जाणते. म्हणून मन इंद्रियापेक्षा श्रेष्ठ, बलवान्, प्रकाशक, व्यापक आणि सूक्ष्म आहे.

**मनसस्तु परा बुद्धिः**—मन बुद्धीला जाणत नाही परंतु बुद्धी मनाला जाणते. मन कसे आहे? शांत आहे का व्याकूळ? ठीक आहे की नाही? इत्यादींना बुद्धी जाणते. इंद्रिये योग्य काम करीत आहेत अथवा नाही? यालाही बुद्धी जाणते. तात्पर्य बुद्धी मनाला तसेच त्याच्या संकल्पालासुद्धा जाणते आणि इंद्रियांना तसेच त्यांच्या विषयांनासुद्धा जाणते. म्हणून इद्रियांच्या पलीकडील जे मन आहे त्या मनापेक्षाही बुद्धी पलीकडची (श्रेष्ठ, बलवान, प्रकाशक, व्यापक आणि सूक्ष्म) आहे.

**यः बुद्धेः परतस्तु सः**—बुद्धीचा स्वामी ''अहम्'' आहे म्हणून ''अहम्'' म्हणतो.—''माझी बुद्धी'' बुद्धी करण आहे आणि ''अहम्'' कर्ता आहे. करण परतंत्र असते परंतु कर्ता स्वतंत्र असतो. त्या ''अहम्'' मध्ये जो जड अंश आहे त्या मध्ये ''काम'' राहतो. जड अंशाशी तादात्म्य असल्याकारणाने तो काम स्वरूपामध्ये (चेतन) राहत असलेला प्रतीत होतो.

वास्तविक पाहिले तर ''अहम्'' मध्येच काम राहत असतो कारण तोच भोगाची इच्छा करत असतो आणि सुख-दुःखाचा भोक्ता होतो. भोक्ता, भोग आणि भोग्य या तिन्हीमध्ये सजातीयता (जातीय एकता) आहे. यामध्ये सजातीयता नसती तर भोक्त्यामध्ये भोग्याची कामना अथवा आकर्षण होऊच शकत नाही. भोक्तेपणाचा जो प्रकाशक आहे ज्याच्या प्रकाशाने भोक्ता, भोग आणि भोग्य—तिन्हीची सिद्धी होते. त्या परम प्रकाशका (शुद्धचेतन) मध्ये ''काम'' नाही. ''अहम्'' पर्यंत सर्व प्रकृतीचे अंश आहेत. त्या ''अहम्'' च्याही पलीकडे साक्षात् परमात्म्याचा अंश ''स्व'' आहे जो शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी आणि अहम् या सर्वांचा आश्रय, आधार, कारण आणि प्रेरक आहे, तसेच श्रेष्ठ, बलवान, प्रकाशक, व्यापक आणि सूक्ष्म आहे.

जडा (प्रकृती) चा अंशच सुख-दुःखरूपामध्ये परिणत होतो अर्थात् सुख-दुःखरूपी विकृती जडामध्येच होत असते. चेतनामध्ये विकृती नसते तर चेतन विकृतीचा ज्ञाता आहे परंतु जडाशी तादात्म्य झाल्याने सुख-दुःखाचा भोक्ता चेतनच होत असतो अर्थात् चेतनच सुख-दुःखी होतो. केवळ जड सुखी-दुःखी होऊ शकत नाही. तात्पर्य ''अहम्'' च्या ठिकाणी जो जड अंश आहे त्याच्याशी तादात्म्य केल्याने चेतनसुद्धा आपल्याला ''मी भोक्ता आहे'' असे समजतो. परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार होताच रसबुद्धी निवृत्त होते **''रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते''** (२।५९) यामध्ये **''अस्य''** पद भोक्ता झालेल्या **''अहम्''** चा वाचक आहे आणि जे भोक्तेपणाहून निर्लिप्त तत्त्व आहे त्या परमात्म्याचा वाचक **''परम''** पद आहे. त्याच्या ज्ञानाने रस अर्थात् ''काम'' निवृत्त होतो. कारण सुखासाठीच कामना होत असते आणि स्वरूप सहज सुखराशी आहे. म्हणून परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार झाल्यावर ''काम'' (संयोगजन्य सुखाची इच्छा) नेहमीसाठी आणि संपूर्णपणे समाप्त होतो.

## मार्मिक गोष्ट

स्थूलशरीर ''विषय'' आहे, इंद्रिये ''बाह्य करण'' आहेत आणि मन-बुद्धी ''अंतःकरण'' आहे. स्थूलशरीरापेक्षा इंद्रिये पलीकडची (श्रेष्ठ, बलवान्, प्रकाशक, व्यापक आणि सूक्ष्म) आहेत. तसेच इंद्रियापेक्षा बुद्धी पलीकडची आहे बुद्धीच्यासुद्धा पलीकडे ''अहम्'' आहे जो कर्ता आहे. त्या ''अहम्'' (कर्त्यामध्ये) मध्ये ''काम'' अर्थात् लौकिक इच्छा राहत असते.

आपली सत्ता (असणेपणा) अर्थात् आपले स्वरूप चेतन, निर्विकार आणि सत्-चित-आनंदरूप आहे. जेव्हा ते जडा (प्रकृतिजन्य शरीर) शी तादात्म्य करते तेव्हा ''अहम्'' उत्पन्न होतो आणि स्वरूप ''कर्ता'' होतो. अशा प्रकारे कर्त्यामध्ये एक जड अंश असतो आणि एक चेतन अंश. जड अंशाच्या मुख्यत्वाने संसाराकडे आणि चेतन-अंशाच्या मुख्यत्वाने परमात्म्याकडे आकर्षण होते* तात्पर्य त्यामध्ये जड अंशाच्या प्राधान्यतेने लौकिक (संसारिक) इच्छा

* जड-चेतनाचे तादात्म्य आणि आकर्षण याला समजण्यासाठी एक दृष्टांत दिला जातो. चार कोपरे असलेल्या एखाद्या लोखंडाच्या ठोकळयाचे अग्नीशी तादात्म्य अर्थात् संबंध झाल्यास लोखंडाचे ठिकाणी जाळण्याची शक्ती नसतानासुद्धा तो जाळणारा होतो आणि अग्नी चार

होतात आणि चेतन अंशाच्या प्राधान्यतेने पारमार्थिक (परमात्म्याची) इच्छा होते. जड-अंश समाप्त होणारा आहे म्हणून लौकिक इच्छा नष्ट होणाऱ्या आहेत आणि चेतन अंश नित्य राहणारा आहे म्हणून पारमार्थिक इच्छा पूर्ण होणारी आहे. म्हणून लौकिक इच्छे (कामना) ची निवृत्ती आणि पारमार्थिक इच्छेची (संसारापासून सुटका करून घेण्याची इच्छा, स्वरूपबोधाची जिज्ञासा, भगवत्प्रेमाची अभिलाषा) पूर्ती होत असते. लौकिक इच्छा उत्पन्न होऊ शकतात पण टिकू शकत नाहीत. परंतु पारमार्थिक इच्छा दबल्या जाऊ शकतात पण समाप्त होऊ शकत नाहीत. कारण लौकिक इच्छा अवास्तविक आणि पारमार्थिक इच्छा वास्तविक आहेत. म्हणून साधकांनी लौकिक इच्छांच्या पूर्तीविषयी आशा ठेवू नये आणि पारमार्थिक इच्छांच्या पूर्तीविषयी निराशही होऊ नये.

वास्तविक पाहिले तर मुळात आपल्या अंशी परमात्म्याविषयी इच्छा एकच असते परंतु जडाच्या संबंधाने या इच्छेचे दोन भेद होतात आणि मनुष्य आपल्या वास्तविक इच्छेची पूर्ती परिवर्तनशील जडा (संसार) द्वारा करण्यासाठी जड पदार्थांची इच्छा करू लागतो हीच त्याची चूक आहे. कारण लौकिक इच्छा परधर्म आणि पारमार्थिक इच्छा स्वधर्म आहेत. परंतु साधकाचे ठिकाणी लौकिक आणि पारमार्थिक दोन्ही इच्छा असल्याने द्वंद्व उत्पन्न होते. द्वंद्व असल्याने साधकाचे ठिकाणी भजन, ध्यान, सत्संग इत्यादिंच्या वेळी तर पारमार्थिक इच्छा जागृत राहते. परंतु इतरवेळी त्याची पारमार्थिक इच्छा दबली जाते आणि लौकिक इच्छा (भोग आणि संग्रह) उत्पन्न होत असतात. लौकिक इच्छा असताना साधकात साधन करण्याचा एक निश्चय स्थिर राहू शकत नाही. पारमार्थिक इच्छा जागृत झाल्याशिवाय साधकाची उन्नती होत नाही. जेव्हा साधकाचा एकमात्र उद्देश परमात्मप्राप्ती करण्याचा दृढ होतो तेव्हा हे द्वंद्व समाप्त होते आणि साधकाचे ठिकाणी एक पारमार्थिक इच्छाच प्रबल राहते. एकच पारमार्थिक इच्छा प्रबल राहिल्यास साधकाला सुगमतेने परमात्म्याची प्राप्ती होते (५।३). म्हणून लौकिक आणि पारमार्थिक द्वंद्व समाप्त करणे साधकासाठी फार आवश्यक आहे.

शुद्ध स्वरूपाचे ठिकाणी आपल्या अंशी परमात्म्याविषयी सहजच एक आकर्षण अथवा रुची विद्यमान असते ज्याला "प्रेम" म्हणतात. जेव्हा हा आपला संसाराशी संबंध आहे असे समजतो तेव्हा हे "प्रेम" दबले जाते आणि "काम" उत्पन्न होतो. जोपर्यंत "काम" असतो तोपर्यंत "प्रेम" जागृत होत नाही. जोपर्यंत "प्रेम" जागृत होत नाही तोपर्यंत "काम" संपूर्णपणे समाप्त होत नाही. ज्यामध्ये जड अंशाच्या मुख्यतेने सांसारिक भोगाची इच्छा (काम) राहते. त्यामध्येच चेतन अंशाच्या मुख्यतेने परमात्म्याविषयी इच्छासुद्धा असते. म्हणून वास्तविक "कामाचा" निवास जड अंशामध्येच आहे परंतु तो देखील चेतनाच्या संबंधामुळेच आहे. चेतनाचा संबंध सुटताच "कामा" चा नाश होतो. तात्पर्य चेतनाकडून जडाचा संबंध-विच्छेद होताच जड-चेतनाच्या तादात्म्यरूपी "अहम्" चा नाश होतो आणि "अहम्" चा नाश होताच "काम" सुद्धा समाप्त होतो.

"अहम्" मध्ये जो जड अंश आहे त्याठिकाणी "काम" राहतो. हे समजण्यासाठी महत्त्वाची एक अशी युक्ती आहे की, दृश्यरूपाने दिसणारा संसार, त्याला पाहणारी इंद्रिये तसेच बुद्धी आणि यांना पाहणारा स्वतः भोक्ता—या तिन्हीचे ठिकाणी जातीय (धातुगत) एकता असल्यावाचून भोक्त्याचे भोग्याकडे आकर्षण होऊच शकत नाही. कारण आकर्षण सजातीयतेमध्येच होते, विजातीयतेमध्ये नव्हे. जसे डोळ्याचे रूपाविषयीच आकर्षण होते, शब्दाविषयी नव्हे. हीच गोष्ट सर्व इंद्रियांना लागू होते. बुद्धीचेसुद्धा समजण्याच्या विषयात (विवेक-विचार) आकर्षण होते, शब्दादी विषयामध्ये नव्हे (जर झालेच तर इंद्रियांचे साहाय्यानेच होते). त्याच प्रमाणे "स्व" ची परमात्म्याशी तात्त्विक एकता आहे म्हणून "स्व" चे परमात्म्याविषयी आकर्षण आहे. ही तात्त्विक एकता जड अंशाचा संपूर्णपणे त्याग झाल्याने अर्थात् जडाशी मानलेल्या संबंधाचा संपूर्णपणे विच्छेद करण्यानेच अनुभवाला येते. अनुभवामध्ये येताच "प्रेम" जागृत होते. प्रेमामध्ये जडा (असत्) चा अंशसुद्धा शिल्लक राहत नाही अर्थात् जडतेचा अत्यंत अभाव होत असतो.

प्रकृतीचे कार्य महत्तत्त्वा (समष्टी बुद्धी) चा अत्यंत सूक्ष्म अंश "कारण शरीर" हाच "अहम्" चा जड अंश

कोपरे असणारा नसूनही चार कोपरे असणारा होतो. अग्नीशी तादात्म्य झाले तरी लोखंडच चुंबकाकडे आकर्षित होते अग्नी नव्हे. कारण चुंबकाबरोबर लोखंडाची सजातीयता आहे. अग्नी आपल्या सजातीय, निराकार अग्नी तत्त्वाकडेच आकर्षित होतो म्हणून तो आपोआप शांत होतो. अशा प्रकारे जड आणि चेतन यांच्या तादात्म्याच्या बाबतीत जड अंश संसाराकडे तसेच चेतन अंश परमात्म्याकडे आकर्षित होतो. चेतन अंश परमात्म्याकडे आकर्षित झाल्यास जड अंश वेगळा होतो कारण जड अनित्य आहे. परंतु जड अंश संसाराकडे आकर्षित झाला तरी चेतन अंश वेगळा होत नाही कारण चेतन नित्य आहे.

आहे. या कारण शरीरातच ''काम'' राहतो. कारण शरीराच्या तादात्म्यामुळे ''काम'' स्व मध्ये दिसतो. तादात्म्य नष्ट झाल्यास ज्याठिकाणी कामाचा लेशसुद्धा नसतो अशा आपल्या शुद्ध स्वरूपाचा अनुभव येतो. स्वरूपाचा अनुभव झाल्यास ''काम'' संपूर्णपणे निवृत्त होतो.

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा**—पूर्वी शरीराच्या पलीकडील इंद्रिये, इंद्रियांच्या पलीकडील मन, मनाच्या पलीकडील बुद्धी आणि बुद्धीच्या पलीकडील ''काम'' आहे असे सांगितले. आतां उपर्युक्त पदामध्ये बुद्धीच्या पलीकडे असलेल्या ''कामाला'' जाणण्याविषयी म्हणण्याचा अभिप्राय असा आहे की, हा ''काम'' अहम्‌मध्ये राहतो. आपल्या वास्तविक स्वरूपात ''काम'' नसतो. जर स्वरूपात ''काम'' असता तर कधी समाप्त झाला नसता. नाशवान जडाशी तादात्म्य केल्यानेच ''काम'' उत्पन्न होतो. तादात्म्याच्या ठिकाणीसुद्धा ''काम'' रहातो. तो जडामध्येच असतो परंतु दिसत असतो स्वरूपामध्ये! म्हणून बुद्धीच्या पलीकडे राहणाऱ्या या ''कामाला'' जाणून त्याला समाप्त केले पाहिजे.

**संस्तभ्यात्मानमात्मना**—बुद्धीच्या पलीकडे असलेल्या ''अहम्'' मध्ये राहणाऱ्या ''कामाला'' मारण्याचा उपाय असा आहे. स्वतः द्वारा स्वतः ला वश करणे अर्थात् स्वतः चा संबंध केवळ आपल्या शुद्ध स्वरूपाशी अथवा आपल्या अंशी भगवंताशी ठेवणे, जो वास्तविक आहे. सहाव्या अध्यायाच्या पाचव्या श्लोकात ''**उद्धरेदात्मनात्मानम्**'' पदाने आणि सहाव्या श्लोकात ''**येनात्मैवात्मना जितः**'' पदानेसुद्धा हीच गोष्ट सांगितली आहे.

स्वरूप (स्व) साक्षात् परमात्म्याचा अंश आहे आणि शरीर, इंद्रिये, मन, बुद्धी संसाराचे अंश आहेत. जेव्हा स्वरूप (स्व) आपल्या अंशी परमात्म्याशी विन्मुख होऊन प्रकृती (संसार) च्या सन्मुख होते तेव्हा त्याचे ठिकाणी कामना उत्पन्न होतात. कामना अभावामुळे उत्पन्न होतात आणि अभाव संसाराच्या संबंधाने होतो. कारण संसार अभावरूपच आहे—''**नासतो विद्यते भावः**'' (२।१६) संसाराशी संबंध-विच्छेद होताच कामनांचा नाश होतो. कारण स्वरूपामध्ये अभाव नाही ''**नाभावो विद्यते सतः।**'' (२।१६)

परमात्म्याशी विन्मुख होऊन संसाराशी आपला संबंध मानल्यावरही जीवाची वास्तविक इच्छा (आवश्यकता अथवा भूक) आपल्या अंशी परमात्म्याला प्राप्त करण्याचीच असते. ''मी नेहमी जिवंत असावे, मला सर्व प्रकारचे ज्ञान प्राप्त व्हावे, मी नेहमी सुखी असावे''—या रूपामध्ये तो वास्तविक सत्-चित्-आनंदस्वरूप परमात्म्याचीच इच्छा करतो, परंतु संसाराशी संबंध मानल्यामुळे तो भ्रमाने या इच्छांची पूर्ती संसाराकडून करू इच्छितो—हाच ''काम'' आहे. या ''कामा'' ची पूर्ती तर कधीही होऊच शकत नाही. म्हणून या ''कामा'' ला तर समाप्त केलेच पाहिजे.

ज्याने संसाराशी आपला संबंध जोडला आहे तोच त्याला तोडूही शकतो. म्हणून भगवंतांनी स्वतःद्वाराच संसाराशी आपला संबंध-विच्छेद करून ''कामा'' ला नष्ट करण्याची आज्ञा दिली आहे. आपल्याकडूनच आपण आपल्याला वश करण्यासाठी कोणताही अभ्यास करावा लागत नाही. कारण अभ्यास संसाराच्या (शरीर, इंद्रिये, मन आणि बुद्धी) साहाय्यानेच होत असतो. म्हणून अभ्यासात संसाराच्या संबंधाची साहाय्यता घ्यावी लागते. वास्तविक आपल्या स्वरूपामध्ये स्थिती अथवा परमात्म्याची प्राप्ती संसाराच्या साहाय्याने होत नाही तर संसाराच्या (संबंध-विच्छेद) त्यागाने आपोआप होते.

## मार्मिक गोष्ट

जेव्हा चेतन आपला संबंध जडाशी मानतो तेव्हा त्याचे ठिकाणी संसाराची (भोगाची) सुद्धा आणि परमात्म्याची सुद्धा इच्छा उत्पन्न होत असते. जडाशी संबंध मानल्यावर जीवाची हीच चूक होते की, तो सत्-चित्-आनंदस्वरूप परमात्मप्राप्तीच्या इच्छेला—अभिलाषेला संसाराकडूनच पूर्ण करण्यासाठी सांसारिक पदार्थांची इच्छा करू लागतो. परिणामी त्याच्या या दोन्हीही इच्छा (स्वरूपबोधावाचून) कधीही नष्ट होऊ शकत नाहीत.

संसाराला जाणण्यासाठी संसारापासून वेगळे होणे आणि परमात्म्याला जाणण्यासाठी परमात्म्याशी अभिन्न होणे आवश्यक आहे कारण ''स्व'' ची संसाराशी भिन्नता आणि परमात्म्याशी अभिन्नता आहे परंतु संसाराची इच्छा करण्याने ''स्व'' संसाराशी आपली अभिन्नता अथवा समीपता समजतो, जी कधीही शक्य नाही आणि परमात्म्याची इच्छा करण्याने ''स्व'' आपली परमात्म्याशी भिन्नता अथवा दूरी (विन्मुखता) मानतो. परंतु याची शक्यताच नाही. मात्र एक गोष्ट अशी आहे की, सांसारिक इच्छांना समाप्त करण्यासाठी पारमार्थिक इच्छा करणे फार उपयोगी आहे. जर पारमार्थिक इच्छा तीव्र झाली तर लौकिक इच्छा सहज समाप्त होतात. लौकिक इच्छा संपूर्णपणे नाहीशा झाल्यावर पारमार्थिक इच्छा पूर्ण होतात अर्थात् नित्यप्राप्त परमात्म्याचा अनुभव होतो* कारण वास्तविक

* यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः। अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते॥ (कठ २।३।१४, बृहदा० ४।४।७)

परमात्मा सदा-सर्वकाळ विद्यमान असतो. परंतु लौकिक इच्छा असल्यामुळे त्याचा अनुभव येत नाही.

**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम्—"महाबाहो"** चा अर्थ विशाल आणि बलवान भुजा असलेला अर्थात् शूरवीर असा आहे. अर्जुनाला "**महाबाहो**" अर्थात् शूरवीर म्हणून भगवान् त्याला त्याच्या लक्ष्याकडे वळवितात की, तू या कामरूपी शत्रूचे दमन करण्यास समर्थ आहेस.

संसाराशी संबंध ठेवून "कामा" चा नाश करणे फार कठीण आहे. हा "काम" मोठ-मोठ्यांच्या विवेकाला झाकून त्यांना कर्तव्यापासून च्युत करतो, ज्यामुळे त्यांचे पतन होते. म्हणून भगवंतांनी याला दुर्जय शत्रू म्हटले आहे.

"कामा" ला दुर्जय शत्रू म्हणण्याचे तात्पर्य यापासून अधिक सावधान राहण्यासाठी आहे. याला दुर्जय समजून निराश होण्यासाठी नव्हे.

कोणत्याही कामनेची उत्पत्ती, पूर्ती, अपूर्ती आणि निवृत्ती होत असते. म्हणून सर्व कामना उत्पन्न आणि नष्ट होणाऱ्या आहेत. परंतु "स्व" निरंतर राहतो आणि कामानांच्या उत्पन्न आणि नष्ट होण्याला जाणतो. म्हणून कामनेशी तो सुलभरीतीने संबंध-विच्छेद करू शकतो. कारण वास्तविक संबंध नाहीच. म्हणून साधकांनी कामनेविषयी कधी घाबरून जाऊ नये. जर साधकाचा आपल्या कल्याणाविषयीचा पक्का उद्देश असेल *तर तो "कामा"ला सुलभ रीतीने मारू शकतो.

कामनांच्या त्यागाविषयी अथवा परमात्म्याच्या प्राप्ती-विषयी सर्व स्वतंत्र, अधिकारी, योग्य आणि समर्थ आहेत. परंतु कामनांच्या पूर्तीविषयी कोणीही स्वतंत्र, अधिकारी, योग्य आणि समर्थ नाही. कारण कामना पूर्ण होणारी नाहीच. परमात्म्याने मानवशरीर त्यांच्या प्राप्तीसाठीच दिले आहे. म्हणून कामनांचा त्याग करणे कठीण नाही. सांसारिक भोग-पदार्थांना महत्त्व दिल्यामुळेच कामनेचा त्याग करणे कठीण वाटते.

सुखा (अनुकूलता) च्या कामनेला समाप्त करण्यासाठीच भगवान् वेळोवेळी दुःख (प्रतिकूलता) पाठवितात की, सुखाची कामना करू नका, कामना कराल तर दुःखच पदरी पडेल. सांसारिक पदार्थांची कामना करणारा मनुष्य दुःखापासून आपला बचाव कधीही करू शकत नाही—हा नियम आहे. कारण संयोगजन्य भोगच दुःखाला कारण आहेत. (५।२२)

"स्व" (स्वरूप) च्या ठिकाणी प्रचंडशक्ती आहे. त्याच्यापासून सत्ता आणि शक्ती प्राप्त करूनच बुद्धी, मन, आणि इंद्रिये सत्तावान तसेच शक्तिमान होतात. परंतु जडाशी संबंध जोडल्यामुळे तो आपल्या शक्तीला विसरतो आणि आपल्याला बुद्धी, मन आणि इंद्रियांच्या अधीन मानत राहतो. म्हणून "काम" रूपी शत्रूला समाप्त करण्यासाठी आपले-आपणाला जाणणे आणि आपल्या शक्तीला ओळखणे फार अवश्यक आहे.

"काम" जडाच्या संबंधाने आणि जडाचे ठिकाणीच राहतो. तादात्म्यामुळे तो "स्व" मध्ये प्रतीत होतो. जडाचा संबंध राहीला नाही तर "काम" नाहीच. म्हणून येथे "कामा"ला समाप्त करण्याचे तात्पर्य वस्तुतः "कामा" चा संपूर्णपणे अभाव दाखविण्यातच आहे. या उलट जर "काम" अर्थात् कामनेच्या सत्तेला मानून त्याला समाप्त करण्याचा प्रयत्न केला तर ती कामना समाप्त करणे कठीण आहे कारण वास्तविक कामनेची स्वतंत्र सत्ता नाहीच. कामना उत्पन्न होते आणि उत्पन्न होणारी वस्तू नष्ट होतेच— असा नियम आहे. नवीन कामना केली नाही तर पूर्वीच्या कामना आपोआप नष्ट होतील. म्हणून नवीन कामना न करणे कामनेला नष्ट करण्याचे तात्पर्य आहे.

शरीरादी सांसारिक पदार्थांना "मी" "माझे" "माझ्यासाठी" समजल्यानेच स्वतः मध्ये स्वतः ला कमी-पणाचा अनुभव येतो. परंतु मनुष्य अज्ञानाने त्या कमीची पूर्ती सुद्धा सांसारिक पदार्थांनीच करू इच्छितो. म्हणून तो त्या पदार्थांची कामना करतो. परंतु वास्तविक दृष्ट्या आजपर्यंत सांसारिक पदार्थापासून कोणाच्याही कमीची पूर्ती झाली नाही, होणार नाही आणि होऊ शकतही नाही. कारण "स्व" अविनाशी आहे आणि पदार्थ नाशवान आहेत. "स्व" अविनाशी असूनही नाशवानाची कामना केल्याने लाभ तर कोणता होत नाही आणि कोणतीही हानी होण्याचे शिल्लक

---

"साधकाच्या हृदयामध्ये स्थित असलेल्या संपूर्ण कामना जेव्हा समूळ नष्ट होतात तेव्हा मर्त्य मनुष्य अमर होत असतो आणि याच ठिकाणी (मनुष्य-शरीरामध्ये) ब्रह्माचा योग्य प्रकारे अनुभव करून घेतो."

विमुञ्चति यदा कामान् मानवो मनसि स्थितान्। तर्ह्येव पुण्डरीकाक्ष भगवत्त्वाय कल्पते॥ (श्रीमद्भा० ७।१०।९)

"कमलनयना! ज्या वेळी मनुष्य आपल्या मनामध्ये वसत असलेल्या संपूर्ण कामनांचा त्याग करतो त्याचवेळी तो भगवत्स्वरूपाला प्राप्त करून घेतो.

* उद्देश अथवा लक्ष्य सदैव अविनाशी तत्त्वा (चेतन तत्त्व-परमात्मा) चेच होत असते, नाशवानाचे (संसाराचे) नव्हे. नाशवानांच्या कामनाच होत असतात उद्देश नव्हे. उद्देश तो असतो ज्याची मनुष्य निरंतर इच्छा करीत असतो. मग शरीराचे तुकडे-तुकडे का केले जाईनात तरीही तो उद्देशालाच इच्छितो. उद्देशाची सिद्धी अवश्य होते परंतु कामनांची सिद्धी होत नाही उलट त्यांचा नाश होतो. उद्देश सदा एक राहतो परंतु कामना बदलत राहतात.

राहत नाही. म्हणून भगवान् कामनेला शत्रू असे सांगून तिला समाप्त करण्याची आज्ञा देतात.

कर्मयोगाने या कामनेचा नाश सुगमतेने होतो कारण कर्मयोगाचा साधक संसाराची लहानात-लहान आणि मोठ्यात मोठी प्रत्येक क्रिया परमात्मप्राप्तीचा उद्देश ठेवून दुसऱ्यांच्या हितासाठीच करत असतो, कामनेच्या पूर्तीसाठी नव्हे. तो प्रत्येक क्रिया निष्कामभावनेने तसेच दुसऱ्याचे हित आणि सुखासाठीच करीत असतो, आपल्यासाठी काहीही करीत नाही. त्याच्याजवळ जो समय, समज, सामुग्री आणि सामर्थ्य असते ते सर्व आपले नाही तर मिळालेले आहे आणि त्यांचा वियोग होणार असे तो समजतो. म्हणून तो त्यांना आपले कधीही न समजता निःस्वार्थभावनेने (संसाराचेच समजून) संसाराच्याच सेवेमध्ये खर्च करतो. त्यांना संपूर्णपणे संसाराच्या सेवेत खर्च करतो. स्वतः साठी काहीही शिल्लक ठेवीत नाही. आपले न समजल्यानेच त्या वस्तू संपूर्णपणे सेवेत खर्च होतात, अन्यथा नाही.

कर्मयोगी आपल्यासाठी काही करीतच नाही, आपल्यासाठी काही इच्छितच नाही आणि आपले काही समजतच नाही. म्हणून त्याचे ठिकाणी असलेल्या कामनांचा नाश सुगमतेने होतो. कामनांचा संपूर्णपणे नाश झाल्यावर त्याच्या उद्देशाची पूर्ती होते आणि तो स्वतः च स्वतः ला प्राप्त होऊन कृतकत्य, ज्ञात ज्ञातव्य, आणि प्राप्त प्राप्तव्य होत असतो अर्थात त्याच्यासाठी काहीही करणे, जाणणे आणि मिळविणे शिल्लक राहत नाही.

**परिशिष्ट भाव**—भगवंताने इंद्रिये, मन आणि बुद्धी यांची नावे तर घेतली आहेत, परंतु '**अहम्**' चे नाव घेतले नाही. अहम् बुद्धीहून पर (श्रेष्ठ) आहे. सातव्या अध्यायाच्या चौथ्या श्लोकातही बुद्धीनंतर अहम् ला घेतले आहे—**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च। अहङ्कार इतीयं मे.........।** म्हणून येथेही '**सः**' पदाने अहम् यात राहणाऱ्या 'काम' याला घ्यावे.

जोपर्यंत स्वरूपाचा साक्षात्कार होत नाही तोपर्यंत अहम् यात काम राहतो. स्वरूपाचा साक्षात्कार झाल्यावर अहम् यात काम राहत नाही—'**परं दृष्ट्वा निवर्तते**' (गीता २। ५९). सुख तर स्वरूपात आहे, परंतु कामामुळे मनुष्य जडतेला सत्ता आणि महत्ता देऊन त्यापासून सुख इच्छितो. जोपर्यंत जडतेचा संबंध आहे, तोपर्यंत 'काम' आहे. जडतेशी संपूर्णपणे संबंध-विच्छेद झाल्यास 'प्रेम' होते.

'काम' आपल्यात आहे—'**रसोऽप्यस्य**' (गीता २। ५९). आपल्यात असल्यामुळेच काम आपल्यासाठी बाधक होतो. जर हा आपल्यात नसेल, दुसऱ्यात (इंद्रिये-मन-बुद्धी यात) असेल तर आपल्याला काय बाधा होणार आहे? आपल्यात काम असल्यानेच स्वयं सुखी-दुःखी होतो, कर्ता-भोक्ता होतो. वास्तविक दृष्टीने पाहिले तर काम आपल्यात मानलेला आहे, आपल्यात नाहीच, म्हणूनच हा समाप्त होतो. म्हणून काम आपल्यात आहे, परंतु मानलेला आहे.

अहम् यात राहणाऱ्या वस्तूला मनुष्य आपल्यात मानतो. आपल्यात अहम् मानलेला आहे आणि त्या अहम्मध्ये काम राहतो. म्हणून जोपर्यंत अहम् आहे तोपर्यंत अहम्च्या जातीचे आकर्षण अर्थात् 'काम' असतो आणि जेव्हा अहम् राहत नाही तेव्हा स्वयंच्या जातीचे आकर्षण अर्थात् 'प्रेम' होते. कामामध्ये संसाराकडे आणि प्रेमामध्ये परमात्म्याकडे आकर्षण असते.

संपूर्ण त्रैलोक्यात, अनंत ब्रह्माण्ड 'विषय' आहेत. विषय इंद्रियांच्या एका देशात असतात, इंद्रिये मनाच्या एका देशात असतात, मन बुद्धीच्या एका देशात असते, बुद्धी अहम्च्या एका देशात असते आणि अहम् चेतनाच्या (स्वरूपाच्या) एका देशात असतो. म्हणून चेतन अत्यंत महान् आहे, ज्याच्या अंतर्गत संपूर्ण त्रैलोक्य, अनंत ब्रह्माण्ड विद्यमान आहेत. परंतु अपरा प्रकृतीच्या एका अंशाशी (अहम्शी) आपला संबंध जोडल्यामुळे मनुष्य स्वतःला अत्यंत लहान (एकदेशीय) समजतो.

**ॐ तत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां**
**योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम**
**तृतीयोऽध्यायः ॥३॥**

**अशा प्रकारे ॐ तत् सत् ह्या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्ण आणि अर्जुन यांच्या संवादातील "कर्मयोग" नावाचा तीसरा अध्याय पूर्ण झाला.**

या तीसऱ्या अध्यायाचे नाव "कर्मयोग" आहे. कारण कर्मयोगाचे जितके सखोल विवेचन तीसऱ्या अध्यायामध्ये आलेले आहे तितके गीतेच्या दुसऱ्या कोणत्याही अध्यायामध्ये आलेले नाही.

## तीसऱ्या अध्यायातील पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायामध्ये "**अथ तृतीयोऽध्यायः**" ची तीन, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची आठ, श्लोकांची पांचशे बेचाळीस आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग पाचशे सहासष्ट आहे.

(२) या अध्यायामध्ये "**अथ तृतीयोऽध्यायः**" ची सात, "**अर्जुन उवाच**" इत्यादी पदांची सव्वीस, श्लोकांची एक हजार तीनशे शहात्तर आणि पुष्पिकेची पंचेचाळीस अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग एक हजार चारशे चौपन्न आहे. या अध्यायाचे सर्व श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायामध्ये चार उवाच आहेत. दोन "**अर्जुनउवाच**" आणि दोन "**श्रीभगवानुवाच**"

## तीसऱ्या अध्यायात योजलेले छंद

या अध्यायामधील त्रेचाळीस श्लोकांपैकी पहिल्या आणि सदतीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये तसेच अकराव्या श्लोकाच्या तृतीय चरणामध्ये "रगण" प्रयुक्त असल्याने "**र-विपुला,**" पाचव्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये "न-गण" प्रयुक्त असल्याने "**न-विपुला,**" एकोणीसाव्या, सव्वीसाव्या आणि पस्तीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये तसेच आठव्या आणि एकवीसाव्या श्लोकाच्या तृतीय चरणामध्ये "भगण" प्रयुक्त असल्याने "**भ-विपुला**", सातव्या श्लोकाच्या प्रथम चरणामध्ये "न-गण" आणि तृतीय चरणामध्ये "र-गण" प्रयुक्त झाल्याने "**संकीर्ण-विपुला**" संज्ञेचे छंद आहेत. बाकीचे तेहतीस श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छंदाच्या लक्षणांनी युक्त आहेत.